अर्थमूलौ धर्मकामौ – कौटिल्य

लोकशाहीचा

# अर्थव्यवहार

( A treatise on the Economics of Public Finance )

लेखक

श्री. द. कुलकर्णी, बी. ए. ( ऑनर्स )

किंमत रु. ६–४–०

व्हीनस बुकस्टॉल : पुणें २

# प्रस्तावना

अलीकडे कांहीं वर्षांत राष्ट्रीय अर्थव्यवस्था कोणत्या अर्थनीतीवर आधारावी याविषयीं बराच ऊहापोह चालू आहे. राष्ट्रीय अर्थव्यवस्था म्हणजे सरकारी व निमसरकारी घटकांच्या आर्थिक व्यवहाराचा राष्ट्राच्या आर्थिक जीवनावर काय परिणाम होतो, हें पाहाणें होय. अशा तऱ्हेच्या अभ्यासास हल्लीं फारच महत्त्व प्राप्त झालें आहे. कारण सरकारनें राष्ट्रीय अर्थ-व्यवहारास समाजाचें जास्तींत जास्त हित हा मध्यबिंदु कल्पून दिशा दाखविली पाहिजे, एवढेंच नव्हे तर, राष्ट्रीय संपत्तीचा समाजास प्रिय असलेलें ध्येय गांठण्याकरितां उपयोग केला पाहिजे, अशी आतां सरकारविषयीं जनतेची अपेक्षा आहे. प्रत्येक देशापुढील आर्थिक समस्या व त्या निवारण्याचे उपाय, हे देशकालपरिस्थितीवरच अवलंबून राहातील, हें उघडच आहे. अमेरिकेसारख्या प्रगत राष्ट्रापुढील प्रश्न व हिंद-सारख्या मागासलेल्या राष्ट्रापुढील प्रश्न ह्यांत महदंतर असणार हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं.[1] उदाहरणार्थ, प्रगत राष्ट्रांत बेकारी निवारण्यावरील उपायां-वरच भर दिला जाईल. या उलट मागासलेल्या राष्ट्रांत तेथील सुप्त राष्ट्रीय-संपत्तीचा जास्तींत जास्त उपयोग करून लोकांचें जीवनमान वाढविण्याकडे लक्ष दिलें जाईल. अशा देशांतील प्रगति ही बहुंशीं तेथील सरकारवरच अवलंबून असल्यानें सर्वव्यापी आर्थिक नियोजनावरच सर्वांचें लक्ष केंद्रित करावें लागेल. 'कर, कर्ज व राष्ट्रिय विनियोग' या तिन्ही बाबतींत योग्य धोरण अंगिकारून सरकार घटकाघटकांमधील आर्थिक विषमता दूर करून समाजाचें जास्तींत जास्त हित साधूं शकतें. धंद्याचें राष्ट्रीयीकरण, राष्ट्रीय नियंत्रणाखालीं नवीन धंदे काढणें, व सर्व राष्ट्रीय आर्थिक व्यवहारांवर पूर्ण नियंत्रण, या तिन्ही प्रकारांनीं सरकार आपलें उद्दिष्ट साधतें.

---

१ या अनुरोधानें संयुक्त राष्ट्रसंघानें नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या दोन पुस्तिकांचा तौलनिक अभ्यास करणें, हें बोधप्रद ठरेल. ह्या दोन पुस्तिका म्हणजे (National and International measures on full Employment, 1949–and (2) Measures for the Economic Development of under–developed Countries, 1951.

आपल्या देशांत सरकारनें राष्ट्रीय आर्थिक व्यवहारावर नियंत्रण ठेवणें समाजहितकारक आहे, अशा विचारांचा पाया न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांनीं घातला. ' खुल्या व्यापारा 'चें तत्त्व हिंदुस्थानच्या आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें घातक ठरेल, सरकारी उत्तेजनानेंच राष्ट्रीय औद्योगिक प्रगति शक्य आहे, असें एकोणिसाव्या शतकांत त्यांनींच प्रथम प्रतिपादन केलें. परंतु लायक अशा हिंदी उद्योगधंद्यांस संरक्षण देण्याचा उपक्रम मात्र पहिल्या महायुद्धानंतरच सुरू झाला. तथापि राष्ट्राची योजनापूर्वक आर्थिक प्रगति घडवून आणण्याची कल्पना त्यावेळीं नव्हती. आतां मात्र आपल्या राष्ट्रीय सरकारनें नियोजनसमिति नेमून पंचवार्षिक योजनेचा मसुदा तयार करून आर्थिक नियोजनाचा ओनामा केला आहे, हें सुदैव होय.

राष्ट्रीय अर्थव्यवस्थेवर इंग्रजी भाषेंत विपुल वाङ्मय उपलब्ध आहे. त्यांतील बरेंचसें विशुद्ध तात्त्विक स्वरूपाचें असल्यानें सामान्य वाचकाच्या तें आंवाक्याबाहेरचें आहे. या दृष्टीनें राष्ट्रीय अर्थव्यवस्थेसंबंधीं सांगोपांग विवेचन करून तें मराठी वाचकांपुढें ठेवण्याच्या श्री. कुलकर्णी यांच्या ह्या प्रयत्नाचें मी सहर्ष स्वागत करतों. सरकारी अर्थव्यवहाराचेंच अति कुशलतेनें विवेचन करून ते थांबले नाहींत, तर राष्ट्रीयीकरण, बेकारी, आर्थिक विषमता, इ. विषयांचेंहि त्यांनीं क्लिष्टता टाळून सुगम विवेचन केलेलें आहे. त्यांच्या मतप्रणालीची चर्चा मला येथें करतां यावयाची नाहीं. पण मराठी वाचकांस या विषयाचें सम्यग्ज्ञान होण्याचे दृष्टीनें केलेला त्यांचा हा प्रयत्न जनतेच्या मान्यतेस व आदरास पात्र होईल असा मला भरंवसा वाटतो.

बृहन्महाराष्ट्र कॉलेज
ऑफ् कॉमर्स, पुणें ४
२–१०–५२

त्र्यं. म. जोशी
प्रिन्सिपॉल

# पुरस्कार

प्रस्तुत पुस्तकांत फडणिशी शास्त्राचा सामान्यतः व स्थूलमानानें विचार केला असून फडणिशी शास्त्राचे मौलिक सिद्धांत लोकशाही दृष्टीनें कोणत्या रीतीनें मर्यादित होतात याचाहि विचार केला आहे. राज्यव्यवस्थेचें स्वरूप आणि आर्थिक व्यवहार यांचा संबंध घनिष्ठ असतो, हें विश्रुत आहे. शासनपद्धति ही अर्थ-व्यवहाराला मिळून जुळून नसल्यास सामाजिक जीवनांत संघर्ष निर्माण होत जातो. म्हणून ज्या सिद्धांतांवर शासन अगर राज्यपद्धति प्रस्थापित झाली असेल त्यांना अनुसरून समाजांतील अर्थव्यवस्था व फडणिशी व्यवहार असला पाहिजे. ' धर्ममूलं च राज्यं अर्थमूलं च धर्मः ' या दृष्टीनें समाजांतील व्यक्तीव्यक्तींमधील व व्यक्ति व समाज यांमधील संबंध असे असले पाहिजेत कीं, त्यामुळें सामाजिक संबंधांत ताण व त्रास शक्य तितके कमी राहतील.

समाजांतील अर्थव्यवस्था राज्यव्यवस्थेइतकी झटपट बदलतां येत नाहीं. आर्थिक व्यवहार हा अतिशय संकीर्ण, व्यापक, दीर्घपरिणामी असतो. राज्याचें ध्येय समान संधि व आर्थिक समता हें लोकशाहींत असल्यानें तसें वातावरण निर्माण होईल अशी फडणिशी व्यवस्था म्हणजेच करव्यवस्था असली पाहिजे. आज समाजामध्यें ठळकपणें वावरत असलेली विषमता व अन्याय हीं शासन-संस्था कायम करीत असतात. म्हणून शासनसंस्थेबरोबरच आर्थिक संस्था व संकेत बदलले पाहिजेत. कुठलेंहि राज्य चालवावयाचें म्हणजे पैसा लागतो. आणि तो कर, कर्ज, व्यापार, उत्पादन या मार्गांनीं सामान्यतः उभा केला जातो. आक्रमण व लूट हीं प्रासंगिक साधनें आहेत. त्यांवरून कोणीहि राज्याचा प्रपंच हांकूं शकत नाहीं. लॉटरींतील पैशावर भावी घर बांधण्याइतकेंच हें हास्यास्पद आहे. म्हणून कर यावर मुख्य भर दिला जातो. प्रस्तुत पुस्तकांत करांचे प्रकार, करांच्या बोजाची विभागणी इत्यादिकांचा विचार केलेला आहे. तथापि सामान्य-पणें कर म्हणजे केवळ पैसा उभारण्याचें साधन एवढीच दृष्टि ठेवलेली आहे. आधुनिक जगांत कर हें नवीन अर्थव्यवस्था निर्माण करण्याचें साधन असें मानलें जातें आणि म्हणून ह्यातींत विशिष्ट मर्यादेपलीकडे मिळणारें उत्पन्न सरकार घेईल व ह्यातीनंतर मर्यादित संपत्ति ठेवून बाकी सर्व सरकार घेईल या गोष्टी आतां

मान्य झाल्या आहेत. कर व्यक्तीच्या प्राप्तीच्या मानानें असावा, अधिक प्राप्तीवर वाढत्या प्रमाणांत असावा, वैयक्तिक अडचणींचा थोडा विचार त्यांत असावा, वसुलीचा खर्च कमी असावा इत्यादि गोष्टींचा सुबोध विचार प्रस्तुत ग्रंथांत आहे. अनेक कर लोकांना आवडत नाहींत व एका करानें भागत नाहीं हा अनुभव आहे. शिवाय वस्तु व सोयी यांचा उपयोग, अभिरुचीप्रमाणें व गरजेप्रमाणें होत असल्याकारणानें करांमध्यें विविधता असणें अपरिहार्य होतें.

कर्जासंबंधीं प्रस्तुत पुस्तकांत केलेलें विवेचन सामान्यतः सुबोध आहे. आधुनिक जगांत जेवढें सरकारला अधिक कर्ज, तेवढी त्याची शाश्वती अधिक व पतहि अधिक असें समजलें जातें. उत्पादक कामें व अपरिहार्य पण अनुत्पादक अशीं कामें कर्ज उभारून काढून विद्यमान पिढीचा बोजा कमी होतो, असा सिद्धांत आहे. तथापि जेवढ्या प्रमाणांत कर्जाची फेड करण्याची व्यवस्था असेल त्या प्रमाणांत चालू पिढीवर स्वार्थत्यागाचा विद्यमान बोजा बसतोच. बोजा रोख व फायदा उधार असा हा प्रकार आहे. तथापि जोंपर्यंत परिग्रही समाज (Acquisitive society) विद्यमान आहे, तोंपर्यंत राष्ट्रीय कर्ज ही नित्याचीच बाब ठरते. जेथें समाजाचें स्वरूप याव्यतिरिक्त आहे, त्या ठिकाणीं कर किंवा कर्ज या दोन्हींकडे पाहाण्याचा दृष्टिकोन निराळा व त्यांचें स्वरूप जरी आजच्यासारखें असलें तरी आशय निराळा असतो. जेथें भांडवलशाही अर्थव्यवस्था नाहीं तेथें आर्थिक नियोजन आपल्याला दिसून येतें.

लोकशाही अर्थव्यवहार हा राजकीय लोकशाही व आर्थिक भांडवलशाही या संदर्भांत असूं शकतो किंवा लोकशाही अर्थव्यवस्था या संदर्भांतहि असूं शकतो. जेथें तो तसा आहे तेथें व्यापार व उद्योगधंदे हे व्यक्तीच्या मालकीचे अगर व्यवस्थेखालीं न राहातां त्यांची मालकी व व्यवस्था राज्याकडे असते. किंबहुना वस्तु व सोय यांचें उत्पादन, विभाजन व उपभोग या तिन्ही गोष्टींचा विचार एका समन्वित दृष्टीनें होऊन राष्ट्रांतील संपत्ति व तिचा उपभोग यांत विभाजनाच्या दृष्टीनें सामाजिक न्याय राहील असा प्रयत्न असतो. नियोजन असलें म्हणजे फडणिशी व्यवस्थेचें स्वरूप बदलतें. जे सिद्धान्त व जी व्यवस्था खाजगी उत्पादनामध्यें असते तीच तेथें असते. तथापि उत्पादनांतील हेतु निराळा असल्यामुळें व उत्पादन सामाजिक गरजेकडे लक्ष देऊन होत असल्यानें उत्पादनखर्च कमी

करण्याइतकेंच उत्पादनवाढीकडे सरकार लक्ष देत असतें. तीच दृष्टि घाऊक ( whole sale ) व्यापार सरकारच्या हातीं असल्यामुळें तेथेंहि दिसून येते. नियोजनामध्यें अवश्य असलेल्या अर्थव्यवस्थेचा विस्तारशः विचार प्रस्तुत पुस्तकांत जरी नाहीं तरी सामान्यपणें त्याचा विचार केलेला आहे.

हिंदी राज्य हें संघराज्य आहे म्हणून संघराज्याच्या अर्थव्यवस्थेचा विचार बराच केलेला दिसतो. तथापि घटक राज्यांच्या अर्थव्यवस्थेचा विचार अधिक विस्तारानें केला असता तर बरें झालें असतें. स्थानिक संस्थांच्या अर्थव्यवस्थेचा फारसा विचार केलेला दिसत नाहीं. त्याचप्रमाणें अंदाजपत्रक करतांना, रचना, मान्यता, अंमलबजावणी व तपासणी या चार गोष्टींचा विचार करावा लागतो. त्यासंबंधीं पुस्तकाच्या विषयाला पूर्तता येण्याच्या दृष्टीनें एखादें प्रकरण घालावयास हवें होतें. तथापि सामान्य वाचकांना सरळ व सुबोध भाषेंत लिहिलेलें हें पुस्तक अतिशय उपयोगी पडेल. लोकशाहीमध्यें प्रत्येक नागरिकानें जागरूक राहिलें पाहिजे. आणि ही जागरूकता प्रभावी व्हावयाची असेल तर ती ज्ञानयुक्त असावी लागते. या दृष्टीनें प्रस्तुत पुस्तकाचें मी स्वागत करतों.

पुणें
२२।१२।५२ } न. वि. गाडगीळ

# भूमिका

अर्थशास्त्र हा विषय किचकट व त्यांतून सरकारी अर्थव्यवहार हा तर तज्ज्ञांचा विषय, अशी सर्वसामान्य समजूत आहे. सर्वसाधारण वाचकांच्या दृष्टीनें या विषयावर शक्यतों तांत्रिक भाषा टाळून माहितीपूर्ण पुस्तक लिहिण्याचा प्रयत्नच न झाल्यानें, ही समजूत बळावली गेली आहे. या विषयावर पुस्तकें पाहावीं, तर बहुधा तीं क्रमिक किंवा तज्ज्ञ माणसांस प्रयत्नानें समजणारीं व तींहि प्रायः इंग्रजी भाषेंत लिहिलेलीं अशींच आहेत. त्यामुळें हा विषय म्हणजे निव्वळ ह्या विषयाचा खास अभ्यास करणाऱ्यांपुरताच मर्यादित झाला आहे. सामान्य वाचकांस या विषयाचें ज्ञान घ्यावें म्हटलें तरी अशक्य, अशी सद्यःस्थिति आहे. वरील गैरसमज दूर व्हावा, मराठी वाचकांसहि या विषयाची माहिती मिळणें शक्य व्हावें, विश्व-विद्यालयांतूनहि आतां मराठी माध्यम येणें शक्य असल्यामुळें महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसहि ह्याचा उपयोग व्हावा, व सर्वसामान्य वाचकांसदेखील एखादें इतिहासाचें पुस्तक वाचण्यांत जी गोडी वाटते, त्या तऱ्हेनें ह्या पुस्तकाबद्दल ओढ वाटावी, अशा भावनेनें व दृष्टीनें हा प्रयत्न केला आहे. ह्या प्रयत्नाचें चीज होणें हें ह्या प्रयत्नाच्या यशस्वितेवर व वाचकांच्या सहृदयतेवर अवलंबून आहे.

## उद्देश—संमिश्र अर्थव्यवस्थेंतील तत्त्वाविवेचन.

मार्क्सच्या ‘ कॅपिटल ’ ग्रंथानें सुरू केलेली भांडवलशाहीविरोधी, वैचारिक क्रांति रशियन राज्यक्रांतींत प्रत्यक्ष परिणत झाल्यापासून भांडवलशाहीचें आसन डळमळीत झालें आहे. परंतु रशियन समाजरचनेचा व राजवटीचा गेल्या ३०–३५ वर्षांचा अनुभव पाहातां त्या पद्धतींतील हुकूमशाही ही व्यक्तिस्वातंत्र्यास मारक असल्यानें त्या राजवटीची कांस धरावी, असें कोणाहि लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतास वाटत नाहीं. अशा स्थितींत या दोहोंतील सुवर्णमध्य शोधून त्याअनुसार सामाजिक, आर्थिक रचना करावी असा हल्लीं विचारप्रवाह सुरू आहे. व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार करणारी लोकशाहीदेखील सामाजिक व आर्थिक विषमता नष्ट करून समाजांतील सर्व थरांस जीवन सुखावह होईल अशी परिस्थिति निर्माण करूं शकेल, असा विश्वास व्यक्त केला जात आहे. भांडवलशाहींतून समाजवादाकडे उत्क्रांतिवादानें जावें हें लोकशाहीचें

ध्येय ठरू पाहात आहे. हें ध्येय गांठावयाचें झालें तर भांडवलवादी व समाजवादी अर्थपद्धतींचा योग्य समन्वय साधला पाहिजे. अशा पद्धतीसच संमिश्र अर्थ-व्यवस्था ( mixed economy ) असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. तूर्त तरी हिंदमध्यें ही अर्थव्यवस्था जनहितकारी ठरेल. अशा भूमिकेवरून राष्ट्राच्या अर्थव्यवहारांतील तत्त्वांचें विवेचन येथें केलें आहे.

## संमिश्र अर्थव्यवस्था म्हणजे काय ?

संमिश्र अर्थव्यवस्था म्हणजे जींत समाजांतील कांहीं उत्पादनसाधनें सरकारी मालकीचीं व कांहीं खाजगी मालकीचीं असून, एकंदर अर्थव्यवस्थेचें मार्गदर्शन समाजाचें जास्तींत जास्त हित साधावयाचें हा मध्यबिंदु कल्पून करावयाचें असें सरकारचें धोरण असतें, ती अर्थव्यवस्था. एकोणिसाव्या शतकापर्यंत विशुद्ध भांडवलवादाचा हिरीरीनें पुरस्कार करणारीं इंग्लंड-अमेरिका-आदि राष्ट्रें-देखील ह्या शतकांत संमिश्र अर्थव्यवस्था हीच योग्य असें म्हणूं लागलीं आहेत. इंग्लंडमध्यें परवांपरवांपर्यंत अधिकारारूढ असलेल्या मजूरसरकारनें तर या बाबतींत पुढाकार घेऊन वीज, खाणी व वाहातुकीचीं साधनें सरकारी मालकीचीं केलीं आहेत, व राष्ट्रांतील एकंदर आर्थिक व्यवहारावर सरकारी नियंत्रण दृढ केलें आहे. अमेरिकेंत (U.S.A.) अद्याप पोस्टाशिवाय इतर धंदे राष्ट्रीय मालकीचे नाहींत. पण १९३० सालानंतर आलेल्या आर्थिक मंदींत त्या राष्ट्राचादेखील विशुद्ध भांडवलवादावरील विश्वास उडून तेथें सर्व आर्थिक व्यवहारांवर सरकारी नियंत्रण घातलें गेलें आहे. तें परिपूर्ण नसेल, पण जेथें तत्पूर्वीं सरकारी नियंत्रणाची कल्पनादेखील सहन करवत नव्हती, तेथें असें नियंत्रण अवश्य आहे, अशी विचारसरणी बळावली आहे. सन १९३० सालीं भरपूर उत्पादन असतांना व एकंदर चलनविस्तार पुरेसा असतांनादेखील, भांडवलदारांना आपले कारखाने उत्पादित वस्तूंचा पुरेसा उठाव होत नाहीं म्हणून कायमचे बंद तरी करावे लागले, किंवा वर्षांतून कांहीं महिने बंद ठेवण्याची पाळी तरी आली. त्यामुळें बेकारी वाढली व पुष्कळशा लोकांना अर्धपोटी राहण्याची पाळी आली. अशी स्थिति असतांना कांहीं कांहीं देशांत भाव फायदेशीर येत नाहींत म्हणून जादा उत्पादनाचा नाश करण्यांत आला. लक्ष्मी व अवदसा या दोघींचें

शेजारीं शेजारीं वास्तव्य पाहून, भांडवलदारांचा स्वतःचा भांडवलवादी समाजव्यवस्थेवरील विश्वास डळमळीत झाला. अशा स्थितींत समाजाच्या निरनिराळ्या थरांतील आर्थिक विषमता कमी करून, प्रत्येकाच्या कमींत कमी गरजा भागविण्याकरितां जरूर तें उत्पादन वाढवून त्याचें यथायोग्य वांटप करण्याकरितां सरकारी हस्तक्षेपाची जरूरी आहे, हें सर्व विचारवंतांस पटलें आहे.

## जनकल्याणकारी सरकारचीं कर्तव्यें

प्रत्येकाच्या कमींत कमी गरजा भागवावयाच्या म्हणजे प्रत्येकास पुरेंसें अन्न, वस्त्र व आसरा मिळावा अशी तरतूद केली पाहिजे. एवढेंच नव्हे तर त्यास आजारीपणांत, बेकार स्थितींत व म्हातारपणांत मदत केली पाहिजे, हें ओघानेंच येतें. व या विचारांतूनच जनकल्याणकारी सरकारची ( welfare state ) कल्पना निघाली आहे. जनकल्याणकारी सरकार जनतेचें जीवनमान वाढवितेंच असें नव्हे; तर राष्ट्रांतील उत्पादित वस्तूंचें विभाजन तें अशा रीतीनें करितें कीं, प्रत्येकास त्याचा कमींत कमी अंश तरी मिळावा. राष्ट्रांतील जीवनमान ज्या त्या देशांतील एकंदर उत्पादनांतून भांडवली खर्च व निर्यात माल वजा जातां जें शिल्लक राहातें त्यावर अवलंबून असतें. वरील प्रकारें विभाजन केल्यानें अर्थातच ह्या शिल्लेकेंत कांहींहि भर पडणार नाहीं. तात्पर्य, जीवनमान वाढविण्याचा प्रश्न अशा सरकारनें केलेल्या विभाजनापासून अलग आहे. असें जरी असलें तरी कोणत्याहि सरकारचें लोकांचें जीवनमान वाढविणें हेंच ध्येय असतें, मग अशा जनताकल्याणास बद्धपरिकर झालेल्या सरकारचें तें अतिप्रकर्षानें असलें पाहिजे यांत दुमत असूं शकणार नाहीं. उत्पादित वस्तूंच्या योग्य विभाजनाबरोबर, अशा वस्तूंचें उत्पादन वाढविणें, हाहि अशा सरकारचा हेतु असतो.

## हिंद व जनकल्याणकारी सरकार

हिंदनें अशी जनकल्याणकारी सरकारची भूमिका घ्यावी कीं काय हा एक विचार करण्यासारखा मुद्दा आहे. जनमनांत हल्लीं ही कल्पना इतकी रुजली गेली आहे कीं, त्याविषयीं थोडेंदेखील प्रतिकूल बोलणें किंवा लिहिणें अप्रिय ठरेल. असें सरकार सर्वांस कमींत कमी शिक्षण फुकट देतें. ठिकठिकाणीं दवाखाने काढून स्वखर्चानें लोकांना औषध देतें. एखाद्याची कामधंदा करण्याची

इच्छा असूनहि त्यावर बेकार राहाण्याची पाळी आल्यास, त्यास बेकार–मदत देतें. म्हातारपणाची कोणासहि काळजी राहू नये म्हणून कमींत कमी रक्कम पेन्शन म्हणून देतें. व लहान मुलांची योग्य वाढ हा तर अशा सरकारच्या तिजोरीवरील पहिला बोजा. त्यांस शिक्षण व मधल्या वेळांत दूध फुकट देऊनच भागत नाहीं; तर ज्यांच्या घरीं जादा मुलें आणि उत्पन्न कमी, त्यांना प्रत्येक मुलामागें कांहींतरी रक्कम मदत म्हणून द्यावी लागते. इंग्लंडमध्यें दुसऱ्या मुलापासून प्रत्येक मुलास प्रत्येक आठवड्यास ५ शिलिंग अशी मदत म्हणून दिली जाते. यावरून सरकारला शिक्षण, आरोग्य, बेकारांस मदत व म्हातारपणची मदत म्हणून किती खर्च करावा लागेल याची कल्पना येईल. इंग्लंडनें या बाबतींत पुढारीपण घेतलें आहे, व तें राष्ट्र पूर्णपणें असें सरकार निर्माण करण्याची उमेद बाळगून आहे. तेथें हल्लीं अशा तऱ्हेचा सरकारी खर्च वर्षास १७० कोटी पौंड म्हणजे जवळजवळ २००० कोट रुपये किंवा हिंदमधील मध्य व राज्यसरकारच्या वर्षाच्या सर्व खर्चाच्या तिप्पट आहे. हिंदमधील सर्व सरकारांच्या १९५०–५१ अंदाजपत्रकांवरून सर्वांनीं मिळून त्या वर्षास ७५० कोट खर्च केलेला आहे. त्यांतील शिक्षण व आरोग्य या दोन बाबींवर वर्षास १०० कोट रुपयेदेखील खर्च नाहीं. इंग्लंडमध्यें अद्यापदेखील पूर्णपणें असें सरकार अस्तित्वांत आलेलें नाहीं. तशांतच इंग्लंडमधील ७ कोट लोकसंख्या, तेथील राहाणीचें मान व उत्पादन, यांची हिंदमधील ३५ कोट लोकसंख्या, राहाणीचें मान व उत्पादन यांशीं तुलना करतां, हिंदसरकारनें अशी पूर्णपणें जनकल्याणकारी भूमिका घ्यावयाची म्हटलें तर किती प्रचंड काम आपल्याला करावें लागेल याची सहज कल्पना येईल.

बरें, एकदां अशी भूमिका घेतल्यावर येथें लोकांनीं थोडें कांहीं झालें कीं, जा सरकारी डॉक्टरकडे, थोडें आजारी पडलें कीं घ्या सरकारकडून बेकारीपणाबद्दल मदत, किंवा कांहींहि झालें नसलें तरी आजारीपणाचें सोंग घेऊन अशी मदत घ्यावयाची, असे प्रकार होणारच नाहींत असें कोण सांगणार! कितीहि काकदृष्टीनें सरकारी कारभार चालविला, तरी सरकारी मदतीचा गैरफायदा घेणारे कांहीं हरीचे लाल भेटणारच. तसेंच बेकार-मदत व म्हातारपणचें पेन्शन मिळाल्यावर, लोकांना थोडें झटून झोंबून काम करावें, म्हणजे आपल्याला

म्हातारपणीं सुखाचे दिवस जातील, असें वाटण्याची जरूरीच नाहीं. याचा परिणाम उत्पादनावर होणारच. सामाजिकदृष्ट्या जरी बेकार-मदत व म्हातारपणाचें पेन्शन या गोष्टी इष्ट दिसत असल्या तरी त्याचा परिणाम उत्पादनावर झाल्या-शिवाय राहाणार नाहीं. इंग्लंडमध्यें असा परिणाम दिसून येण्याचें फारसें कारण नाहीं. तेथें तांत्रिक ज्ञानांत झालेली विलक्षण वाढ, लोकांत दिसून येणारी उद्योग-प्रियता, शिस्तप्रियता व सचोटी, यामुळें असा परिणाम दिसून येत नाहीं. उलट शिक्षण व आरोग्याविषयींच्या सरकारच्या जागरूकतेमुळें थोड्या कालावधींत तेथें एकंदर उत्पादनांत वाढच दिसून येण्याचा संभव आहे. हिंदमध्यें अद्याप उद्योग-धंद्यांची वाढ व्हावयाची आहे व बाकीच्या लोकशाहीस पोषक अशा वरील गुणांचीहि अद्याप जोपासना व्हावयाची आहे. यामुळें अशा तऱ्हेच्या सरकारची भूमिका येथील सरकारनें एकदम स्वीकारणें श्रेयस्कर ठरणार नाहीं, असें वाटतें. सध्यां शिक्षण व आरोग्य या बाबींकडे सरकार लक्ष देत आहे. त्यांवरच दरवर्षी थोडा जास्त जास्त प्रमाणांत भर देऊन, उद्योगधंद्यांत व त्याबरोबर उत्पादनांत जसजशी वाढ होईल तसतशी आजारीपण, बेकारी व म्हातारपणांत मदत देण्याकडे लक्ष देण्याचा प्रयत्न करणें, हें एकंदर राष्ट्रहिताच्या दृष्टीनें योग्य होईल.

या धोरणानें संमिश्र अर्थव्यवस्थेची कांस धरून त्यांतून हळूहळू म्हणजे सामान्यतः २० ते ३० वर्षांच्या काळांत पूर्णपणें जनकल्याणकारी सरकार हिंदमध्यें निर्माण करण्याची शक्यता उत्पन्न होण्याचे दृष्टीनें, सरकारच्या आर्थिक कर्णधारानें कोणत्या तत्त्वांवर सरकारी अर्थव्यवहाराचा गाडा हांकावा, याचें सामान्य विवेचन या पुस्तकांत केलेलें आहे. असें विवेचन म्हटलें कीं, सरकारी अर्थव्यवस्थेचा पूर्वेतिहास, तत्त्वविवेचन व नवी दिशा ह्या गोष्टी ओघानेंच आल्या. तत्त्वविवेचन करतांना प्रमाणित तत्त्वें अर्थातच या विषयावरील ग्रंथांतूनच घेतलीं आहेत. विवेचन मात्र आपल्या देशाच्या परिस्थितीनुरूप येथील उदाहरणें घेऊन व स्वतंत्रपणें मांडणी करून केलें आहे. या कामीं मला डॉ. डाल्टन, श्रीमती हिक्स, बेनहॅम, पिगु, कोल यांच्या निरनिराळ्या कृतींचा व इतर लेखकांच्या कांहीं लेखांचा उपयोग झालेला आहे. त्यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख येथें जरूर आहे.

हें सर्व विवेचन करतांना निरनिराळ्या करांच्या प्रत्यक्ष आकारणीच्या तंत्राचें ( Procedural & technical details ) विस्तृत विवेचन बुद्धयाच टाळलें

आहे. कारण अर्थव्यवस्थेच्या सर्वसामान्य तत्त्वांशीं व त्यांचें व्यवहारांत रूपांतर करण्याशीं या विस्ताराचा कांहीं संबंध नाहीं. असा विस्तार त्यांत प्रत्यक्ष काम करणाऱ्या तज्ज्ञांचा विषय आहे. अर्थशास्त्रज्ञ किंवा सामान्य वाचक यांस त्याशीं फारसें कर्तव्य नाहीं. जरूरीपुरतें विवेचन अर्थातच जागोजागीं केलेलें आहे.

## जनकल्याणकारी सरकार व समाजवादी सरकार

पूर्णपणें जनकल्याण करण्याचें कंकण समाजवादी सरकारच हातीं बांधूं शकेल, हें उघड दिसतें. समाजवादी सरकारचा उद्देश देशांतील सारीं उत्पादनसाधनें सरकारच्या मालकीचीं करून अधिकांत अधिक उत्पादन करून, त्याची यथायोग्य वांटणी करणें असा असतो. समाजांतील प्रत्येक घटकांत शक्यतों कमी आर्थिक विषमता असूं देणें व प्रत्येकाकडून त्याच्या कुवतीप्रमाणें काम घेणें व त्याच प्रमाणांत दाम देणें व त्याच्या आपत्कालची काळजी वाहाणें हेंच समाजवादी राजवटीचें ध्येय असतें. पूर्णपणें जनकल्याणकारी सरकारचेंहि ज्याच्या त्याच्या कुवतीप्रमाणें काम व त्या प्रमाणांत दाम देण्याचें व नागरिकांच्या आपत्कालची काळजी वाहण्याचें उद्दिष्ट असतें. फरक असलाच तर सारीं उत्पादनसाधनें सरकारी मालकीचीं असावींत, कीं त्यांतील कांहीं खाजगी मालकीचीं असावींत, याबाबतच असूं शकेल. पण थोडा विचार केला असतां याहि बाबतींत कांहीं मतभेद असण्याचें कारण नाहीं, हें दिसून येईल. समाजाच्या घटकाघटकांमधील आर्थिक विषमता कमी करणें हें जनकल्याणकारी सरकारचें इष्टसाध्य असतें. हें मान्य केल्यावर ती कमींत कमी असावी, हें ओघानेंच प्राप्त होतें. कमींत कमी आर्थिक विषमता, कुवतीप्रमाणें काम व त्या प्रमाणांत दाम याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि पद्धतींत असूं शकणार नाहीं. कांहीं उत्पादनसाधनें खाजगी मालकीचीं राहिल्यावर, त्यांपासून होणारा नफा, जादा आर्थिक विषमता निर्माण करूं शकेल. अशीं कांहीं उत्पादनसाधनें खाजगी मालकीचीं ठेविलीं, तरी त्यांपासून होणारा नफा 'कुवतीप्रमाणें काम व त्या प्रमाणांत दाम' या तत्त्वाप्रमाणें मिळणाऱ्या दामापेक्षां जादा असूं शकणार नाहीं. अशा तऱ्हेचें नियंत्रण सरकार त्यावर घालील असें म्हणावयाचें असल्यास, व तें शक्य कोटींतील आहे हें ठरत असल्यास, समाजवादी सरकाराचादेखील अशा खाजगी मालकीस विरोध असण्याचें कारण नाहीं.

## पुस्तकाचें नांव

तात्पर्य, संमिश्र अर्थव्यवस्थेमधून लोकशाही मार्गानें समाजवाद अस्तित्वांत आणणें शक्य आहे, हें दाखविण्याचा या लिखाणाचा उद्देश आहे. सरकारी अर्थसचिवानें, सरकारी अर्थव्यवहाराचा गाडा मात्र यांत दिग्दर्शित केलेल्या धोरणानें हांकला पाहिजे. लोकशाही मार्गानें जाणाऱ्या सरकारच्या अर्थव्यवहाराचें विवेचन या पुस्तकांत आलेलें असल्यानें या पुस्तकास 'लोकशाहीचा अर्थव्यवहार' असें नांव दिलेलें आहे. सरकारी अर्थव्यवहारास 'फडणिशी कारभार' म्हणण्याचा प्रघात आहे पण त्या शब्दप्रयोगावरून सरकारच्या अर्थविषयक धोरणाचा राष्ट्रांतील सर्व आर्थिक व्यवहारांवर कसा व्यापक परिणाम होतो, याचा बोध होत नाहीं. सरकारी अर्थव्यवहाराची सर्वव्यापकता दाखविण्याकरितां 'लोकशाहीचा अर्थव्यवहार' हें व्यापक नांव दिलेलें आहे.

कालिदासानें म्हटल्याप्रमाणें 'प्रांशुलभ्ये फले लोभादुद्बाहुरिव वामनः' बटुमूर्ति माणसानें उंच माणसाच्याच केवळ आंवाक्यांत येणाऱ्या फळास हात घालण्याचा प्रयत्न करावा, त्याप्रमाणें मींहि या शास्त्रांतील पूर्वसूरींनीं गाइलेल्याच तत्त्वांचें विवेचन माझ्या अल्पमतीप्रमाणें आपल्या मायबोलींतून केलें आहे. या कृतीस सहृदय वाचक आशीर्वाद देतील अशी अपेक्षा करून मी आपल्या लेखणीस तूर्त विराम देतों.

पुणें,
१५ ऑगस्ट १९५२

श्री. द. कुलकर्णी

# आभार

ह्या पुस्तकाच्या रचनेच्या कामीं मला माझ्या अनेक मित्रांचें, हितचिंतकांचें साहाय्य झालेलें आहे. त्या सर्वांचे येथें नामनिशीवार आभार मानणें स्थलाभावास्तव अशक्य आहे. तथापि कांहीं ठळक व्यक्तींचा उल्लेख येथें न करणें म्हणजे शुद्ध कृतघ्नपणा ठरेल.

श्री. त्र्यं. म. जोशी एम्. ए. बृहन्महाराष्ट्र कॉमर्स कॉलेजचे प्राचार्य व या विषयांतील महाराष्ट्रीय तज्ज्ञ, यांनीं या पुस्तकास 'प्रस्तावना' लिहून व श्री. पुराणिक उपप्राचार्य नासिक कॉलेज यांनीं 'अभिप्राय' लिहून आणि श्री. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ, माजी बांधकाममंत्रि, हिंदुस्थानसरकार, यांनीं 'पुरस्कार' लिहून मला अति उपकृत केलें आहे. ह्या सर्वांशीं माझी फारशी ओळख नसतां त्यांना या बाबतींत गोष्ट काढल्याबरोबर त्यांनीं अत्यंत आपुलकीनें सूचना करून व चार शब्द लिहून मला आपल्या सौजन्यानें लाजविलें आहे, त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें.

श्री. दि. के. देशपांडे एम्. ए., स. प. कॉलेजांतील अर्थशास्त्र या विषयाचे ट्यूटर यांनीं वेळोवेळीं सूचना देऊन, हस्तलिखित तपासून मला फारच मदत केली आहे. मी मूळचा संस्कृतचा विद्यार्थी त्यामुळें मला या विषयाची फार भीति वाटत होती. पण श्री. देशपांडे यांनीं स्वतां पीएच. डी. करितां तयारी करीत असतांहि, कधींहि कंटाळा न करितां माझ्या शंकांचें निरसन केलें व मला हें पुस्तक लिहिण्यास उत्तेजित केलें, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच.

श्री. वि. मो. पंत, बी. ए., माझे गुरुजी श्री. ना. वि. कुलकर्णी, एम्. ए., एम्. एड्., बी. टी. कॉलेजांतील प्राध्यापक यांनीं वेळांत वेळ काढून माझें हस्तलिखित, शुद्धलेखनाच्या दृष्टीनें तपासून दिलें त्याबद्दल त्यांचाहि मी आभारी आहें.

माझी पत्नी सौ. नीला व श्री. गो. दे. शर्मा एल्. एल्. बी., संपादक 'व्यापारीमित्र' ह्यांच्या प्रेरणेनें तर ह्या पुस्तकाची कल्पना सुचली. हिंदमधील लोकशाहीचा प्रयोग यशस्वी व्हावयाचा तर आम जनतेस राष्ट्राचा अर्थव्यवहार कसा काय चालतो याची स्थूल कल्पना पाहिजे. त्याकरितां अशा पुस्तकाची फार

जरुरी आहे व तसा प्रयत्न मीं करावा, असें सतत मला सुचवून हें पुस्तक लिहिण्यास या दोघांनीं मला प्रवृत्त केलें. त्यांचे आभार कसे मानावेत हेंच मला समजत नाहीं.

शेवटीं, व्हीनस बुकस्टॉलचे संचालक यांनीं मोठया हौसेनें या पुस्तकाच्या प्रकाशनाची जबाबदारी घेतली याबद्दल त्यांचेहि आभार मानणें जरूर आहे. प्रकाशकाविना नामवंत लेखकांसहि आपल्या कृति प्रकाशांत आणतां येणें अशक्य होतें, असा अनुभव आहे. अशा स्थितींत माझ्या पहिल्या प्रयत्नास त्यांच्या-सारखा उत्साही प्रकाशक भेटला हें मी माझें भाग्यच समजतों.

नाशिक
१०–१२–५२

श्री. द. कुलकर्णी

# अनुक्रमणिका

# लोकशाहीचा अर्थव्यवहार

## प्रकरण १ लें

## औद्योगिक क्रांतिपूर्व अर्थव्यवहाराचें धांवतें समालोचन

**१. विषयप्रवेश**—१५ ऑगस्ट १९४७ पासून हिंद हें स्वतंत्र राष्ट्र म्हणून अस्तित्वांत आलें. या सुवर्णकुंकुममंडित दिवसापासून येथें लोकशाहीच्या महान् प्रयोगास सुरवात झाली आहे. हिंदी लोकांनीं स्वतः निवडून दिलेल्या घटना-समितीकरवीं स्वतःची घटना तयार करून आम्ही आतां स्वायत्त प्रजासत्ताक राष्ट्र झालों अशी घोषणाहि ता. २६ जानेवारी १९५० रोजीं रीतसर केली गेली आहे. परकीय सत्तेच्या जोखडांत १५० वर्षें जखडलेली हिंदमाता हृष्टपुष्ट अशा बालकास जन्म देणें शक्यच नव्हतें. त्यामुळें हें नवीन प्रजासत्ताक बालक तोंडांत चांदीचा चमचा घेऊन जन्माला आलेलें नाहीं, हें सांगावयास पाहिजेच अशांतला भाग नाहीं.

पं. नेहरूंच्या नेतृत्वाखालीं हिंद आपला कायापालट करण्याच्या उद्योगास नेटानें लागला आहे. परंतु मुळांतच जनतेच्या अपेक्षा स्वातंत्र्यानंतर एकदम कांहीं तरी याक्षिणीच्या कांडीनें फेरबदल होऊन चांगले दिवस येतील, अशा तऱ्हेच्या असल्यानें एकंदर जनमन उतावळें झालें आहे. त्यांतच गेल्या ५।६ वर्षांच्या अनुभवानें सद्यःदुःस्थितींत कांहीं बदल पडेल कां नाहीं, याविषयीं जनता साशंक बनत चालली आहे. गेल्या वर्षापेक्षां नवीन वर्ष सुखाचें जाईल, अशी अपेक्षा करावी, पण कराचा बोजा वाढावा, पण त्या प्रमाणांत सुखसोईंत भर पडण्याच्या

ऐवजीं उलटच अनुभव यावा, असा प्रकार गेलीं ५।६ वर्षें सतत चालला आहे. अशा स्थितींत ' नकोत हे कर ना कंट्रोल. या ' क ' ' क ' च्या फेऱ्यांतून सुटूं तो सुदिन ! ' असे त्रासिक उद्गार काढतांना प्रत्येकजण आढळून येतो.

**२. कर व त्यांची जरूरी**—कंट्रोल किंवा कर हे मुळांतच वाईट आहेत असें कोणी म्हणूं शकणार नाहीं. कंट्रोल हा शब्दप्रयोग नवीन आहे. पण ' कर ' या शब्दाचें तसें नाहीं. मानवी समाज रानटी अवस्थेंतून बाहेर येऊन जसजसा सुसंस्कृत बनून घरें बांधून राहूं लागला, तसतसा ' कर ' हा जास्त जास्तच त्याचे पाठीमागें लागला आहे. नव्हे, त्यानें आपणांस सुखा-समाधानानें राहातां यावें म्हणून, त्याकरितां द्यावा लागणारा एक प्रकारचा वाढत्या श्रेणीचा दंडच कबूल केला आहे. मानव घरें बांधून राहूं लागल्यावर, बांधलेलें घर दुसऱ्यानें पाडूं नये, उगाच कोणीं कोणाचा प्राण घेऊं नये अशा तऱ्हेची व्यवस्था करणें त्यास भाग पडलें; व हें उद्दिष्ट साधण्याकरितांच शासनसंस्थेची जरूरी त्यास भासूं लागली. शासनसंस्था म्हटली कीं, तिचा खर्च चालविण्याची जबाबदारीहि आपोआप आलीच. असा खर्च चालविण्याचा प्रत्येक कुटुंबाचा किंवा [1]घटकाचा वांटा म्हणजेच कर. या अनुरोधानेंच शासनसंस्थेचा प्रमुख जो राजा, त्याचें वर्णन काव्यांतहि ' षष्टांशभागो हरः ' म्हणजे ' प्रजेच्या उत्पन्नाचा सहावा भाग घेणारा ' असें होऊं लागलें. तेव्हां कर देण्याच्या जरूरीबद्दल कोणाचें दुमत असेल, असें सामान्यतः शक्य नाहीं. दुमत असलेंच तर तो कसा वसूल करावा किंवा किती असावा याबद्दल असूं शकेल.

प्राचीन कालीं कुटुंबाच्या उत्पन्नाच्या सहावा भाग राजास राजकार्याबद्दल द्यावा अशी पद्धति होती, असें ' षष्टांशभागो हरः ' या शब्दप्रयोगावरून दिसून येतें. अशा रीतीनें करभार हरण करून, राजा प्रजेचें अंतर्गत व बाह्य शत्रूपासून रक्षण करीत असे. अगदीं प्राथमिक समाज-अवस्थेंत राज्यामध्यें शांतता व सुव्यवस्था एवढ्याच बाबतींत राजकर्तव्य मर्यादित होतें. पुढें जसजशी मानवी व्यवहारामध्यें प्रगति होत गेली, तसतशी या कर्तव्यांतहि वाढ होत गेली. त्या मानानें राज्य-

---

१. घटक हा शब्द एखादी खाजगी किंवा सार्वजनिक व्यापारी मंडळी या अर्थी येथें योजिला आहे.

कारभाराच्या आर्थिक गरजाहि वाढत गेल्या. या वाढीबरोबर प्रजेवरील राजदेणें –अर्थात् कर–हेंहि वाढलें. ही जादा वाढ ज्या विशिष्ट बाबतींतच प्रजेच्या सुख-सोयी वाढवावयाच्या त्या बाबतींतच विशिष्ट कर आकारून वसूल करण्यांत येऊं लागली. अशा रीतीनें जसजशी मानवी व्यवहारांतील गुंतागुंत वाढूं लागली. तसतशी करपद्धतींतहि गुंतागुंत होऊं लागली. या क्रमानेंच हल्लीं करपद्धतीस कमालीचें जिकिरीचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

**३. प्राचीन करपद्धतींचें विहंगमावलोकन**—प्राचीन कालांतील कर-पद्धतींचें विहंगमावलोकन करणें झाल्यास असें दिसून येईल कीं, इसवीसनाच्या आरंभींच्या कालांत, ( १ ) सर्वसाधारण राज्यव्यवस्थेकरितां लागणारा कर, ( २ ) नगरपालिका. कर, व ( ३ ) पाटबंधाऱ्यांच्या पाण्याच्या उपयोगाबाबतचा कर, असे तीन प्रकारचे कर प्रचलित असावेत, असें वाटतें. याबाबत थोडाबहुत प्रकाश कौटिल्याचा अर्थशास्त्र या ग्रंथांतून व मोहेंजोदारो व हराप्पा या प्राचीन शहरांचें उत्खनन करून उपलब्ध झालेल्या अवशेषांवरून मिळतो. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत व्यापारी मंडळ्यांची स्थापना व कारभार यांबाबत विवेचन आहे. अशा मंडळ्यांनीं तयार केलेले नियम उल्लंघिल्यास दंड सांगितला आहे. हा दंड व या मंडळ्यांनीं आपल्या सभासदांकडून वसूल केलेली वर्गणी यांतून या मंडळ्यांचा कारभार चाले. ह्या करांचें स्वरूप नगरपालिकाकरासारखें विशिष्ट कामगिरीकरितां विशिष्ट कर यासारखें असावें. पाटबंधाऱ्यांच्या पाण्याचा उपयोग करण्याबाबतचा कर सोडून इतर कर सर्वसाधारण राज्यव्यवस्थेकरितां आकारले जात नसावेत. सर्वसामान्य करांतून किंवा गुन्ह्याबाबत शिक्षा म्हणून वसूल होणारा दंड यांतूनच मोठमोठे रस्ते बांधणें, धर्मशाळा बांधणें अशीं सार्वजनिक सुखसोयीचीं कामें केलीं जात असावींत. कौटिलीय अर्थशास्त्रांत वरील करांशिवाय इतर करांचा उल्लेख नाहीं. यावरून वरील अनुमान बांधण्यास हरकत दिसत नाहीं.

कौटिलीय अर्थशास्त्रांत राजाच्या कर्तव्यांची नोंद आहेच व तदनंतर त्यास लागणारा पैसा कसा गोळा करावा याबाबतहि सूचना आहेत. नेहमींच्या करां-व्यतिरिक्त जरूर पडल्यास वाम समजल्या जाणाऱ्या मार्गांचादेखील उपयोग करण्यास हरकत नाहीं, असें आर्यचाणक्याचें उघड उघड प्रतिपादन आहे. एखादा मनुष्य फार श्रीमंत असल्यास व सुखासुखी पैसा देण्यास तयार नसल्यास

प्रथम त्यास राजशत्रु असें जाहीर करून त्यावर मारेकरी घालून मग पैसा हस्तगत करावा. किंवा लोकांच्या धर्मभोळ्या समजुतींचा गैरफायदा घेऊनहि पैसा गोळा करावा. उदाहरणार्थ, एखाद्या चिंचेच्या झाडाच्या ढोलींत दैवी नाग अवतरला आहे, असें राजपुरुषांनीं ( राजपुरुष = सरकारी नौकर ) जाहीर करून त्यांनीं स्वतः खूप मोठमोठे नजराणे, सरकारी खजिन्यांतून पैसे उचलून त्या नागापुढें ठेवावेत. ( वास्तविक तो नाग त्या राजपुरुषांनींच मुद्दाम नेऊन त्या ढोलींत ठेवलेला असतो. ) व अशा रीतीनें सामान्य लोकांसहि तसें करण्यास उद्युक्त करावयाचें, व जमेल तो पैसा शेवटीं सरकारी खजिन्यांत जमा करावयाचा, असा त्यावेळीं शिरस्ता असे. थोडक्यांत–' वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा '–नृपनीति वेश्येप्रमाणें सामान्य लोकांना भुलवून जरूर तो पैसा गोळा करण्यास मदत करणारी असावी, असा त्याचा दंडक आहे. आपल्या साम्राज्य-सरकारनें देखील दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत आधुनिक जगांतील स्टंट म्हणून लॉटरी बॉंडस् काढले होते, तेहि याच न्यायानें. याशिवाय युद्धनिधि ( War-Fund ) जमविला तो वेगळाच. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जेव्हां राष्ट्राची गरज वाढते व अन्य मार्ग खुंटतात, तेव्हां युक्तायुक्त मार्गांचा विचार न करितां जो सहज साध्य असेल तो मार्ग चोखाळावा असा प्राचीन व अर्वाचीन राज्यकर्त्यांचा दंडक आहे. अर्थात् अशा अशास्त्रीय व हडेलहप्पी प्रकारास अर्थशास्त्रज्ञांचा विरोध असणें अपरिहार्य आहे. त्यांचा अशा प्रकारास कसून विरोध असल्यानें हल्लीं हे प्रकार क्वचितच दिसून येतात.

नगरपालिका–कराचा उल्लेख वर आलाच आहे. यासारखे कर असावेत, असें अनुमान चिनी प्रवासी ह्यू–एन–त्संग याच्या त्यावेळच्या प्रथितयश पाटलीपुत्र ( पाटणा ) या राजधानीच्या शहराच्या वर्णनावरूनहि बांधतां येतें. या शहरांतून मोठमोठीं उद्यानें, पोहण्याचे तलाव, बंगल्याभोंवतीं मोकळी जागा, या आधुनिक संस्कृतींत आवश्यक समजल्या जाणाऱ्या गोष्टींचा अंतर्भाव आढळतो. अर्थात् अशा गोष्टी या प्रकारच्या कराशिवाय होणें शक्य नाहीं. असा पैसा सामान्य राज्यकारभार–करांतून खर्च करणें शक्य होणार नाहीं. या विशिष्ट बाबीं-करितां अशा तऱ्हेचा विशिष्ट करच असावा असें वाटतें. अर्थशास्त्रांतून शहरांची आंखणी, त्यांतील घरांची बांधणी याविषयीं विस्तृत नियम केलेले दिसून येतात.

यावरून त्याकरितां लागणाऱ्या खर्चाची तरतूद अशा विशेष रीतीनें केली असणें अगदीं शक्य आहे.

सारांश, प्राचीन काळींहि हल्लींच्याप्रमाणेंच करांचें सर्वसामान्य स्वरूप होतें असें दिसून येतें. हल्लीं जेवढ्या गुंतागुंती आढळून येतात, तेवढ्या त्यावेळीं नव्हत्या, पण मूळ कल्पना साधारण त्याच होत्या, असें ' प्राधान्येन व्यपदेशः ' या न्यायानें म्हणण्यास हरकत नाहीं.

आधुनिक लोकशाहीसारखी राजवट प्राचीन हिंदुस्थानांत नव्हती. तथापि अनियंत्रित राजसत्ता त्या काळींहि नव्हती. ' ना विष्णुः पृथिवीपतिः '– राजा हा आमचा विष्णु ( परमेश्वर ) आहे, व परमेश्वर म्हणजे पित्याप्रमाणें मुलांची काळजी वाहाणारा, अशी आपली कल्पना आहे. यावरून व राजाचें लोकरंजन–प्रजेचें हित–हेंच प्रधान कर्तव्य होय, असा राजनीतिशास्त्रकारांचा एकमुखी आदेश होता. यावरून लोकानुवर्ति राजसत्ता हीच कल्पना लोकमान्य होती, असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. जेव्हां एखादा राजा जुलमानें राज्य करूं लागे, तेव्हां प्रजा त्यास राजपद सोडण्यास भाग पाडी व दुसरा राजा निवडी, असे प्रकार घडल्याचे ऋग्वेद व महाभारतांत उल्लेख आढळून येतात. तात्पर्य, लोकशाहीच्या मूळ कल्पनाहि तेव्हां रूढ होत्या. यामुळें वर उल्लेखिलेले कर प्रजेपासून वसूल करण्यांत येत व प्रजेचाहि त्यास फारसा विरोध असण्याचें कारण नव्हतें.

**४. चीनमधील करपद्धति**—जवळ जवळ गेल्या शतकापर्यंत हिंदुस्थाना-प्रमाणेंच चीनमध्येंहि करव्यवस्था होती, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. भारताप्रमाणेंच चीन हाहि सांस्कृतिकदृष्ट्या अतिप्राचीन काळापासून पुढारलेला देश आहे. गेल्या १।२ शतकांचा इतिहासच काय तो पूर्वींच्या इतिहासाशीं तौलनिक-दृष्ट्या पाहातां फिका वाटतो. भारताशींच तुलना करावयाची तर, कांहीं बाबतींत चीन हा भारतापेक्षांहि थोडा जास्त पुरोगामी होता, असें म्हटलें तर तें फारसें वावगें ठरणार नाहीं. मानवामानवांमध्येंच जन्मावरून फरक करणारे जातिभेद तिकडे केव्हांहि राजमान्य झालेले नव्हते व नाहींत, हा त्या संस्कृतीचा विशेष आहे.

अलीकडील काळांत इंग्रजांनीं जशी भारतांत जमीनदारी पद्धति निर्माण केली तशी तिकडेहि ह्याच काळांत सुरू झाली. पण तीहि नव्या कम्युनिस्ट राजवटींत चुटकीसरशी नष्ट पावली आहे.

**५. मध्यपूर्वेतील करपद्धति**—सध्यां मध्यपूर्व म्हणून परिचित असलेल्या इजिप्त, ग्रीस, तुर्कस्तान, सिरिया आदि देशांतील त्यावेळच्या समाजरचना व करपद्धतींकडे दृष्टिक्षेप केल्यास थोडासा निराळा प्रकार दिसून येईल.

इजिप्शियन संस्कृति आपल्याकडील वैदिक संस्कृतीइतकी जुनी आहे. इजिप्त, ग्रीस व भारत त्या अतिप्राचीनकाळीं ज्या वैभवानें तळपले, तसा काळ त्या देशांबाबत त्यानंतर अद्यापहि आला नाहीं, असें म्हटलें तर तें ऐतिहासिक सत्याला धरूनच होईल यांत संदेह नाहीं. ह्या तिन्ही संस्कृतींतील लोक एकेकाळीं पामीरच्या पठाराच्या आसपासच्या देशांत एकत्रच राहात असावेत, असें प्राचीन इतिहासतज्ज्ञांचें अनुमान आहे. ह्या एकाच वृक्षाच्या फुटलेल्या तिन्ही शाखांनीं जवळ जवळ सारखीच अशी उदार सांस्कृतिक परंपरा त्यावेळीं निर्माण केली. देशकालस्थितीप्रमाणें थोडाबहुत फरक असणें अपरिहार्यच असतें. इजिप्शियन संस्कृतींत राजा हा देवदूत नव्हे प्रतिदेवच अशी समजूत दृढ होती. देव मानवांवर सुखाची खैरात करतो, अशी त्यांची श्रद्धा होती. त्यामुळें राजाप्रजेचें नातें आपल्याप्रमाणें पितापुत्राप्रमाणें जरी मानलें गेलें नव्हतें, तरी एकंदरींत सुखदाता हुकुमशहा व प्रजा असें तें नातें होतें. तेव्हां राजदेणें-कर-दिल्यावर राजा हा प्रजेच्या हिताकरितांच झटे.

ग्रीक किंवा हेलेनिक संस्कृतीमध्यें याहून थोडासा निराळा प्रकार दृष्टोत्पत्तीस येतो. या संस्कृतींत आधुनिक लोकशाहीचीं बीजें दिसून येतात. राजा ही सामान्यतः निवडून दिलेलीच व्यक्ति असे. व जोंपर्यंत कर्तबगार पुरुष एका वंशांत निर्माण होत, तोंपर्यंत राजपद वंशपरंपराच असे. समाजरचना मात्र त्या काळच्या इंग्लिश पद्धतीसारखीच होती. याविषयींची माहिती खालीं परिच्छेद ६ मध्यें दिलेली आहे. गुलामगिरीहि अस्तित्वांत होतीच; पण गुलामांच्या बाहेरचाहि स्वतंत्र समाज बराच मोठा होता. रशियाइतका गुलामांचा मोठा वर्ग जरी नव्हता, तरी जो गुलामवर्ग होता, तो रशियांतील जमीनदारांच्या [१]कुळांपेक्षां परतंत्र होता. राबणाऱ्या बैलांपेक्षां त्यास जास्त किंमत नव्हती. गुलामांची खरेदी-विक्री उघड्या बाजारांतहि होई. असें जरी होतें तरी गुलाम सोडून बाहेरचा वर्गहि संख्येनें

---

१ हीं कुळें हाच रशियांतील गुलामवर्ग.

मोठा असल्यानें, तो राज्यकारभारांत आपलें वजन पाडूं शकत असे. त्यामुळें राजदेणें–कर–हेंहि आपल्या इकडीलप्रमाणें ठराविकच असे, व त्याचा उपयोग मुख्यतः जनतेच्या हिताकरितांच केला जात असे.

तैग्रीस युफ्रेटिस या नद्यांच्या कांठीं म्हणजे हल्लींच्या तुर्कस्तान, सिरिया या भागांत त्या काळीं बाबिलोनियन साम्राज्य होतें. त्यांचा नांव घेण्यासारखा बादशहा हमुराबी हा होऊन गेला. यानें देखील आर्यचाणक्याप्रमाणें राज्यव्यवस्थेचें एक कोडच तयार केलें होतें. त्यांत राज्यांतील न्यायखात्याच्या व्यवस्थेवर त्यानें फार भर दिलेला आहे. यावरून त्या अति प्राचीनकाळीं जुलूमजबरदस्तीनें कर प्रजेपासून वसूल केले जात नसावेत असें दिसतें. पण हा प्रकार इसवीसनाच्या ५।६ व्या शतकापासून बदलत चालला. पुढें इस्लामच्या उदयानंतरच्या काळांत तर तेथील टोळ्याटोळ्यांनीं अल्लाच्या नांवाखालीं लूटमार करण्याचेंच धोरण स्वीकारलें. गांवेंच्या गांवें उध्वस्त करावयाचीं, जें मिळेल तें व जें नेतां येईल तें लुबाडून न्यावयाचें, असा प्रकार जवळ जवळ १३।१४ व्या शतकापर्यंत चालू होता. मोंगल टोळयांतील कुबलाईखान यानें चीनमध्यें व बाबर यानें अफगाणिस्तान ते पंजाबपर्यंत व्यवस्थित राज्य स्थापन केलें. पण या अपवादात्मक घटनांव्यतिरिक्त आर्थिक वा सामाजिक असा लूटमारीशिवाय दुसरा इतिहास मध्यपूर्वेत मध्ययुगीन काळांत ह्या टोळीवाल्यांनीं मागें ठेवलेलाच नाहीं, असें म्हटलें तर तें फारसें अतिशयोक्तिपूर्ण ठरेल असें वाटत नाहीं.

**६. पाश्चात्य राष्ट्रांतील सरंजामशाही व त्यास अनुकूल करपद्धति**—इसवी सनापूर्वींच्या व प्रारंभींच्या काळांत इंग्लंड, फ्रान्स आदि देशांत सरंजामशाही समाजव्यवस्था होती. एक किंवा अनेक खेड्यांचा मालक तो लॉर्ड किंवा सरदार. त्यानें त्या खेड्यांतील सर्व जमिनीची व्यवस्था पहावयाची. बहुधा साऱ्या जमिनीची मालकी या सरदारांचीच असे. पण कांहीं कांहीं हुशार कुळें आपल्या कर्तबगारीवर स्वतःहि कांहीं जमीन या सरदारांकडून खरेदी करीत. त्यावर त्यांची संपूर्ण मालकी चाले. मात्र त्यांचेवरहि सरदाराच्या जमिनीवर राबण्याचें बंधन असे. त्याबद्दल त्यांना नाममात्र मोबदला मिळे. बाकी सर्व लोकांना सरदारांचीं कुळें म्हणून त्यांची जमीन कसावी लागे. त्या कुळांना जेमतेम कुटुंबपोषणाइतकें धान्य शिल्लक ठेवावयाचें, व बाकी सर्व उत्पन्न सरदार स्वतः-

करितां घेत असे. इंग्रजांनीं प्रथम हिंदुस्थानांत पाय रोंवल्यावर जी बंगालमध्यें कायमधारापद्धति सुरू केली, व त्याअन्वयें जे जमीनदार निर्माण झाले, त्या तऱ्हेचेच हे सरदार. या सरदारांनीं आपापल्या खेड्यांत धान्य भरपूर पिकतें कीं नाहीं एवढयापुरतीच काळजी वाहावयाची व जें येईल तें उत्पन्न स्वतःच्या चैनीकरितां खर्च करावयाचें. अर्थात् त्यांतून राजदेणें द्यावयालाच हवें. तें त्या खेड्याच्या उत्पन्नाचा कांहीं भाग असे.

यावरून हें लक्षांत येईल कीं, राजास प्रत्यक्ष जनतेकडून कर वसूल करण्याची केव्हांच गरज भासत नसे; कारण जनतेस जनता किंवा प्रजा असें स्वरूप नसून, सरदारांचीं राबणारीं कुळें यापलीकडे त्यांना राज्यव्यवहारांत कांहीं स्थान नसे. जोंपर्यंत सरदारलोक राजनिष्ठ आहेत, तोंपर्यंत राजास देखील प्रजेची कदर करण्याचें कारण नसे. सरदारांनाहि राजा जोंपावेतों त्यांच्या दैनंदिन व्यवहारांत व चैनींत अडथळा आणीत नाहीं, तोंपर्यंत राजनिष्ठ राहण्यास अडचण पडत नसे. अंतर्गत बंडाळी किंवा परचक्राचें आक्रमण, अशा आपत्तींत या सरदारांना जादा करभार देण्याची पाळी येई. पण त्यावेळीं त्यांच्या स्वतःच्या अस्तित्वासच धोका येण्याचा संभव असल्यानें, स्वतःच्या हितसंबंधास बाध न येईल अशा बेतानें ज्या परिस्थितींत जें योग्य वाटेल तें ते करीत.

हलकें हलकें हें स्वरूप बदलत जाऊं लागलें. राजे जसे जुलमी बनूं लागले व जसजसा व्यापार वाढीस लागून व्यापारी लोक श्रीमंत बनूं लागले, तसतसें या सरदारांनाहि या नवोदित सधन व्यापारी वर्गाशीं संधान बांधून, राजाच्या जुलमी कारभारास आळा घालण्याची जरूरी भासूं लागली. राजा आणि प्रजा यांमधील झगड्याचा हा इतिहास इंग्लंडच्या कोठल्याहि शालेय इतिहासांत पहावयास मिळेल. आपण एवढेंच लक्षांत घेऊं या कीं, इंग्लंडच्या जॉन राजानें सन १२१५ सालीं जाहीर केलेल्या मोठ्या सनदे-( मॅग्नाचार्टा )-पर्यंतच्या काळांत, करवसुली सरंजामदारांकडून राजाच्या गरजेप्रमाणें व त्यांच्या उत्पन्नाचा कांहीं भाग असे. आपल्याकडे जशी करपद्धति बनून गेली होती व त्यामुळें प्रजेस आपला कराचा बोजा आगाऊच निश्चित कळे, निदान सामान्यवर्गीयांस तरी राजपुरुष जुलमानें आपणांकडून जास्त कर वसूल करतील अशी भीति नसे, तशी पद्धति तिकडे नव्हती; असें सामान्यतः म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

राजदेण्याची ही पद्धति झाली. याशिवाय कालव्याच्या पाण्यावरील कर तिकडे नसावा असें दिसतें. एक्तर अवर्षण किंवा अतिवर्षण यांमुळें आपल्या इकडील शेतकऱ्यांस जशी वरुणाची करुणा भाकण्याची पाळी दरवर्षी येते, तशी स्थिति तिकडील हवामानामुळें तिकडे येत नाहीं. बाराहि महिने जरूरीपुरता थोडासा पाऊस तिकडे पडतोच, त्यामुळें कालव्याची अशी गरज भासत नाहीं. आणि दुसरें म्हणजे पाश्चात्य राष्ट्रें[1] इतकीं लहान आहेत कीं, एक नदी अनेक राष्ट्रांतून वाहाते. त्यामुळें नदीच्या पाण्यावर हक्क कोणाचा याबाबतहि वाद माजण्याचा न जाणों संभव निर्माण होईल या कल्पनेनेंहि याबाबत कोणीं लक्ष घातलें नसावें. आंतरराष्ट्रीय सहकार्याच्या भावनेचा उदय ही घटना आधुनिक आहे.

टोल किंवा जकात यांसारखे म्युनिसिपल कर मात्र व्यापारवाढीबरोबर तिकडेहि त्याकाळीं अस्तित्वांत आले होते.

याप्रमाणें करव्यवस्था सामान्यतः सर्व पाश्चिमात्य राष्ट्रांत चालू होती. मात्र देशपरत्वें थोडा थोडा फरक असे. फ्रान्स देशांत राजपुरुषच कर वसूल करी, पण तो मक्तेदारी पद्धतीनें तें काम करी. राजाकडून अमुक गांवचा अमुक कर वसूल करण्याचा परवाना मिळवावयाचा व जितका वसूल करितां येईल तितका करावयाचा. उदाहरणार्थ कॅले शहराकडून २०,००० फ्रँक्स् ( फ्रेंच नाणें ) वसूल करण्याचा मक्ता घ्यावयाचा. एवढा वसूल तर करावयाचाच, पण स्वतःच्या तनख्यादाखल, राजाची इतराजी होणार नाहीं, एवढी दक्षता बाळगून, त्यापेक्षां जेवढा जास्त वसूल करितां येईल तेवढा करावयाचा. या पद्धतीनें प्रजेवर जुलूम जास्त होत असे. त्यास आळा घालण्याकरितां ठराविक उत्पन्नावर ठराविक रकमेपेक्षां जास्त कर वसूल करूं नये, असा पुढें पुढें दंडक घालण्यांत आला होता.

---

१ येथें युरोपीय राष्ट्रांचाच उल्लेख अभिप्रेत आहे. अमेरिकेचा इतिहास कोलंबसापासून म्हणजे पंधराव्या शतकापासूनच उपलब्ध आहे. यापूर्वी त्या देशास कांहीं सांस्कृतिक इतिहास असावा, अशी माहिती अद्याप तरी प्रगट झालेली नाहीं. दक्षिण अमेरिकेंत पेरू हा देश व उत्तर अमेरिकेंत मेक्सिको हा देश ह्या दोन्ही देशांतील समाजरचना त्यावेळच्या सुधारलेल्या राष्ट्रांच्या तोडीची होती. तेथील अर्थव्यवस्था आपल्याकडीलप्रमाणेंच असावी, असें अनुमान, हिंदचें दळणवळण त्या देशांशीं होतें, यावरून काढतां येणें शक्य आहे.

इंग्लंड, फ्रान्स आदि देशांतून निव्वळ गुलामगिरीची अशी पद्धति नव्हती. जमीनदारांच्या जमिनीवर राबणारीं कुळें असा जरी शेतकऱ्यांचा दर्जा होता, तरी ते जमीनदारांचे गुलाम नव्हते. पण रशियांत मात्र जवळ जवळ १८।१९ व्या शतकापर्यंत जमीनदारांच्या कुळांना स्वतंत्र अस्तित्व बिलकुल नव्हतें. वंशपरंपरा बायकामुलांसहित सरदार–जमीनदारांच्या जमिनीवर कुळानें राबणें व त्या मोबदल्यांत सरदार–जमीनदारांनीं त्यांना अन्नपाणी व कपडालत्ता यांसारख्या प्राथमिक गरजा अगदीं जरूरीच्या प्रमाणांत पुरविणें, अशी स्थिति रशियांत होती. यामुळें तेथें तर अगदींच निवडक लोकांकडून कर वसूल करण्याची जरूरी भासे. या गुलामगिरीची तेथील शहाण्यासुर्त्या लोकांना चीड येऊन त्यांच्या प्रोत्साहनानें राजा-प्रजा, सरदार-प्रजा असे झगडे होऊन त्याची परिणति सध्यांच्या कम्युनिस्ट समाजरचनेंत झाली आहे.

**७. औद्योगिक क्रांतिपूर्व अर्थव्यवस्था कृषिप्रधान असून, परस्पर सहकार्यावर आधारलेली**—वरील सर्व विवेचनावरून असें दिसून येईल कीं, औद्योगिक क्रांतिपूर्व काळांत कृषिप्रधान अर्थव्यवस्था असल्यानें सामाजिक रचनाहि त्याअनुसार प्राधान्येंकरून परस्पर सहकार्यावर आधारलेली होती. देशपरत्वें थोडा फरक होता, नाहीं असें नाहीं. पाश्चात्य देशांत जमीनदारवर्ग हा राज्यकर्ता व बाकीचा अर्धवट गुलामगिरींनच असे. पण सांस्कृतिक प्रगतीबरोबर त्यांतहि थोडा थोडा इष्ट असा बदल होत होताच. एकंदरींत, गोम्यानें सूत कांतावें, सोम्यानें विणावें, चिम्यानें नांगरावें व जमीनदारानें व्यवस्थापकाचें काम करावें अशी कामाची विभागणी असे. त्यामुळें अलीकडील काळाप्रमाणें दोन व्यक्तींच्या उत्पन्नांत जमीनअस्मानाचें अंतर केव्हांच नसे. जमीनदारांसहि नेहमीं कुळांतच वावरावें लागत असल्यानें त्यांच्या सुखदुःखांतहि त्यांना भागीदार व्हावेंच लागे. हल्लींप्रमाणें कारखानदार मलबारहिलवरील बंगल्यांत व मजूर परळमधील चाळींत व एकाचा दुसऱ्याशीं उभ्या जन्मांत तोंड पहाण्यापुरतादेखील संबंध नाहीं, असें बिलकूल नसे. हिंदमध्यें तर परवांपरवांपर्यंत बारा बलुत्यांची पद्धति अस्तित्वांत होती, व अद्यापहि खेड्यापाड्यांतून थोड्याफार फरकानें ती दिसून येते. तसें न केलें तर एकंदर समाजाचा व्यवहारच अडून राही. परस्पर पूरक असें कार्य सर्वांना करावेंच लागे. समाजांत निव्वळ ऐतखाऊ म्हणजे समाजास आर्थिक, सामाजिक, नैतिक,

शैक्षणिक, राजकीय किंवा धार्मिक असा कोणत्यादि बाबींत उपयोगी न पडणारा वर्ग त्यावेळच्या समाजरचनेंत निर्माण होणेंच असंभवनीय असे. तसा संभव निर्माण झाल्यास ताबडतोब जनतेंत त्याविषयीं क्षोभ निर्माण होई; व समाजांत निर्माण होऊं पाहाणारी सामाजिक विषमता व त्याबरोबर आर्थिक विषमता पुन्हां पूर्व पातळीवर येई. हिंदमध्यें बौद्ध, जैन किंवा लिंगायत धर्मांच्या उदयास या विषमताच कारणीभूत झाल्या. हिंदपुरतें बोलावयाचें झाल्यास ते धर्म जरी पुन्हां व्यापक हिंदुधर्माचे सन्माननीय भाग बनले, तरी त्यांनीं आपलें विषमता कमी करण्याचें ऐतिहासिक कार्य तत्पूर्वींच पूर्ण केलेलें होतें. युरोपांत देखील राष्ट्राच्या उत्पन्नांत भर न घालणाऱ्या व स्वस्थ बसून खाणाऱ्या लोकांविरुद्ध चळवळी होत. 'जेव्हां मनु विणी व अदिति सूत कांते, तेव्हां सभ्यगृहस्थ[1] कोण होता?' (When Adam wove & Eve span who was then the gentleman?) असें मध्ययुगीन युरोपांतील ऐतखाऊ जमीनदारांविरुद्ध चालविलेल्या चळवळींतील घोषवाक्य होतें. आपल्याकडेदेखील वैदिक काळापासूनच परस्पर सहकार्यावर भर दिला जात असे. 'सह नाववतु, सह नौ भुनक्तु, सह वीर्यं करवावहै।' सहकार्यानें एकमेकांचें रक्षण करूं, सर्वजण मिळूनच राष्ट्रीय संपत्तीचा उपभोग घेऊं, सर्वांच्या एकजुटीनें पराक्रम गाजवूं व देश भराभराटीला नेऊं, असें हें वैदिक घोषवाक्य आहे.

तात्पर्य, सर्व अर्थव्यवस्था कृषिप्रधान असल्यानें आर्थिक विषमतेस वाव कमी असे. पाश्चात्य राष्ट्रांतदेखील गुलाम हा वर्ग सोडला तर इतरांत हल्लींइतकी विषमता असण्याची शक्यता कमी होती. विषमतेंतील तफावत वाढत चालल्यास लोकक्षोभ निर्माण होई व पुन्हा ती पूर्ववत् होई.

औद्योगिक क्रांतीनंतरच्या काळांत सर्वच पारडें फिरलें. व्यक्तिस्वातंत्र्याचा उदय झाला, व परस्पर सहकार्यापेक्षां व्यक्तीचें सुरक्षितत्व यावरच भर दिला जाऊं लागला. एक कुटुंब, किंवा एक खेडें, किंवा एक शहर यांपेक्षां एक व्यक्ति हाच एकंदर विचाराचा मध्यबिंदु झाल्यानें अलीकडील समाज व आर्थिक रचनेंत बदल होत गेला. व त्यास अनुसरूनच करव्यवस्थेंतदेखील बदल करणें क्रमप्राप्त झालें. त्याचें विवेचन पुढील प्रकरणांत करूं.

---

१ सभ्यगृहस्थ हा शब्द ऐतखाऊ या अर्थानें वापरला आहे.

# प्रकरण दुसरें

# औद्योगिक क्रांतीचें स्वरूप.

**१. प्राचीन करपद्धतीचें सामान्य स्वरूप**—मागील प्रकरणांत केलेल्या विवेचनावरून वाचकांच्या हें लक्षांत आलें असेल कीं, औद्योगिक क्रांतिपूर्वकाळांत सरकारचा मुख्य भर जमीनधाऱ्यावरच होता. राजास जेव्हां हा अपुरा पडूं लागे, तेव्हां तो भल्याबुऱ्या मार्गानें दरडोई कांहींतरी कर आकारून किंवा श्रीमंत लोकांकडून सक्तीच्या खुषीनें नजराणे किंवा ठराविक रकमा कररूपानें वसूल करीत असे. थोडीबहुत भर दंड आदि रूपानेंहि सरकारी खजिन्यांत पडे, नाहीं असें नाहीं. पण ती फारच मामुली स्वरूपाची. यावरून असें दिसून येईल कीं, त्यावेळीं करव्यवस्थेंत गुंतागुंत अशी फारशी नव्हतीच. एकंदर आर्थिक व्यवहारच कमी गुंतागुंतीचा, त्यामुळें जमीनधारा किंवा नजराणे यांकरवीं सरकारी अर्थव्यवहाराचा गाडा चालविला जाणें शक्य होई. करपद्धतीचें शास्त्र अशा स्थितींत जन्माला येणें अशक्यच होतें. अर्वाचीन अर्थशास्त्रज्ञ जमीनधाऱ्यास अशास्त्रीय कर समजतात. या पद्धतीच्या मुळाशीं राजा (सरकार) हा जमीनदार व प्रत्यक्ष जमीन धारण करणारे लोक हीं त्याचीं कुळें अशी कल्पना होती. त्यामुळें हा जमीनधारा म्हणजे हल्लीं प्रत्यक्ष जमीन कसणारा शेतकरी कूळ म्हणून जमिनीच्या मालकास जो खंड देतो, तोच हा जमीनधारा होय, असें स्वरूप या करास प्राप्त होतें. मालक ज्याप्रमाणें कुळाच्या खंड देण्याच्या पात्रता-अपात्रतेचा विचार न करितां मालकी हक्क म्हणून कुळांकडून खंड वसूल करतो, तसाच प्रकार या जमीनधाऱ्याचा. अशी अशास्त्रीय पद्धत हल्लीं बहुतेक सर्व पुढारलेल्या राष्ट्रांत नष्ट होत चालली आहे. या शास्त्रीय पद्धतीचें विवेचन पुढें चौथ्या प्रकरणांत केलेलें आहे.

इरिगेशन-सेस पाणी वापरण्याच्या मापनावर ठरविला जात असावा. किती एकर जमीन भिजविली गेली हेंच हल्लींसारखें मापन असावें. म्युनिसिपल कर आयात मालावर व घरमालकांवर होते. त्यांचेंहि स्वरूप थोडेंबहुत हल्लींसारखेंच होतें.

हिंदमध्यें हे तिन्ही कर हल्लींदेखील कमीजास्त फरकानें त्याच स्वरूपांत आकारले जात आहेत. पण हा निव्वळ ऐतिहासिक परिस्थितीचा परिपाक आहे. या तिन्हींस शास्त्रीय स्वरूप देणें जरूर आहे. त्याचें विवेचन येथून पुढें करावयाचें आहे. पण अलीकडील करपद्धतींचें विवेचन करण्यापूर्वी औद्योगिक क्रांतीचें स्वरूप व त्यामुळें घडून आलेला एकंदर राष्ट्रीय अर्थव्यवस्थेंतील मूलगामी बदल, याचें यथायोग्य आकलन करून घेतलें पाहिजे. प्रथम औद्योगिक क्रांति म्हणजे काय हें पाहूं.

**२. क्रांति म्हणजे काय ?**—क्रांति या शब्दाचा अर्थ मूलभूत बदल. जेव्हां एखाद्या प्रस्थापित व्यवस्थेंत आकस्मिक व त्या व्यवस्थेशीं मूलभूत फारकत दर्शविणारा बदल होतो, तेव्हां त्या बदलास त्याबाबतींतील क्रांति असें म्हणतात. जसें, एका तऱ्हेचें धोरण चालविणारें सरकार जाऊन त्या ठिकाणीं त्या धोरणाशीं मूलभूत फरक दर्शविणारें असें दुसरें धोरण चालविणारें सरकार आलें म्हणजे त्यास राजकीय क्रांति, असें म्हणावें लागेल. यांतील प्रमेयें हींच कीं, बदल मूलभूत पाहिजे व तो आकस्मिक असला पाहिजे. ही क्रांति रक्तपातानें किंवा अशा तऱ्हेच्या दुसऱ्या भयंकर रीतीनेंच झाली पाहिजे असें मात्र बिलकूल नाहीं.

इंग्लंडांत १६८८ सालीं दुसरा विल्यम, अकल्पितपणें दुसऱ्या जेम्सच्या जागीं जनतेच्या दडपणानें आला. ती अगदीं रक्तपातरहित अशीच राजकीय क्रांति झाली. ह्याच बदलानें इंग्लंडमध्यें नियंत्रित राजसत्ता किंवा घटनात्मक राजसत्ता प्रस्थापित झाली. ती आजतागायतहि चालू आहे. अमेरिकेंतील ( U. S. A. ) डेमोक्रॅट पक्षाऐवजीं रिपब्लिकन पक्ष निवडून आला तर त्यास राज्यक्रांति म्हणतां येणार नाहीं. कारण दोन पक्षांतील धोरणांत मूलभूत असा फरक नाहीं. एक पक्ष आंतरराष्ट्रीय राजकारणांत हिरिरीनें भाग घेईल; दुसरा तितका घेणार नाहीं, एवढाच फरक. पण तेंच १९४५ सालीं हुजूरपक्षाऐवजीं मजूरपक्ष इंग्लंडांत अधिकारारूढ झाला, त्यास राजकीय क्रांतीच म्हणावें लागेल. कारण हुजूरपक्ष भांडवलवादी तर मजूरपक्ष समाजवादी.

रशियांत १९१७ सालीं जी राजकीय उलाढाल झाली, ती राजकीय क्रांतीच होय. पण ती घडून येण्यापूर्वी बराच रक्तपात झाला. या राजकीय क्रांतीबरोबर तेथें सामाजिक क्रांति घडून आली.

राजकीय किंवा सामाजिक क्रांति रक्तपातानें किंवा रक्तपाताशिवाय घडून येणें, हें बहुतांशीं, ज्या देशांत अशा तऱ्हेचे बदल घडून येतात, त्या देशांतील लोकांच्या सांघिक गुणांवर व ज्या त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून असतें. १९४७ सालीं हिंदुस्थानांत जी राजकीय क्रांति झाली, ती रक्तपातरहितच झाली. अर्थात् तिचें बहुतांशीं श्रेय इंग्रजांच्या राष्ट्रीय गुणांसच द्यावें लागेल. थोडीशी आंतरराष्ट्रीय परिस्थिति व थोडासा आमचा पराक्रमहि याकामीं कारणीभूत झाला, नाहीं असें नाहीं. पण मुख्यतः इंग्रजांचा स्वभावच अशा सुलभतेनें आम्हांस स्वातंत्र्य मिळण्यास कारण झाला हें नाकारून चालणार नाहीं. नाहींतर अद्यापहि फ्रेंच लोक हिंदमधील ३।४ शहरांस कवटाळून बसले आहेत, किंवा पोर्तुगीज गोव्यांतून चालते होत नाहींत, या गोष्टींची संगति लावतां येणार नाहीं. तात्पर्य, क्रांति म्हणजे पूर्वव्यवस्था जाऊन त्या ठिकाणीं नवी व्यवस्था उत्क्रांतिवादानें म्हणजे हळू हळू घडून न येतां, एकदम घडून येणें असें ठरलें. तशा तऱ्हेचाच बदल औद्योगिक बाबतींत इंग्लंडमध्यें अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत घडून आला. त्यामुळेंच इंग्लंडच्याच नव्हे तर सर्व जगाच्या अर्थव्यवस्थेंत आमूलाग्र बदल होणें अपरिहार्य झालें.

**३. औद्योगिक क्रांति म्हणजे काय ?**—हा बदल घडून येण्यास प्रमुख कारणें म्हणजे १७६७ सालीं हरग्रीव्हनें तयार केलेली सूत कांतण्याची चाती ( Spinning Jenny ) व १७८२ सालीं जेम्स् वॅटनें लावलेला वाफेच्या इंजिनाचा शोध, हीं होत. यायोगें मनुष्यशक्तीपेक्षां वाफेच्या शक्तीवर चालणाऱ्या इंजिनांच्या साहाय्यानें उत्पादन वाढविणें शक्य होऊं लागलें. एक मनुष्य ठरलेल्या वेळांत जेवढें काम करूं शकतो, तेवढ्याच वेळांत एक इंजिन ज्या प्रमाणांत त्यास चालना मिळेल, त्या प्रमाणांत एका मनुष्यापेक्षां कितीतरी पटीनें जास्त काम करूं शकतें. मनुष्य दमतो, थकतो, कंटाळतो, त्यास सुट्टी हवी असते. एखादे वेळेस त्यास काम करावेंसें वाटतें, एखाद्या वेळेस वाटत नाहीं. या सर्व कारणांमुळें उत्पादनावर परिणाम होतो, तसें इंजिनाच्या बाबतींत नाहीं. त्यास लागणारें खाद्य, तेल, कोळसा किंवा वीज पुरविली, त्याच्या मोडतोड दुरुस्तीकडे लक्ष दिलें, जुनें व टाकाऊ झालें कीं दुसरें नवें घेतलें म्हणजे काम झालें. मनुष्याचें मन म्हणजे निरनिराळ्या उलटसुलट भावनांचें कोठार. इंजिनाला मनच नाहीं. चालू

केलें कीं झालें. तसेंच जितकी शक्ति द्यावी तितक्या जोरांत तें चालू होणारच. या सर्व कारणांनीं एक इंजिन हजारों माणसांचें काम व तेंहि अगदीं ठरवून दिलेल्या रीतीनें बिनचूक करूं शकतें. अशा या शोधानें मानवाच्या उत्पादनसाधनांत आमूलाग्र बदल झाला. त्यामुळें या शोधाच्या पूर्वी अस्तित्वांत असलेल्या व त्यानंतरच्या प्रस्थापित झालेल्या उद्योगधंद्यांच्या उत्पादनशक्तींत अजस्र फरक झाला. म्हणूनच त्यास औद्योगिक क्रांति या सार्थ नांवानें संबोधण्यांत येऊं लागलें.

हा शोध १७८२ सालीं आकस्मिकच लागला. याचा अर्थ यास पूर्वपीठिका अजिबातच नव्हती, असा नाहीं. मुलगा हा बापाचे गुणावगुण घेऊन जन्मास येतो. तसेंच दुसरी पिढी ही पहिल्या पिढीच्या खांद्यावर उभी असते व असा हा क्रम अव्याहत चालू असतो. पहिल्या पिढीच्या लहानसहान शोधांतूनच असा एखादा मोठा शोध लागतो. अग्नीचा उपयोग माहीत नसलेल्या अतिप्राचीन मानवास जेव्हां वनांतून हिंडतांना नुकत्याच विझत आलेल्या वणव्यांत भाजल्या गेलेल्या हरणाचें मांस चाखावयास मिळालें, व अशा रीतीनें त्यास अग्नीचा उपयोग कळला, तेव्हांदेखील मानवाच्या उपभोगसाधनांत क्रांतीच झाली. याचा अर्थ पूर्वी अग्नीच नव्हता असा नाहीं. फक्त त्याचा उपयोग या प्रसंगानें एका चाणाक्ष माणसास कळला, व त्याच्या प्रेरणेनें तो सर्रास सर्वांनाच कळला. याहि पूर्वी त्यानें असे अनेक शोध लावले होते. पण या क्रांतीपासून मानव सुधारत जाऊन त्याचें पूर्वीचें रानटी स्वरूप जाऊन त्यास नागरिकाचें रूप येऊं लागलें. तसेंच या वाफेच्या इंजिनाचें झालें. वॅटच्या पूर्वीच्या लोकांनीं निरीक्षणानें पाणी उपसणाऱ्या यंत्राचा शोध लावला होता. चिनी लोकांनीं तर सातव्या शतकांतच बंदुकीच्या दारूचा शोध लावला होता व त्याहि पूर्वी छापण्याची कला त्यांनीं अवगत केली होती. अशा रीतीनें पूर्वीपासूनच यांत्रिक शोध लागत आले होते. पण जेम्स् वॅटचा शोध अपूर्व होता, म्हणून त्याच्या काळापासून औद्योगिक क्रांतीस सुरवात झाली असें समजतात.

अर्थात् १७८२ सालीं जरी हा शोध लागला होता, तरी ताबडतोब त्याचा उपयोग हल्लींप्रमाणें होऊं लागला असें नाहीं. क्रमाक्रमानेंच कोणतीहि गोष्ट अंगवळणीं पडते. याहि गोष्टीस मूर्त स्वरूप येण्यास पुढील ४०।५० वर्षांचा काळ गेला.

**४. क्रांतिपूर्व व क्रांति-उत्तर मालक-मजूर संबंध**—या काळापावेतों उद्योगधंद्यांचें स्वरूप घरगुती होतें. कापडाच्या धंद्याचेंच उदाहरण घेऊं. घरीं सूत कांतावयाचें, तें स्वतः विणावयाचें किंवा दुसऱ्या विणकऱ्यास देऊन त्याचेकडून विणून घ्यावयाचें. अशा रीतीनें जें कापड तयार होई, तें स्वतः किंवा कापड दुकानदारांमार्फत विकावयाचें. आपल्याकडील हातमागाच्या धंद्याचें किंवा खादीच्या धंद्याचें जें स्वरूप तेंच फार तर त्या धंद्याचें. उलट त्याहूनहि किरकोळ असें म्हटलें तरी चालेल. कारण हल्लीं वाहतुकीच्या जलद साधनांनीं हवा तेवढा माल इकडून तिकडे नेतां येतो, तसें त्यावेळचें नव्हतें. त्यामुळें जेथल्या तेथें जेवढा माल लागावयाचा तेवढाच तो तयार करावयाचा, असें या धंद्यास अगदीं मर्यादित स्वरूप होतें.

अशा स्थितींत भांडवलदारी निर्माण होणें अशक्यच होतें. प्रत्येक जण स्वतः उत्पादनसाधनांचा मालक व तसाच तो मालाचा उत्पादकहि होता. त्यामुळें मालक व मजूर असें हल्लींच्या कारखानदारी युगांतील स्वरूप त्याकाळीं येणें अशक्यच होतें. जमीनदार व कुळें यांच्यांत जें थोडें मालक-मजूर या प्रकारचें नातें होतें, त्यासहि त्या काळच्या सहकारितेच्या युगांत मानवी स्वरूपाची मुरड पडून कौटुंबिक जिव्हाळ्याचें स्वरूप प्राप्त होई. एक मालक, व फार तर ५।५० मजूर व ते सर्व मजूर मालकाच्या वाड्याच्या आसपासच झोंपड्यांतून राहात. त्यामुळें मालकांचा व मजुरांचा हरघडी संबंध येई. कोणी आजारी पडला तर मालकाच्या तें नजरेस येई व तो माणुसकी म्हणून कांहींतरी औषधोपचार करी. लग्नकार्य असलें कीं, कांहींतरी मदत मालक करी. अर्थात् त्याकाळीं जमीनदारवर्गांत कांहीं नरपशु नव्हते असें नाहीं, पण ते अपवादात्मकच. पण यांत्रिक शोधानंतर, एका इसमास इंजिनावर व त्यास लागणाऱ्या कच्च्या मालावर मालकी मिळाल्यावर, हजारों लोकांस मजूर म्हणून वागवितां येणें शक्य झालें. बिनभांडवलदार गृहस्थास भांडवलदाराच्या यंत्राबरोबर चढाओढ करणेंच अशक्य झालें. त्यास भांडवलदाराचा हमाल बनण्याशिवाय दुसरें गत्यंतरच राहिलें नाहीं.

या हमालीबरोबर त्याच्या राहणींतहि बदल झाला. यंत्राचे साहाय्यानें उत्पादन, म्हणजे यंत्र उभारण्याकरितां मोठी इमारत, मॅनेजर, मजूर यांच्याकरितां बंगले व चाळी या गोष्टी क्रमप्राप्तच झाल्या. खेड्यांतील धंदे यंत्राशीं टिकाव धरूं न शकल्यानें

ते धंदे मोडले. त्यामुळें बेकार झालेले लोक या भांडवलदारांचे मजूर बनून आपलीं खेडीं सोडून या चाळींवर येऊन राहूं लागले. याचा परिणाम खेडीं मोडून शहरें वाढण्यांत झाला. पण याबरोबरच खेडेगांवची मोकळी हवा, साधी राहणी व सकस अन्न जाऊन त्या ठिकाणीं कोंदट हवा, चाळींतलि राहाणी व मालक देईल तें अन्न आलें. यांत भर म्हणून कीं काय पूर्वीचें स्वातंत्र्य जाऊन, अतिप्राचीन काळीं ग्रीस देशांत जशी गुलामगिरी होती त्या नांवानें नसली तरी गुणांनीं तशाच तऱ्हेची गुलामगिरी, हल्लींच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळांतहि या मजुरांच्या पदरीं आली. नांव सोनूबाई आणि हातीं कथलाचा वाळा, तशांतली गत !

या राहाणीबरोबरच दुसरा फरक म्हणजे, मालक व मजूर यांच्या उत्पन्नांतील आश्चर्यजनक तफावत. पूर्वीच्या जमीनदारांनाहि लाजेनें खालीं मान घालावयास लावणारे हे उद्योगपति कुबेर बनले, व मजूर त्यांचे दासानुदास बनले. कोठें सूर्य व कोठें खद्योत ( काजवा ) !

**५. भांडवलदारांचें राज्ययंत्रावरील नियंत्रण व त्याचा परिणाम**– या उद्योगपतींजवळ जसा अतोनात पैसा सांठू लागला, तसें व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाही या नांवाखालीं त्यांनीं पैशाच्या जोरावर राज्ययंत्रहि काबीज केलें. अशा रीतीनें आर्थिक, सामाजिक व राजकीय या तिन्ही क्षेत्रांत त्यांनीं प्रभुत्व मिळवून, सामान्य जनांना अगदीं यंत्राचा दास बनवून टाकलें. जीं यंत्रें वास्तविक मानवाचीं गुलाम व ज्यांच्या साहाय्यानें तो अधिक सुखसोयी, अधिक मोकळा वेळ मिळवूं शकतो, त्यांचाच एका मानवानें दुसऱ्या बांधवांवर हुकूमशाही गाजविण्याकरितां उपयोग करण्यास सुरवात केल्यावर, अशा पद्धतीविरुद्ध असंतोष माजणें साहजिकच असतें. याच असंतोषाचा परिणाम म्हणून हल्लीं समाजसत्तावाद, समतावाद अशा तऱ्हेच्या चळवळी जोर धरूं लागल्या आहेत.

या कारखानदारी पद्धतीचा दुसरा विशेष म्हणजे या कारखानदारांचीं यंत्रें सतत चालू ठेवून उत्पादन सतत वाढविण्याची व अशा रीतीनें जास्त नफा मिळविण्याची आपापसांतील स्पर्धा. यंत्रें सतत चालू ठेवावयाचीं म्हणजे त्यांना लागणाऱ्या कच्च्या मालाचा सतत पुरवठा हवा. हा कच्चा माल जर आपल्या देशांत भरपूर तयार होत नसेल तर तो दुसऱ्या देशांतून आणणें भाग आहे.

आणि हा दुसरा देश तो देत नसेल, किंवा त्यास तो हवा असेल, किंवा आणखी एखाद्या कारखानदारी देशाला तो हवा असेल तर मग काय करावयाचें? सरळ उपायानें मिळत नसेल तर असा हा देश पादाक्रांत करून आपला अंकित करणें हें ओघानेंच आलें. साम, दाम या दोन तत्त्वांनीं कार्य होत नसेल तर दंड म्हणजे लढाई किंवा भेद म्हणजे कुटिल नीति या दोन मार्गांचा अवलंब करणें क्रमप्राप्त ठरतें. इंग्लंडनें हिंदुस्थान, ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका, इराक, इराण वगैरे राष्ट्रांवर जें आक्रमण केलें तें वरील चारी राजनीतितत्त्वांस अनुसरूनच केलें. हिंदुस्थान व इजिप्तमधून त्यांच्या मँचेस्टर व लँकेशायर येथील गिरण्यांस लागणाऱ्या कापसाचा पुरवठा होऊं लागला. ऑस्ट्रेलियामधून तेथील लोंकरीच्या गिरण्यांस लागणारी लोंकर ताबेदारीनें मिळूं शकली. दक्षिण आफ्रिकेतून संपत्तीचें मापन करण्याचें जें साधन तें सोनें मिळूं लागलें. इराक इराणमधून यंत्राचें जें प्रमुख खाद्य पेट्रोल तेंहि अप्रतिबंध मिळूं लागलें. एवढें सगळें मिळविल्यावर व त्यास स्वतःची मुत्सद्देगिरी व काम करण्याची संवय या दोन अमूल्य गुणांची जोड मिळाल्यावर न भूतो न भविष्यति असें साम्राज्य मिळविणें हा त्यांच्या हातचा मळ ठरला. इंग्रजांच्या राज्यावर सूर्य कधींहि मावळत नाहीं, ब्रिटनचें सातां समुद्रांवर अधिराज्य आहे, ( Brittania rules the waves ) असे अभिमानास्पद उद्गार, ब्रिटिश कवि व लेखक यथार्थतेनें काढूं लागले.

साऱ्या जगाचीं एवढीं अफाट संपत्तिसाधनें मिळविणें व तीं टिकविणें ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. जगभर राज्य करावयाचें म्हणजे इतर फ्रान्स, जर्मनी व रशिया अशांसारख्या राष्ट्रांशीं सतत कलहाचा प्रसंग. त्याशिवाय अंकित राष्ट्रांतील प्रजेच्या असंतोषास तोंड देण्याची जरूरी. हल्लींच्या लढाया म्हणजे पूर्वीसारखें शिलेदार बारगिरांनीं राजाच्या हांकेस ओ देऊन आपला घोडा व भाला घेऊन सैन्यांत सामील व्हावयाचें असें थोडेंच आहे! त्यास कोण तयारी करावी लागते. रणगाडे, तोफा, विमानें, बॉंब, अणुबॉंब, हैड्रोजन बॉंब, नपालम बॉंब, रासायनिक विषारी द्रव्यें, एक का अनेक, अशा साऱ्यांची जरूरी. एवढी सारी तयारी करावयाची म्हणजे का साधी गोष्ट! अमेरिकेचें १९४८-४९ सालचें-म्हणजे शस्त्रास्त्रवाढीची शर्यत सुरू होण्यापूर्वीचें-बजेट २१३४८ कोट रुपयांचें आहे. ही रक्कम हिंदमधील मध्य व राज्यसरकारें यांच्या बजेटाच्या ३२ पट व सबंध

राष्ट्रीय उत्पन्नाच्या जवळ जवळ २½ पट मोठी आहे.[1] केवढी मोठी ही रक्कम आहे! एवढा पैसा जमवावयाचा म्हणजे नुसते जमीनधाऱ्यावर विसंबून सरकारला चालणार नाहीं, हें उघड आहे.

**६. जॉईंट स्टॉक कंपन्या व बँकांची वाढ**—या औद्योगिक क्रांतीच्या आणखी एका बाजूचें विहंगमदृष्ट्या अवलोकन केल्याशिवाय सरकारी अर्थव्यवहाराचें नीट आकलन होणार नाहीं. ती बाजू म्हणजे हल्लींच्या जॉईंट स्टॉक कंपन्या व बँका.

आधुनिक बँका म्हणजे पूर्वीच्या सावकारी पेढ्यांचीं अपत्यें होत. जेव्हां एखाद्या व्यक्तीजवळ जरूरपेक्षां जास्त पैसा शिल्लक राही, तेव्हां तो मागेल त्यावेळीं परत मिळेल व पैसाहि सुरक्षित राहील अशा एखाद्या व्यक्तीजवळ ठेवणें त्यास बरें वाटे. कारण, एक तर पैसा सांभाळण्याची दगदग वांचली व दुसरें म्हणजे आपणांस हवा तेव्हां जणूं काय आपल्या स्वतांच्याच तिजोरींत तो पैसा आहे, अशा रीतीनें तो वापरण्यास मिळे. या दोन्ही कारणांनीं विश्वास असलेल्या एखाद्या प्रतिष्ठित माणसाजवळ पैसा ठेव म्हणून ठेवण्याची पूर्वी प्रथा होती. अद्यापहि खेडेगांवांतून बँकांची वाढ झाली नसल्यानें गांवांतील वाणी किंवा मारवाडी यांच्याजवळ ठेव ठेवण्याची रूढि आहे. ठेव ठेवून घेणाऱ्याचेंहि तसें कांहीं नुकसान होत नाहीं. त्यास तो पैसा वापरण्यास मिळे. त्या पैशावर तो व्यापार करी किंवा वेळप्रसंगीं दुसऱ्यास व्याजानेंहि देई. समजा, एखाद्या वेळीं अशा ठेव ठेवलेल्या पुष्कळ लोकांनीं एकाच वेळीं पैसा मागितला तर तो स्वतःची चिठ्ठी पुराव्याकरितां ठेवीदारास देई व ठेवीदार त्या चिठ्ठीवर आपला व्यवहार चालवी. ठेव ठेवून घेणाऱ्या सावकाराची बाजारांत पत असली कीं, प्रत्यक्ष पैशाच्या देवघेवीपेक्षां या चिठ्ठयांवरच व्यवहार चाले. या प्रकारांत सर्वांचाच फायदा होई. पेढीवाल्यास नुसत्या चिठ्ठीवर लोकांनीं काम भागविल्यामुळें मूळचा पैसा पुन्हां वापरावयास मिळे व ठेवीदाराच्या पैशाचें ओझें इकडून तिकडे हलविण्यांत जो धोका व त्रास असे तो वांचे. ह्या चिठ्ठयांचा व्यवहार व त्या पेढीवरील विश्वास जसजसा वाढूं लागला, तसतसा त्यांचा चलनी नोटांसारखा वापर होऊं लागला.

---

१ हिंदमधील सर्व सरकारांचें १९५१–५२ चें उत्पन्न रु. ६६७ कोटींचें व १९४८–४९ चें राष्ट्रीय उत्पन्न रु. ८७१० कोटींचें होतें.

**७. बँकांचें कार्य**—औद्योगिक क्रांतीनंतरच्या काळांत ह्या खाजगी पेढ्यांचेंच कायद्यानें प्रस्थापित केलेल्या बँकांत रूपांतर झालें. कारखानदारीच्या अवाढव्य व्यापामुळें कोणाहि एकास कारखाना उभारणें अशक्यच असतें. कांहीं भांडवलदार आपला पैसा एके ठिकाणीं जमवून जॉईंट स्टॉक कंपनी काढतात. पण इतकेंहि करून हवा तेवढा पैसा जमा करतां येतोच असें नाहीं. कोट्यवधि रुपये नुसता धंदा उभारण्यास लागतात. नंतर पुन्हां कच्चा माल मिळवून त्याचा पक्का माल तयार करून बाजारांत तो विकून पैसा हातीं येईतों आणखी कांहीं कोटी रुपये लागतात. याकरितां या कंपन्या शेअररूपानें कांहीं भांडवल जमवितात. तथापि दैनंदिन थोड्या मुदतीच्या गरजा भागविण्याकरितां या कंपन्यांना बँकांचीच कांस धरावी लागते. तेथून तावडतोबीनें व सवलतीच्या व्याजानें रक्कम मिळूं शकते.

बँक म्हणजे तरी काय? ठेवीदारांच्या विश्वासाचें प्रतीक. समाजांतील प्रत्येक घटक जसें शक्य होईल तसें पैसे सुरक्षिततेच्या दृष्टीनें त्या संस्थेच्या तिजोरींत नेऊन ठेवतो, व हवे तेव्हां काढून घेतो. पण एकंदर व्यवहारांतील अनुभव पाहातां पैसा ठेवणारे लोक जास्त व काढून घेणारे मात्र त्या मानानें कमी. त्यामुळें बँकांना त्या पैशाचा वापर करतां येतो. या वापराकरितां बँकर कर्जदारांस थोडें व्याज आकारतो. असें व्याज मिळत असल्यानें बँकरहि आपल्या ठेवीदारांस अल्प व्याज देतो. अशा पद्धतीमुळें ठेवीदारांचाहि फायदा होतो. व्याजाच्या आशेनें तो पैसा बँकेंतच ठेवतो व अगदीं जरूरीच्या काळांतच काढून घेतो.

आपण वर पाहिलेंच कीं, आतां निव्वळ जमीनधाऱ्यावर सरकारी खर्च चालूं शकणार नाहीं. हा खर्च हल्लीं अवास्तव वाढला असल्यानें आतां पैसा जमविण्याचें शास्त्रच झालें आहे. कररूपानें पैसा जमवावयाचा तर लोकांस पचेल, रुचेल अशा रीतीनेंच तो जमा केला पाहिजे. बँकाहि सरकारास कर्जें देऊन मदत करतात. सरकारइतकें जास्तींत जास्त शाश्वती देणारें दुसरें कूळ नाहीं. या सरकारी कर्जरोख्यांवर बँका आणखी जादा पैसा निर्माण करूं शकतात. जितक्या प्रमाणांत सरकारी कर्जरोखे जास्त, तितक्या प्रमाणांत आपलें सरकारकडे येणें आहे, या आधारावर जादा वचनचिठ्ठ्या पुन्हां आपल्या दुसऱ्या कुळांस त्या देतात; व प्रत्यक्ष पैसा इकडचा तिकडे न हलवितां या वचनचिठ्ठ्या किंवा हुंड्यांवर पतीनें व्यवहार चालवितात. अशा हुंड्यांचा दुरुपयोग होऊं नये, म्हणून

सरकार आपली स्वतःची बँक काढून तिच्यामार्फत बाकीच्या बँकांवर नियंत्रण ठेवूं शकतें. हल्लीं ही मध्यवर्ति बँकच फक्त चलन काढते. इतर बँकांना तसा अधिकार नाहीं. सरकारी अर्थव्यवहारांत यामुळें बँकास बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. करांमुळें ज्याप्रमाणें सरकार पैसा जमा करूं शकतें, त्याचप्रमाणें बँकांच्यामार्फत आपले कर्जरोखे देऊनहि अमाप पैसा जमा करूं शकतें. अर्थात् हें सारें अति गुंतागुंतीचें काम आहे. याचाच विचार पुढील भागांत करावयाचा आहे.



# प्रकरण ३ रें

# सरकारी उत्पन्नाचे व जमेचे मार्ग

**१. सरकारवर पडणाऱ्या जबाबदाऱ्या**—औद्योगिक क्रांतीपूर्वी सरकारी कर्तव्य कायदा व सुव्यवस्था एवढ्यांपुरतेंच मर्यादित होतें. पण त्यानंतर समाजव्यवस्थेंतहि क्रांतिकारक बदल झाल्यानें सरकारी कर्तव्यांतहि भर पडत चाललेली आहे, व हल्लीं तर समाज सुस्थितींत राहाण्याकरितां सरकारनें स्वतांच जबाबदारीनें जरूर त्या सर्व गोष्टी केल्या पाहिजेत, एवढेंच नव्हे तर सामाजिक नीतिमत्ता राहो पण वैयक्तिक नीतिमत्ता सुधारणें हेंदेखील सरकारचेंच कर्तव्य आहे, एवढें म्हणण्यापर्यंत बऱ्याच विचारवंतांची मजल गेली आहे. या गोष्टी करावयाच्या व त्याबरोबरच शस्त्रास्त्रवाढ, शास्त्रीय शोध यांवरहि पैसा खर्च करावयाचा म्हणजे पूर्वींसारखें सरकारी अंदाजपत्रक अशास्त्रीय असून चालणार नाहीं. पूर्वीं कर वसूल करावयाचा व स्वतांस लागणारा पैसा ठेवून बाकीचा सर्व सामान्य राज्यकारभार व जरूर तेवढें पोलीस व लष्करी दल यांवर खर्च करावयाचा, एवढ्यापुरतीच राजदृष्टि मर्यादित असल्यानें राजानें अंदाजपत्रक तयार केलें नाहीं तरी चाले.

हल्लीं अंदाजपत्रक तयार करणें हेंदेखील एक शास्त्रच होऊन बसलें आहे. वर्षाच्या आरंभीं संरक्षणखात्यावर इतका, शिक्षणखात्यावर इतका, सार्वजनिक बांधकामखात्यावर इतका, सर्वसाधारण राज्यकारभारावर इतका, इत्यादि रीतींनीं खर्चाची विल्हेवारी तयार करतात. त्याबरोबरच जमेची बाजू देखील खातेवार दर्शविली जाते. मग हें सारें अंदाजपत्रक लोकसभेपुढें मांडून तिची मंजुरी घेतली जाते, व तिनें केलेल्या दुरुस्त्यांसह जो आंकडा एखाद्या खात्यावर खर्च करण्याची कमाल मर्यादा म्हणून दर्शविला जातो, त्यापेक्षां त्या खात्यावर जादा पैसा सरकारला खर्च करतांच येत नाहा. एखाद्या वेळेस कांहीं बाबतींत जादा खर्च करणें भाग पडल्यास, तसा खर्च केला तरी चालतो. पण त्यास लोकसभेची तावडतोब परवानगी घ्यावी लागते. तसेंच हा सारा खर्च लोकसभेनें घालून दिलेलीं बंधनें

पाळून केला जातो कीं नाहीं, व प्रत्यक्ष व्यवहार करण्याकरितां जे नियम केले जातात ते तंतोनंत पाळले जातात कीं नाहीं हे पाहाण्याकरितां हिशेबतपासणी-खातें, व या खात्याच्या सूचना बरोबर अंमलांत आणल्या जातात कीं नाहीं हें पाहाण्याकरितां पुन्हां लोकसभेच्या सभासदांची एक लहानशी समिति असते. या सर्वांवर लोकसभेचा शेवटीं अधिकार चालतोच.

इतकीं सारीं बंधनें सरकारला पाळावीं लागत असल्यानें येईल ती जमा व होईल तो खर्च अशा बे-हिशेबी पद्धतीनें वागून चालत नाहीं. त्यांतून पैसा कसा गोळा करावयाचा हेंहि एक शास्त्रच झालें असल्यानें, या बाबतींत पूर्वीसारखी जुलुमजबरदस्ती करून चालत नाहीं. आतां पैशाची जरुरी भासते आहे, लुबाडा एखाद्या सावकाराला, किंवा चला मुलुखगिरी करावयाला, अशा तऱ्हेनें सरकारला वागतां येणार नाहीं. अर्थात् मनुष्यस्वभाव कांहीं बदलला नाहीं. त्यामुळें सरकारनें वरील मार्ग अजिबात सोडून दिले आहेत, अशांतला भाग नाहीं. फरक इतकाच कीं, त्यांसहि हल्लींच्या सरकारांनीं शास्त्रीय स्वरूप दिलें आहे. आतां हा सरकारी खर्च चालविण्याकरितां पैसा गोळा करण्याचे मार्ग कोणते, तें पाहूं.

**२. सरकारी उत्पन्नाचे मार्ग व खाजगी उत्पादनाचे मार्ग यांची तुलना**—सरकार म्हणजे तरी काय, ज्या व्यक्तींचा एक समाज किंवा राष्ट्र बनलेलें असतें त्याची राज्यव्यवस्था पाहण्याकरितां त्या समाजांतील किंवा राष्ट्रांतील लोकांनीं प्रतिवर्षी किंवा वंशपरंपरा निवडून दिलेलें प्रातिनिधिक मंडळ. मग तें राजा व त्याचें छोटेंसें सल्लागारमंडळ या स्वरूपाचें राजेशाही असो, वा लोकांनीं निवडून दिलेल्या लोकसभेस जबाबदार असणारें लोकसत्ताक स्वरूपाचें असो. लोक ज्या तऱ्हेनें आपला खाजगी व्यवहार चालवितात, थोड्याबहुत त्याच प्रकारानें सरकारहि आपला व्यवहार चालवितें. एका कुटुंबाचें कार्यक्षेत्र ५।६ व्यक्तींपुरतेंच मर्यादित असल्यानें त्याच्या एकंदर व्यवहाराचें, जमेचें व खर्चाचें स्वरूप छोटेखानी असतें. या उलट सरकारचें सारेंच अतिव्यापक प्रमाणावर! या मोठ्या प्रमाणानें जो जरूर तो फरक सरकार आपल्या कारभारांत करतें. तेव्हां एखादी व्यक्ति स्वतःच्या कुटुंबाचा चरितार्थ चालविण्याकरितां ज्या तऱ्हेनें पैसा गोळा करते, जवळजवळ त्याच तऱ्हेनें पण थोड्याफार फरकानें सरकार राष्ट्रकुटुंबास लागणारा पैसा गोळा करतें.

प्रत्येक कुटुंबाचें कांहीं ठराविक उत्पन्न असतें. उदाहरणार्थ, शेतकरी कुटुंब असेल तर त्याचें शेतीचें उत्पन्न, नौकरदार असेल तर त्याचें पगाराचें उत्पन्न, व्यापारी असेल तर त्याचा व्यापारावर मिळविला जाणारा नफा, अशा तऱ्हेनें एक किंवा अनेक मार्गांनीं उत्पन्न मिळतें. एखाद्यास शेतीचें उत्पन्न असून शिवाय आणखी नोकरीपासून पगार मिळूं शकेल, किंवा एका कुटुंबांतील निरानिराळ्या व्यक्ति निरनिराळे उद्योग करून कुटुंबाच्या खर्चाकरितां पैसा जमवितील. तसेंच आजारीपण, लग्नकार्य, अशा क्वचित् प्रसंगानुसार जादा लागणाऱ्या खर्चाकरितां प्रत्येक वर्षी शिल्लक ठेवून त्यांतून असे खर्च केले जातील. हें अशक्य झालें तर त्या कुटुंबांतील व्यक्तींच्या वैयक्तिक पतीवर किंवा इस्टेटीच्या जोखमीवर कर्जाऊ रक्कम काढून, त्यांतून जादा करावा लागणारा खर्च भागविला जाईल. एखादे वेळेस देणगी, बक्षीस, शिष्यवृत्ति अशा मिळणाऱ्या रकमेंतून खर्च केला जातो.

**३. सरकारी उत्पन्नाचे मार्ग—( अ ) कर**—जसें कुटुंबाचें तसेंच राष्ट्रकुटुंबाचें. राष्ट्रकुटुंबासहि उत्पन्न असतें. अर्थात् तें मुख्यतः कररूपानें येणारें. समाजांतील प्रत्येक घटकावर आपल्या सरकारचा खर्च चालविण्याची जबाबदारी असल्यानें, त्यास आपल्या कुवतीप्रमाणें आपला भाग द्यावाच लागतो. अशा रीतीनें मिळणारें उत्पन्न सत्तीनें वसूल केलें जातें.

**( आ ) उद्योगधंदे**—याशिवाय सरकारच्या मालकीच्या जमिनी, जंगलें, धंदे त्यांपासून किंवा कांहीं वहातुकीचे मार्ग कीं जे मक्तेदारी पद्धतीनें चालविले जातात, त्यांच्यापासून सरकारला उत्पन्न मिळतें. आपल्याकडील उदाहरणच घ्यावयाचें झाल्यास, राष्ट्रीय रेल्वे, पोस्ट, तारखातें यांतून मिळणाऱ्या उत्पन्नाचें देतां येईल. हीं खातीं चालविण्याकरितां लागणारा जरूर तेवढाच पैसा तिकीट किंवा फी या रूपानें वसूल केला जातो असें नसून, त्यापेक्षां जादा पैसा वसूल केला जातो, व असा जादा आलेला पैसा, त्या त्या खात्याचा घसारा फंड वगैरेसारखा आवश्यक असलेला पैसा वजा करून बाकी राहिलेला, कररूपानें आलेल्या पैशांत मिळविला जातो. जंगलें किंवा इतर धंदे राष्ट्रीय मालकीचे असल्यास किंवा जमिनी सरकारी मालकीच्या असल्यास त्यांपासून मिळणारा पैसा म्हणजे हें तर सरकारचें जमीनमालकांप्रमाणें मिळणारें प्रत्यक्ष उत्पन्नच होय. अर्थात् हेंहि सामान्य वसुलांत मिळविलें जातें.

बक्षीस, देणगी या रीतीनेंहि सरकारला पैसा मिळतो. पण हा मार्ग अगदींच अनपेक्षित व बेभरंवशाचा. अशा मार्गानें पैसा मिळेलच असा अंदाज करतां येणार नाहीं. १९५१–५२ च्या अंदाजपत्रकाचे वेळीं या सालचे अर्थमंत्री श्री. चिंतामण देशमुख यांनीं एका खेडुतानें रु. ५ दरसाल सरकारला देणगीदाखल देण्याचें कबूल केल्याचें सांगितलें. यावरून या मार्गानें किती पैसा मिळेल याचा अंदाज कोणालाहि करतां येईल.

वरील विवेचनावरून हें ध्यानांत येईल कीं, सरकारचें उत्पन्न, कर व स्वतःच्या मालकीच्या धंद्यांचें उत्पन्न, या दोन मार्गांनीं येतें. कर निरनिराळ्या प्रकारचे असूं शकतात. आपल्या देशांत मध्यवर्ती सरकारास प्रामुख्यानें प्राप्तीवरील कर, आयातनिर्यात कर व उत्पादनावर घेतला जाणारा एक्साईज कर या तीन करांपासून उत्पन्न मिळतें. राज्यसरकारास विक्रीकर, जमीनधारा, प्रांतिक एक्साईज, दारू वगैरेंवरील कर व स्टँपड्यूटी, कोर्टफी अशा रीतींनीं मिळणाऱ्या करांचें उत्पन्न आहे. शिवाय मध्यवर्ती सरकारहि त्यांना प्राप्तीवरील कराचा कांहीं भाग देतें.

रेल्वे, पोस्टखातें हे मध्यवर्ति सरकारच्या हुकमतीखालील धंदे आहेत. त्यांपासून त्यांना उत्पन्न मिळतें. राज्यसरकारच्या मालकीचीं जंगलें असल्यानें त्यांतील लांकडाच्या विक्रीचें उत्पन्न त्यांना मिळतें.

(इ) **विनावेतन काम व सल्लामसलत**—खाजगी व्यक्तींना ज्याप्रमाणें त्यांच्या मित्रमंडळीकडून फुकट सल्लामसलत किंवा अंगमेहनतीची मदत विनामूल्य मिळते, त्याप्रमाणें सरकारासहि मिळते. परवां परवांपर्यंत आपल्याकडे ऑनररी मॅजिस्ट्रेटस् किरकोळ खटले चालवीत. त्यांना कांहीं पगार नसे. ते निव्वळ बहुमान किंवा पदवी इत्यादिकांच्या लालसेनें कामें करीत. ही सरकारला विनामूल्य मदतच झाली. हल्लींदेखील सरकार सक्तीनें समाजांत विशिष्ट दर्जा असलेल्या लोकांना ज्यूरर किंवा असेसर म्हणून न्यायदानांत न्यायाधिशास मदत देण्याकरितां बोलावितें. तसेंच मुंबईस जस्टिसेस् ऑफ पीस म्हणून कांहीं प्रतिष्ठित लोकांची नेमणूक सरकार करतें. त्यांचा उपयोग नागरिकांना त्यांनीं केलेल्या कांहीं करारांवर साक्षी घालण्याकरितां विनामूल्यच केला जातो. समाजांत शांतता व सौख्य नांदावें म्हणून, माहिती मिळालेल्या समाजकंटकांची पोलीसखात्यास वर्दी देणें, हें तर प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य ठरलें गेलें आहे. या कर्तव्यांत कसूर झाल्यास नागरिकास शिक्षा

होऊं शकते, पण कर्तव्यपालनाबद्दल मोबदला मिळत नाहीं. सरकार स्वतःस विशिष्ट बाबतींत तज्ज्ञांचा सल्ला मिळावा म्हणून तज्ज्ञ लोकांची समिति नेमतें. पण त्यांस त्याबद्दल कांहीं वेतन दिलेंच जातें असें नाहीं. अशा निरनिराळ्या प्रकारें सरकारासहि नागरिकांकडून फुकट सल्ला मिळतो व कामहि करून घेतां येतें. अलीकडे अशा रीतीनें विनावेतन काम घेऊं नये, अशी विचारसरणी दृढ होऊं लागली आहे. अशी विचारधारा असणाऱ्यांचें म्हणणें असें कीं, प्राचीन हिंदुस्थानांतील विद्वानांनीं संन्यास घेऊन समाजधारणेचें व पोषणाचें काम स्वतः देहदंड सोसून केलें, हें खरें; पण 'परोपकाराय सतां विभूतयः' समाजाच्या कल्याणासाठींच सज्जनांचा जन्म आहे, अशा तऱ्हेची विचारसरणी सध्यांच्या जडवादी युगांत उपयोगी नाहीं. जो काम करील त्यास दाम दिलाच पाहिजे. पण त्यांत माझ्या मतें आत्यंतिक एकांगीपणाच दिसतो. एक तर आपण या युगास जडवादी असें संबोधितों, पण तें उगाच फॅशन म्हणून. जडवाद किंवा अध्यात्मवाद ह्या दोन्हींचाहि भरभक्कम असा पाया आपणांस अद्याप मिळालेला नाहीं व दुसरें म्हणजे व्यक्ति हा मध्यबिंदु कल्पून वरील तऱ्हेचे विचार मांडले जातात. व्यक्तिनिष्ठ विचारसरणी योग्य नसून समाजनिष्ठ विचारसरणीच श्रेष्ठ होय, यांत फारसें दुमत होण्याचें कारण नाहीं.तेव्हां एकंदर समाजाकरितां विनावेतन काम करण्यास जर कोणी एखादा तज्ज्ञ तयार असेल तर त्याची मदत समाजानें घेण्यास हरकत दिसत नाहीं.

सामान्यतः मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्तीच जादा करवाढीस विरोध करण्याकडे असते, कारण त्यामुळें त्याच्या खिशास प्रत्यक्ष चाट बसत असते. असा कर देण्यामुळें त्यास स्वास्थ्य, स्थैर्य व इतरहि पुष्कळच अप्रत्यक्ष फायदे मिळतात. पण इतका दूरवर विचार करण्याची निदान सर्वसामान्य माणसाची तयारी नसते, व या बाबतींतील विशिष्ट माहितीचा अभाव असल्यानें असा विचार करण्याची त्याची कुवतहि नसते. बरें, कर्जें काढावयाचीं म्हणजे त्यांसहि मर्यादा आहे. तसेंच व्याजरूपानें द्याव्या लागणाऱ्या पैशाचा बोजा कर भरणाऱ्या माणसांवरच पडतो. तेव्हां कर्जें काढण्यापूर्वीं या गोष्टींचाहि अर्थमंत्र्यास विचार करावा लागतो. या बाबी विचारांत घेतां, राष्ट्रोन्नतिकारक सुधारणा घडवून आणण्याकरितां विनावेतन काम करण्याच्या प्रवृत्तीची जोपासना केली पाहिजे. अर्थात् ज्यांना जें शक्य त्यांनीं तें करावें. एखादा शेतकरी आपलें गांव दुसऱ्या गांवास जोडणारा

रस्ता तयार करण्याचे कामीं आपल्या फावल्या वेळांत जरूर मदत करूं शकेल. चावडींत किंवा देवळांत बसून नुसत्या चकाट्या पिटण्यापेक्षां, त्याची योग्य प्रचारानें जरूर ती मनोभूमिका तयार केल्यास, त्याला दिवसांतून अशा सार्वजनिक कार्यांत मदत करण्याकरितां विनावेतन एखादा तास खर्च करणें जड वाटणार नाहीं. तसेंच शहरांतून सरकारी नौकर, खाजगी शाळांतील शिक्षक व इतर सुख-वस्तु वर्ग, प्रौढशिक्षण किंवा सार्वजनिक सक्तीचें शिक्षण अशांसारख्या कार्यांत सहज मदत करूं शकतील. या बाबतींत सक्ती उपयोगी नाहीं. लोकांत सहज सुलभ वसणाऱ्या सत्प्रवृत्तींस आवाहन देऊनच असें कार्य करून घेणें शक्य आहे. लोकांच्या फावल्या वेळेचा अशाप्रकारें सदुपयोगच करून घेतल्यासारखें होईल. आतांपर्यंत दुर्लक्षिलेला पण प्रयत्नांतीं साध्य असणारा एक मोठा सरकारी उत्पन्नाचा हा मार्ग आहे. नुसत्या प्रचारानें लोक असें कार्य करण्यास पुढें येत नसल्यास आरंभीं आरंभीं थोड्याशा सक्तीचादेखील उपयोग करणें वावगें ठरणार नाहीं. अशा रीतीनें काम करण्याचा लोकांस उत्साह वाटावा म्हणून पदव्या, प्रमाणपत्रें सरकारी नौकरींत बढतीच्या वेळीं अशा कामाचा विचार, वगैरेंसारख्या गोष्टींचें आमिष दाखविणेंहि योग्यच ठरेल. राष्ट्राची भरभराट हा मध्यबिंदु सर्वांनीं समोर ठेवल्यास सरकारनें त्या दृष्टीनें जरूर ते सर्व मार्ग चोखाळल्यास राष्ट्र भर-भराटीस येण्यास फार वेळ लागेल असें वाटत नाहीं. अगदीं चिकित्सक बुद्धीनेंच विचार करणें झाल्यास राष्ट्राची संपत्ति म्हणजे तरी काय? त्यांत वसणारे लोक व कच्चा माल. तेव्हां पैशाचा तुटवडा वगैरे गोष्टी कृत्रिम, मनुष्यनिर्मित आहेत. बुद्धिवान् मानव आपणच निर्मिलेल्या खोड्यांत अडकून, बाहेर पडण्यास मार्गच नाहीं, असें ओरडूं लागल्यास त्यांत व पशूंत फरक काय राहिला? अशा स्वयं-निर्मित अगतिक स्थितींतल्या मानवाची पंचतंत्रांतील कीलोत्पाटी वानराशीं तुलना केल्याशिवाय राहावत नाहीं.

या मार्गांचें ह्याच प्रकरणांत सविस्तर विवेचन केलें आहे. कारण हाच एक मार्ग असा आहे कीं, ज्यांत पैशाचा संबंध येत नाहीं. या पुस्तकांत आपण अर्थ-व्यवहाराचें विवेचन करीत आहों. त्यामुळें पैशाचा ज्यांत संबंध नाहीं, अशा बाबींचा येथून पुढें कोठेंच उल्लेख येणार नसल्यानें या मार्गाविषयीं थोडें सविस्तर विवेचन येथेंच केलें आहे.

**( ई ) चलनवाढ**—वर विवेचन केल्याप्रमाणें खाजगी व्यक्तींचे व सरकारचे उत्पन्नाचे मार्ग जवळ जवळ सारखेच असतात हें आपण पाहिलें. पण सरकार हें केव्हांहि खाजगी व्यक्तीपेक्षां अधिक सामर्थ्यसंपन्न. सरकार म्हणजे आधिभौतिक अंतिम सत्ता. तेव्हां असें हें सरकार खाजगी व्यक्तींना न करतां येण्यासारख्या जंतर-मंतर पद्धतीनें हवा तेवढा पैसा, मनांत आणलें तर, गोळा करूं शकतें. जसा मनुष्य जन्मण्यापूर्वी कोठें असतो व मेल्यानंतर कोठें जातो, याचा पत्ता लागत नाहीं– अदर्शनादापतितः पुनश्चादर्शनं गतः '–तसेंच आपल्या जादूच्या पोतडींतून सरकार हवा तेवढा पैसा निर्माण करतें व परत गुप्त करूं शकतें. गेल्या प्रकरणांत आपण पाहिलें कीं, सरकार आपल्या हुकमतीखालील बँकेस सोनें किंवा तत्सम जोखमीच्या आधारावर ठराविक प्रमाणांत नोटा छापण्यास परवानगी देतें. परंतु अशा जोखमीशिवाय आपल्या वचनचिठ्ठयांवर आपल्याच बँकेमार्फत जरूर तेवढ्या नोटा सरकार छापूं शकतें. जोंपर्यंत सरकारावर विश्वास आहे, तोंपर्यंत अशा नोटांहि पूर्वीसारखाच पैसा म्हणून व्यवहारांत राहूं शकतात. पण हा अगदीं शेवटचा उपाय. क्वचित् काळीं जेव्हां सरकारची आर्थिक स्थिति चांगली आहे म्हणून थोडासा अशा रीतीनें पैसा उभा केला तर हरकत नाहीं अशी अर्थमंत्र्यास खात्री वाटते; किंवा खंबीर मनःस्थितींतील सरकार विशिष्ट परिस्थितींत जादा पैसा निर्माण करून त्याच्या वापरावर पूर्ण नियंत्रण ठेवतें;[1] तेव्हांच अशा मार्गाचा अवलंब केला जातो. नाहींतर चलनाची किंमत ज्या कागदावर तें छापलें जातें त्या इतकीहि राहणार नाहीं. मग सरकारचें दिवाळें निघण्यास कितीसा अवकाश! व असें सरकारचेंच दिवाळें निघाल्यावर जनतेचे कोण हाल होतील, याची कल्पनाच केलेली बरी! अलीकडेच चीनमध्यें झालेल्या चलनवाढीच्या परिणामाची आपणांस कल्पना आहेच. तेथें एका वेळच्या जेवणास रु. ३० व एका बुटाच्या जोडीस रु. १५० पडत. पहिल्या महायुद्धानंतर जर्मनींत यापेक्षांहि भयंकर परिणाम झाला होता. तेथें एका अधिकाऱ्याचा पगार म्हणजे एक छकडाभर नोटा होत. असो. अशी चलनवाढ अगदीं अपरिहार्य स्थितींत सरकार करील, एरवीं नाहीं.

**( उ ) दंड**—यानंतर सरकारला आणखी एका मार्गानें पैसा मिळूं शकतो, आणि हा म्हणजे सरकारी नियमांचा भंग केल्याबद्दल नियमभंग करणाऱ्यांकडून

---

१. याचें आणखी विवेचन प्रकरण १३ मध्यें केलेलें आहे, तें पहा.

जो दंड वसूल केला जातो तो. असा दंड वसूल करण्यामागें मूळ कल्पना उत्पन्न मिळविण्याची नसून, शासनसंस्थेनें सुव्यवस्थित कारभाराकरितां जे नियम केलेले असतात, त्यांचें नागरिकांकडून दंडाच्या भीतीनें योग्य पालन केलें जावें ही आहे. तेव्हां एकंदर उत्पन्नाचा अशा रीतीनें मिळणारा पैसा हा अगदींच लक्षांत न घेण्यासारखा भाग असतो. पण जेव्हां आपण सरकारी उत्पन्नाच्या मार्गांचा उल्लेख करितों, तेव्हां हाहि एक मार्ग आहे, म्हणून याची दखल येथें घेतली एवढेंच.

( ऊ ) **बेवारशी मिळकत**—याशिवाय यासारखाच कधीं तरी अपरिहार्य कारणांमुळें सरकारी खजिन्यांत भर घालणारा असा आणखी एक उत्पन्नाचा मार्ग आहे, आणि तो म्हणजे बेवारशी मिळकत सरकारजमा होणें हा होय. एखादा माणूस मृत झाला व त्याला कोणी वारस नसले तर त्याची सारी स्थावर-जंगम इस्टेट सर्व समाजाकडे येणें अपरिहार्यच आहे. सर्व समाजाची प्रतिनिधिभूत अशी संस्था म्हणजेच शासनसंस्था म्हणून तिच्याकडेच अशा इस्टेटीची मालकी येते.

( ए ) **कर्जें**—पण या सर्व मार्गांनीं येणारें उत्पन्न कांहीं कांहीं वेळेला मध्यवर्ती सरकार असो वा राज्यसरकार असो, या दोघांनाहि पुरत नाहीं. दुष्काळ, भूकंप, पूर, टोळधाड यांसारख्या मानवी यत्नांच्या आवांक्याबाहेरच्या आपत्ति जेव्हां समाजावर येतात, तेव्हां त्यास तोंड देणें प्रत्यक्ष तशा परिस्थितींत सांपडलेल्या व्यक्तींस शक्य नसतें. त्या ठिकाणीं सरकारी हस्तक्षेपाचीच जरूरी असते. तसेंच युद्ध सुरू झाल्यास, तें चालविण्याकरितांहि पैशाची अतोनात जरूरी भासते. अशा वेळेस जादा कर लादून नागरिकांची अप्रीति संपादन करण्यापेक्षां सरकार खाजगी व्यक्तीप्रमाणें राष्ट्रांत किंवा परराष्ट्रांत कर्जें उभारून पैसा गोळा करतें. ज्यांच्याजवळ पैसा असतो, त्यांस कररूपानें एकदां गेलेला पुन्हां परत न येणारा असा पैसा देण्यापेक्षां कर्जाऊ रक्कम देणें अधिक आवडतें. कारण पैसाहि सुरक्षित राहतो; व त्यावर खात्रीचें व्याजहि मिळतें. कर देण्यास माणूस नेहमींच नाखूष असतो. त्याचें मुख्य कारण असें कीं, करापासून त्यास प्रत्यक्ष असा केव्हांच फायदा मिळत नाहीं. जो कांहीं फायदा होत असेल तो सारा अप्रत्यक्ष. त्यामुळें माणूस कर देण्याची चुकवाचुकव करतो. तसें कर्जाचें नाहीं. म्हणून जेव्हां नवीन कर लादून पैसा गोळा करण्यापेक्षां कर्जाऊ रकमा घेणें सरकारास सोईस्कर वाटतें, तेव्हां अशा रीतीनेंच पैसा मिळविण्याचा तें प्रयत्न करतें. कर्ज घेण्याचे सरकारचे प्रकार निरनिराळे

असतात. तुम्हां आम्हां सर्वांनाच परिचित म्हणजे २॥, ३, ३॥, ४ टक्के वगैरे ज्या दरानें कर्ज मिळण्याची शक्यता असते अशा दरांचीं, जरूरीप्रमाणें ५।१० कोटींचीं, अमुक वर्षांत परतफेड केली जाईल अशीं ठराविक मुदतीचीं कर्जे उभारलीं जातात तो पहिला प्रकार. हा झाला लांब मुदतीच्या कर्जांचा व्यवहार. पण सरकारला छोट्या मुदतीचींहि कर्जें नेहमीं लागतात. कर किंवा इतर उत्पन्न वर्षांतून ठराविक वेळीं मिळतें. पण सरकारी खर्च मात्र सतत वर्षभर चालू असतो. अशा वेळीं सरकार महिना, दोन महिने मुदतीचीं ट्रेझरी-बिलें विकून पैसा गोळा करतें. त्याशिवाय राष्ट्रीय बचत, छोटी बचत, पोस्ट ऑफिस सेव्हिंग्ज बँकेंतील ठेव, इन्शुअरन्स कंपन्यांच्या रिझर्व बँकेंतील ठेवी, यांचाहि सरकार उपयोग करतें. या सर्व कामीं हल्लींच्या बँकांचा सरकारला फारच उपयोग होतो.

कर्ज म्हणजे सरकारी उत्पन्न नव्हे. कर व इतर मार्गांपासून जो पैसा किंवा पैशाचा मोबदला सरकारी खात्यांत जमा होत असतो, तो कांहीं परत द्यावा लागत नाहीं. तो एकदां आला तो आला. पण कर्जाचें तसें नाहीं. कर्जाची परतफेड करावीच लागते. तथापि हा एक सरकारी जमेचा मार्ग आहे, म्हणून त्याची नोंद या प्रकरणांत केली आहे. तें जेव्हां फेडलें जातें, तेव्हां तो पैसा खर्चखातीं टाकला म्हणजे जमेची कर्जामुळें फुगलेली बाजू आपोआपच कमी होते. कर्ज व कर्जफेडी-विषयीं बाराव्या व तेराव्या प्रकरणांत सविस्तर विवेचन केलेलें आहे.

याप्रमाणें थोड्याबहुत फरकानें याच तऱ्हेचे स्थानिक स्वराज्यसंस्थांचे देखील उत्पन्नाचे मार्ग असतात.

( १ ) कर, ( २ ) चालविलेल्या उद्योगधंद्यांपासून मिळणारा नफा, ( ३ ) कर्जें, ( ४ ) समाजांतील व्यक्तींकडून मिळणारी मोफत मदत, ( ५ ) दंडाची रक्कम व ( ६ ) बेवारशी मिळकत. या सहा मार्गांनीं सरकारी तिजोरींत पैसा जमा होत असतो. पण हल्लीं सरकारी गरजा वाढत आहेत. तेव्हां वरीलपैकीं कोठल्या मार्गानें जादा लागणारा पैसा जमा करावा हा प्रश्न सोडविण्याकरितां नामवंत अशा अर्थशास्त्रज्ञांनादेखील प्रत्येक अंदाजपत्रकाचे वेळीं डोक्यास शीण द्यावा लागतो. याच प्रकरणांत विनावेतन काम व सल्लामसलत या मार्गांचा सरकारनें उपयोग करण्याचा जास्तींत जास्त प्रयत्न करावा असें सुचविलें आहे. या निर-निराळ्या मार्गांविषयीं सविस्तर विवेचन पुढील प्रकरणांतून करूं.

# प्रकरण ४ थें

# कर-कसोट्या

**१. कर नसावेत, इति अराजकवादी**—मानवानें जेव्हां प्रथम शासन-संस्था निर्माण केली, तेव्हांच त्यानें त्या संस्थेचा खर्च चालविण्याची जबाबदारी उचलली. हा खर्च चालविण्याकरितां ह्या संस्था कशा रीतीनें पैसा जमा करतात, तेंहि आपण मागील प्रकरणांत पाहिलें. या मार्गांपैकीं सध्यांतरी कररूपानें पैसा जमा करणें हा एक प्रमुख मार्ग आहे. तेव्हां करच नसावेत असें कोणासहि ठासून म्हणतां येणार नाहीं. पण असें म्हणणारादेखील एक वर्ग आहे व तो म्हणजे अराजकवाद्यांचा.

या वर्गाचें म्हणणें असें कीं, शासनसंस्थाच नको. शासनसंस्थाच नसली म्हणजे खर्च नाहीं व मग कर द्यावयाचे कोणाला ? पण या विचारसरणींत फारसें तथ्य आहे असें दिसत नाहीं. एक तर मनुष्यस्वभावांतील एकंदर विरोधाभास पाहतां, विनाशासन समाजांत स्थैर्य, स्वास्थ्य व सुरक्षितता नांदतील कीं नाहीं हा एक मोठा वादाचा मुद्दा आहे. हाताचीं पांच बोटें जशीं सारखीं नसतात, तसें पांच माणसांचें कशाला, दोन सारख्या विचारांचीं माणसें भेटणें जवळ जवळ अशक्यच. फार काय एक माणूसदेखील, स्वतांच्या स्वार्थाचा प्रश्न आला तर एका तऱ्हेनें विचार करतो, व दुसऱ्याचा तसा प्रश्न उपस्थित झाला तर दुसऱ्याच तऱ्हेनें विचार मांडतो. तसेंच एकंदर समाजाचा विचार करणें झाल्यास तोच अगदीं तिसऱ्याच तऱ्हेनें विचार करतो. मानवी स्वभावाचे हे निरनिराळे पैलू पाहिले असतां, असा शासनविरहित समाज निर्माण होईल कीं नाहीं, हा मोठाच प्रश्न आहे ! कांहीं झालें तरी हा मानवी प्रगतीचा परमोच्च बिंदु आहे. तो केव्हां गांठला जाईल तो जावो ! अर्थशास्त्रज्ञांस ह्या तऱ्हेनें विचार करून भागणार नाहीं. क्षणभर असें जरी मानलें कीं, अशा तऱ्हेचा समाज निर्मिणें ही अगदीं नजिकच्या काळांतील शक्यता आहे, तरी प्रत्येक नगरामध्यें रस्ते, पाणीपुरवठा, वाहनांची सोय, अशा परस्पर सहकार्यानें शक्य होणाऱ्या सुखसोयीं-

करितां तरी पैसा नगरपालिकेला उभारावा लागेलच. व त्याकरितां पैसा हा जमा करावा लागणारच. मग तुम्ही त्यास कांहींहि नांव द्या.

२. **कर-कसोटया**—एकदां कर देण्याची उपयुक्तता मानल्यावर नंतर मात्र तो किती असावा, कसा वसूल करावा, या सर्व बाबींचा विचार करणें अत्यावश्यक ठरतें.

कर किती असावा, या प्रश्नाचा दोन बाजूंनीं विचार करावा लागेल (१) पहिली बाजू अशी कीं, प्रत्येक व्यक्तीवर कर किती असावा ? व (२) दुसरी म्हणजे शासन-संस्थेचें कररूपानें येणारें उत्पन्न किती असावें ?

कर हे केव्हांहि अप्रियच, तेव्हां कररूपानें येणारें उत्पन्न शक्यतों कमी असावें, असें कोणीहि प्रथमदर्शनीं म्हणेल. परंतु पूर्ण साम्यवादी समाजव्यवस्थेंत सर्वच उत्पादक धंदे सरकारी मालकीचे असल्यानें, त्याच राजवटींत हें शक्य आहे. इतर राजवटींत नाहीं.

सध्यांच्या यांत्रिक युगांत प्रत्येक व्यक्तीवर कर किती असावा याचे पुन्हां दोन गट पडतात. कुटुंबप्रमुख व त्या कुटुंबांतील प्रत्येक मिळवता व खर्च करणारा माणूस हा एक गट व मोठे मोठे धंदे चालविण्याकरतां उभारण्यांत आलेल्या मंडळ्या किंवा संस्था हा दुसरा गट.

**( अ ) ऐपत-उत्पन्नावर, व्यक्तीवर अवलंबून असणाऱ्या माणसांवर, स्वार्जित व पूर्वार्जित उत्पन्नावर अवलंबून असते**—या दोन्ही गटांवर कर किती असावा याविषयीं अर्थशास्त्रज्ञांनीं कांहीं प्रमाणें-तत्त्वें-ठरविलीं आहेत. त्यांतील प्रमुख म्हणजे प्रत्येक गटाची कर भरण्याची ऐपत ( ability to pay ) हें होय. प्रत्येक गटाची कर भरण्याची ऐपत, त्या गटाच्या मिळकतीवर अवलंबून असते हें उघडच आहे. एखाद्याचें वार्षिक उत्पन्न रु. २००० आहे, या इसमापेक्षां ( इसम हा शब्द गट या अर्थी सोयीकरितां वापरला आहे.) ज्याचें वार्षिक उत्पन्न रु. ३००० आहे, हा इसम केव्हांहि कर देण्यास अधिक पात्र आहे. हें विधान प्रथमदर्शनीं तर योग्य दिसतें. पण मानवी व्यवहार एवढा साधा असता तर सध्यां जे निरनिराळे गुंतागुंतीचे सामाजिक व आर्थिक प्रश्न तज्ज्ञांसहि भेडसावतात व त्यांची मति कुंठित करतात, ते प्रश्न उपस्थितच झाले नसते. गुंतागुंत कशी निर्माण होते तें पहा.

'अ' व 'ब' या दोघांचेंहि वार्षिक उत्पन्न रु. ३००० चें आहे, पण 'अ' वर ७ माणसें अवलंबून आहेत व 'ब' एकटाच सडा फटिंग आहे. तेव्हां 'ब' वर कांहीं ठराविक कर आकारला तर त्यास तो जड वाटणार नाहीं, पण दोघांचेंहि उत्पन्न सारखेंच म्हणून तेवढाच कर 'अ'वर आकारला तर 'अ'स हा एक अन्याय व जुलूम वाटेल. आणखी असें समजा कीं, 'अ'चें वार्षिक उत्पन्न रु. ३००० आहे, व त्यावर ७ माणसें अवलंबून आहेत व 'ब'चें वार्षिक उत्पन्न रु. ५००० आहे व त्याचेवरहि ७ च माणसें अवलंबून आहेत, तेव्हां 'अ' वर रु. ३००० चे प्रमाणांत व 'ब' वर रु. ५००० चे प्रमाणांत कर आकारला तर त्यांत 'अ' वर अन्याय होतो. कसा तें पहा.

दोघांचेहि कुटुंबांत सारखींच माणसें असल्यानें दोघांच्याहि प्राथमिक गरजा सारख्याच असतात, पण दुसऱ्याचें उत्पन्न मात्र त्या प्रमाणांत बरेंच अधिक असतें. अशा स्थितींत 'अ'ला रु. ३००० त आपला खर्च भागविणें जड जातें, पण 'ब'ला त्या मानानें रु. ५००० त आपला खर्च भागविणें सुकर जातें. म्हणजे दोघांवरहि सारख्या प्रमाणांत कर आकारला तर एकास मुळांतच खर्च भागविणें जड जात असतांना त्यांत त्या कराची आणखी धोंड येते, व दुसऱ्यास तसें भासत नाहीं. याचाच अर्थ असा कीं, पहिल्यास रु. ३००० ची थोरवी (Marginal Utility) दुसऱ्याच्या रु. ५००० पेक्षां जास्त आहे. याकरितां कर आकारण्याची पद्धत एखाद्याचें जसजसें उत्पन्न वाढेल तसतसा त्याचेवर अवलंबून असणाऱ्या माणसांच्या संख्येचा विचार करून जादा दर अशी वाढत्या श्रेणी (Progressive) प्रमाणें ठेवावी लागते. अशी सुधारणा आपल्याकडील प्राप्तिकरकायद्यांत व्हावी तेवढी झालेली नाहीं. पण तशी ती होणें जरूर आहे.

याबाबत आणखीहि एका पर्यायाचा उल्लेख करणें जरूर आहे. एखादा इसम स्वतः खपून आपलें उत्पन्न उभारीत असेल व दुसरा वडिलार्जित किंवा पूर्वायुष्यांत मिळविलेल्या उत्पन्नावर चरितार्थ चालवीत असेल, तेव्हां राष्ट्रीय उत्पादनशक्तीच्या कामीं पहिल्याचे श्रम कारणीभूत होत असल्यानें, त्यास तसे श्रम करण्यास उत्तेजन मिळावें म्हणून कर आकारतांना त्या वर्षाचें स्वार्जित उत्पन्न (earned income) व त्या वर्षाचें पूर्वार्जित उत्पन्न (Unearned income) असा भेद करून पहिल्या उत्पन्नावर कमी प्रमाणांत कर आकारणें युक्त ठरतें.

प्राप्तीवरील कर ( Income tax ) आकारतांना वरील सर्व बाबींचा विचार करून मगच दर ठरविलेले असतात. पण या बाबतींत आपल्या देशांत कांहीं महत्त्वाच्या उत्पन्नाच्या मार्गांचा विचारच केलेला दिसत नाहीं. उदाहरणच घ्यावयाचें म्हटल्यास वारसा-कर, कीं ज्याला इंग्लंडमध्यें Inheritance tax किंवा Death duties या नांवानें संबोधिलें जातें. या मार्गाची आपल्या देशांत अजिबातच दखल घेतली गेलेली नाहीं. वास्तविक पहातां वर चर्चिलेल्या तत्त्वास अनुसरून हा अगदीं योग्य कर आहे. हा कर म्हणजे एक प्रकारचा प्राप्तीवरील करच होय. वारसा म्हणून जेव्हां एखाद्यास अशी इस्टेट मिळते, तेव्हां ती त्याचें त्या सालाचें उत्पन्नच नव्हे का? अर्थात् असें उत्पन्न हें पूर्वार्जित ( Unearned ) ठरणार व अशावर स्वार्जित उत्पन्नापेक्षां जादा कर आकारला जाईल.[1]

**( आ ) काम करण्याची व संचय करण्याची प्रवृत्ति न मारणें**- पण असें करतांना आपणांस आणखी एका बाबीची दखल घेणें जरूर आहे. ती म्हणजे, जो इस्टेट मागें शिल्लक ठेवतो, त्यास जर इस्टेट आपल्या मागें सरकारजमाच होत असेल, तर मग ती मिळविण्याची व नंतर शिल्लक ठेवण्याची धडपड कशाला, असें वाटेल. असें जर झालें तर आपल्या हातानें सोन्याचें अंडें घालणारी कोंबडी मारल्यासारखें होईल. अशानें कोणासच जास्त धडपड करून जादा पैसा मिळवावा व आपल्या मुलाबाळांकरितां शिल्लक ठेवावा असें वाटणार नाहीं. व्यक्तीव्यक्तींची काम करण्याची व शिल्लक ठेवण्याची प्रवृत्तीच ( Desire to Work and Save ) मारली जाईल. व अशासारखी राष्ट्रीय हानी दुसरी कोणतीच ठरणार नाहीं. प्रत्येकजण काम करतांना आपल्या स्वतांस खाण्यापिण्यास मिळालें, कपडा लत्ता मिळाला कीं बस्स, अशा प्रवृत्तीनें वागूं लागेल. काम जादा करून राष्ट्रीय उत्पन्नांत भर घालण्याचें बाजूसच राहिलें पण दैनंदिन गरजा भागविणेंहि त्यांना कालांतरानें कठीण होऊं लागेल. याकरितांच वारसाकर[2] भरमसाट ठेवून चालत

---

१ ' मालमत्ता कर ' ( Estate Duty ) लादण्याविषयींचें विधेयक (Bill) ता. ११-८-५२ रोजीं मध्यवर्ती संसदेपुढें मांडण्यांत आलेलें आहे. त्याचें यथावकाश कायद्यांत रूपांतर होईल असा भरंवसा वाटतो.

२ वारसाकराविषयीं सविस्तर विवेचन प्रकरण ११ मध्यें केलें आहे.

नाहीं. प्राप्तीवरील कर आकारतांनादेखील याचा विचार करावा लागतो. ठराविक मर्यादेच्या पुढील सर्वच उत्पन्न कररूपानें सरकारी तिजोरींत जमा करावयाचें म्हटलें तर, त्या मर्यादेच्या पुढें उत्पन्न व्हावें अशी कोणी धडपडच करणार नाहीं. याकरितां ठराविक मर्यादेचे पुढील उत्पन्नावर रुपयांत चौदा, साडेचौदा आणेपर्यंत कर आकारला जाईल, पण सर्वच रुपया कधींच आकारला जाणार नाहीं.

आपण एखादी व्यक्ति किंवा एखादी संस्थापित धंदेवाईक मंडळी ( Firm ) या दोन्हीं गटांवर त्यांच्या कुवतीप्रमाणें कोणत्या योग्य तत्त्वानुसार कर आकारला जावा हें पाहिलें. पण कांहीं धंदेवाईक मंडळ्यांवर कार्पोरेशन टॅक्स ( Corporation tax ) या नांवावर कर आकारला जातो. अशा मंडळ्या खाजगी असोत किंवा सार्वजनिक मालकीच्या असोत, मात्र त्या मर्यादित ( Limited ) जबाबदारीच्या तत्त्वावर आधारलेल्या असल्या पाहिजेत. मर्यादित जबाबदारी याचा अर्थ असा कीं, अशा कंपन्यांत शेअर ( भाग ) धारण करणाऱ्या भागीदारांची नफानुकसानीबाबतची जबाबदारी त्यांच्या भागांच्या ( Shares ) रकमेइतकीच मर्यादित असते. मंडळीस कितीहि तोटा झाला तरी, भागीदाराचें जास्तींत जास्त नुकसान म्हणजे त्याच्या भागाची सर्व रक्कम, त्या तोट्याच्या कारणीं लाविली जाईल: पण त्याच्या खाजगी माळमत्तेस धक्का लावला जाणार नाहीं. अशा कंपन्यांस एका विशिष्ट मर्यादेपुढें जो निव्वळ नफा होईल, त्यावर प्रथम ठरलेला कर ( कॉर्पोरेशन टॅक्स ) आकारला जातो व नंतर जी रक्कम राहील, ती भागीदारांमध्यें ज्याच्या त्याच्या शेअर्सच्या संख्येच्या प्रमाणांत वांटली जाते.

अशा कंपन्या मोठ्या भांडवलावर संघटित स्वरूपांत चालविल्या जात असल्यानें त्या जो माल उत्पादन करितात त्या बाबतींत त्यांना एक प्रकारची मक्तेदारीच मिळते. त्यामुळें त्या भरमसाट नफा मिळवूं शकतात. अर्थात् याप्रमाणें त्यांची ऐपत मोठी असल्यानें त्यांचेवर असा कर आकारला जातो.

कांहीं कांहीं वेळेस नवीन धंदे काढण्यास लोकांस उत्तेजन मिळावें म्हणून अशा मंडळ्यांवर पहिलीं कांहीं वर्षें असा कर आकारला जाणार नाहीं, असें सरकार आश्वासन देतें, तें वर चर्चिलेल्या लोकांच्या ( Desire to work and save ) जास्त काम करून पैसा शिल्लक ठेवण्याच्या सहजप्रवृत्तीस उत्तेजन देण्याकरितांच.

कांहीं कांहीं वेळेला असा मुद्दा मांडण्यांत येतो कीं, जादा उत्पन्नावर जादा कर आकारल्यानें व्यक्तीव्यक्तींची काम करण्याची व शिल्लक ठेवण्याची प्रवृत्ति मारली जाते, म्हणून सर्वांवर सारखाच कर आकारला जावा. जादा उत्पन्न मिळविणारांवर जादा कर आकारला जाऊं नये. थोडा विचार केला असतां, ही कल्पना भ्रामक आहे, हें कोणाच्याहि सहज लक्षांत येईल. एकतर ३००० रु. उत्पन्न असणाऱ्या व्यक्तीवर व ३०,००० रु. उत्पन्न असणाऱ्या व्यक्तीवर कर सारखा असावा हें म्हणणें हास्यास्पद आहे. शासनसंस्थेच्या संरक्षणाखालीं ज्या प्रमाणांत उत्पन्न निर्धास्त भोगतां येतें, त्या प्रमाणांत तिच्या खर्चाकरितां पैसा पुरविला पाहिजे हें न्याय्यच आहे. दुसरें म्हणजे प्रत्येकाच्या राहाणीचें मान ठरलेलें असतें. समजा, माझ्या कमींत कमी गरजांच्या मानानें मला वर्षास रु. ६००० लागतात. पण कर आकारण्याच्या दरांत फरक केल्यानें त्यांतील रु. ५०० मला जर जादा द्यावे लागले, तर ते गेलेले जादा मिळविण्याकरितां जादा श्रम करण्याची मला साहजिकच इच्छा होणार, तेव्हां वाढत्या श्रेणीनें कर आकारण्यानें माणसांच्या सहज प्रवृत्ति मारल्या जात नाहींत हें उघड आहे.

( इ ) **विशिष्ट परिस्थितींत विशिष्ट सवलती**—एखादे वेळेस सरकारला लांब मुदतीचीं कर्जें हवीं असल्यास व लोकांत तीं देण्याची प्रवृत्ति दिसून न आल्यास आणि अशा कर्जावरील व्याजाचा दर वाढविणें हेंहि अयोग्य वाटल्यास, किंवा कमी उत्पन्नाच्या लोकांत जादा शिल्लक ठेवण्याची प्रवृत्ति निर्माण करण्याकरितां अशा रीतीनें गुंतविलेल्या सर्व रकमांवर किंवा पुढें त्यावर मिळणाऱ्या व्याजावर कराच्या आकारणीची सूट देण्याचें आश्वासन देऊन सरकार अशा रीतीनें लोकांस अशा कर्जरोख्यांत पैसा गुंतविण्यास प्रवृत्त करतें. किंवा एखाद्या सार्वजनिक निधीस देणगीदाखल दिलेल्या रकमांवर कर न आकारण्याचें आश्वासन देऊन तो निधि वाढविण्यास मदत करतें. गांधीफंडास देणगीदाखल दिलेल्या रकमांवर हिंदसरकारनें १९४८ सालीं प्राप्तिकराची माफी दिलेली होती, त्यावेळीं वरील उद्देशास अनुसरूनच तसें केलें होतें. पण कांहीं विशिष्ट वेळीं अशा मार्गाचा अवलंब करावा असें सुचविणें हें वेगळें, व सदानकदा ठराविकच कर असावा, जादा उत्पन्नावर जादा कर असूं नये, असें म्हणणें हें वेगळें.

( ई ) **आर्थिक विषमता कमी करणें**—अशा रीतीनें कर आकारण्याचा

दुसराहि एक हेतु असतो, तो असा कीं, ज्या त्या काळच्या रूढ विचारसरणीप्रमाणें व्यक्तीव्यक्तींमधील उत्पन्नाच्या विषमतेची तीव्रता कमी करणें. जर ‘ अ ’चें उत्पन्न रु. ५००० व ‘ ब ’चें रु. ५०,००० असेल, तर त्या काळच्या समाजांतील एकंदर विचारधारांप्रमाणें ‘ ब ’ वर जास्तींत जास्त कर लादून व ‘ अ ’वर कमींत कमी कर लादून दोघांच्या उत्पन्नांतील तफावत कमी करणें आवश्यक असतें. असें न केल्यास समाजस्वास्थ्य बिघडण्याचा संभव असतो. समाजांतील एक पराच्या गादीवर तर दुसऱ्यास साधी शेणानें सारवलेली जमीनहि शेज करण्यास नाहीं, असें झालें तर तें असंतोषास कारण होतें. घटकांघटकांमधील द्वेषभाव काढून टाकून प्रेमभाव वृद्धिंगत करणें, हें तर शासनसंस्थेचें मुख्य उद्दिष्ट असतें. म्हणून कर आकारतांना या सामाजिक व राजकीय बाबींचाहि विचार करणें भाग असतें.

समाजसत्तावादी विचारसरणीचा अंगिकार करणारे तज्ज्ञ, भांडवलपट्टी ( Capital Levy ) आकारावी असें प्रतिपादितात. त्यांचें म्हणणें असें कीं, समाजाच्या घटका-घटकांमधील आर्थिक विषमता कमी करावयाची हें तत्त्व एकदां मान्य केल्यानंतर, अशा तऱ्हेचा कर लादणें हें सयुक्तिकच ठरतें. याशिवाय दुसरा उत्तम मार्ग सांपडणें कठीण. एखाद्याजवळची शिल्लक किंवा भांडवल ज्या प्रमाणांत जास्त त्या प्रमाणांत वाढत्या दरानें कर आकारावा. पण असें केलें तर लोकांची जादा काम करून अधिक पैसा मिळविण्याची प्रवृत्ति मारली जाईल, किंवा असा मिळविलेला पैसा शिल्लक ठेवण्यापेक्षां खर्च करण्याकडे प्रवृत्ति होईल. असें झाल्यावर नवीन धंद्यास किंवा चालू धंद्याच्या जोपासनेस व वाढीस लागणारें भांडवल मिळूं शकणार नाहीं.

तेव्हां असे कर लादतांना मानवी स्वभावाचादेखील विचार करावा लागतो. बरें, अशा रीतीनें लोकांनीं पैसे न गुंतविल्यानें धंदे जर निघाले नाहींत, तर राष्ट्रीय औद्योगिक प्रगति होण्याकरितां सरकारची स्वतःची तसे धंदे काढण्याची व चालविण्याची तयारी पाहिजे. नाहींतर सगळेंच मुसळ केरांत ! समाजसत्तावादास पूर्णपणें वाहिलेलें सरकारच हें करूं शकेल, इतर नाहीं. संमिश्र अर्थव्यवस्थेंतून उत्क्रांतितत्त्वानें २० ते ३० वर्षांच्या काळांत समाजवादाकडे जावयाचें, या दृष्टिकोनांतून ह्या लोकशाही व्यवहाराचें विवेचन आपण करीत आहों. तेव्हां

योग्य प्रचारानें लोकांची मनोभूमिका तयार करीत करीत शेवटची पायरी म्हणून हा कर आकारला तर हरकत नाहीं. एकदम ह्या कराची भाषा काढून लोकांना भिववून आपला मार्ग आपणच अवघड करून घेण्यांत अर्थ नाहीं.

**( उ ) ऐपत उत्पन्नावर. उत्पन्नाच्या अर्थाबाबतींतील मतांतर, जिंदगी हेंच उत्पन्नाचें साधन या म्हणण्यांतील अशास्त्रीयता**- याप्रमाणें प्रत्येक गटानें आपआपल्या कुवतीप्रमाणें ( Ability to pay ) वर चर्चिलेल्या सर्व सामान्य तत्त्वांस अनुसरून कर देणें योग्य, असें आपण ठरविलें. कुवत त्या गटाच्या वार्षिक उत्पन्नावर अवलंबून आहे असें आपण गृहीत धरलें. वार्षिक उत्पन्न याचा अर्थ, व्यक्तीची किंवा मंडळीची कष्टार्जित किंवा स्थावरजंगम मालमत्तेपासून मिळणारी एका वर्षांतील प्राप्ति, असा गृहीत धरला. पण याबाबत कांहीं अर्थशास्त्रज्ञ मतभेद दर्शवितात. त्यांच्या मतें कोणत्याहि गटाचें वार्षिक उत्पन्न ठरवितांना त्याच्या जिंदगीचा ( Estate ) विचार केला जावा. कारण, जिंदगी हेंच उत्पन्न मोजण्याचें साधन आहे. एरवीं एखाद्याचें उत्पन्न ठरविणें अशक्य आहे. औद्योगिक क्रांतिपूर्व काळांत या मतप्रणालींत बराच तथ्यांश होता, कारण त्याकाळीं स्थावर जिंदगी हेंच संपत्तीचें मोजमाप करण्याचें साधन होतें. त्यामुळें ज्यांचेजवळ जितकी एकर जमीन त्यानें प्रत्येक एकरास एका ठराविक दरानें कर द्यावयाचा अशी पद्धति होती. ह्यासच जमीनधारा ( Land Tax ) म्हणतात व तोच एक कर त्या काळीं अस्तित्वांत होता. हा कर आकारतांना जमिनीचा सरसनीरसपणा लक्षांत घेतला जाई व प्राप्ति ठरवून दर एकरीं ठराविक दरानें कर वसूल केला जाई. पण कर आकारण्याची ही फारच ओबडधोबड पद्धत झाली. त्या पद्धतींत प्रत्येक वर्षास जमिनींत ठराविक प्रमाणांतच उत्पन्न येईल असें गृहीत धरलें जातें. फार तर उत्पन्नाची आणेवारी ठरवून ज्या वर्षी आठ आण्यांपेक्षां कमी उत्पन्न येईल त्या वर्षी करवसुलींत थोडी सवलत द्यावयाची व पुढील वर्षी तो अशा सूट दिलेल्या रकमेसह सबंध वसूल करावयाचा, अजिबातच पीक गेलें व दुष्काळच पडला तर मग सबंध सूट द्यावयाची असें ठरविलें जातें. पण एखाद्याच्या कुटुंबांत माणसें किती आहेत, त्यांच्या ताब्यांत जमीन किती आहे, याचा विचार न करतां एक एकर जमीन एखाद्याजवळ असली व त्याचेवर ८-१० माणसें जरी अवलंबून असलीं तरी त्याचेवर, व दुसरा एखादा असा कीं, ज्याचेजवळ ५० एकर

जमीन आहे व त्याच्या कुटुंबांत '५-६ माणसें आहेत, त्याचेवरहि एकरांच्या संख्येवरच कर आकारला जातो. त्यामुळें करपद्धतींत जो न्याय ( Justice ) व जें वाढत्या श्रेणीचें तत्त्व ( Progressive ) असावें लागतें, त्या दोन्हींस बाध येतो. या कारणांनींच ही पद्धत अशास्त्रीय ठरते. तसेंच पिकाची आणेवारी ठरविणें म्हणजे तर अगदींच ठोकताळ्याचें काम. एका गांवांतील निरनिराळ्या ठिकाणच्या चार जमिनींच्या उत्पन्नाची सरासरी पहावयाची व त्यावरून सबंध गांवची आणेवारी ठरवावयाची. त्यांत एखाद्या व्यक्तीच्या सोयी गैरसोयी, एखाद्या वर्षांत त्याचेवर आलेल्या कौटुंबिक, सामाजिक, दैवी अशा अडचणी, कीं ज्यांचे योगानें त्याच्या एकंदर उत्पन्नांत फरक पडावा, अशा गोष्टींची दखल घेतली जाणेंच व्यावहारिकदृष्ट्या अशक्य ठरतें. त्यामुळें अशा रीतीनें कर आकारणें म्हणजे अर्थशास्त्रांतील तत्त्वांचा खून करणेंच होय. अर्थशास्त्रांतील तत्त्वें तरी काय, सर्वसामान्य सामाजिक नीतितत्त्वांवरच आधारलेलीं असतात. तेव्हां कोणत्याहि दृष्टीनें जरी विचार केला तरी हा कर अयोग्यच ठरतो. पण त्या काळीं एकंदर अर्थव्यवहारांत गुंतागुंतच कमी, व सर्वांचें उत्पन्नाचें साधन म्हणजे जमीन, त्यामुळें हा सर्वमान्य होऊं शकला, पण हल्लीं तसें नाहीं. जमिनी-शिवाय उत्पन्नाचीं हल्लीं कितीतरी जादा साधनें उपलब्ध झालेलीं आहेत, व उत्पन्नाचें मोजमाप करणें हेंहि चलनांत सर्वच गोष्टींचा हिशेब करण्याची पद्धति वाढल्यानें सोपें झालें आहे. तशांतच एखाद्यास अजिबातच स्थावर उत्पन्न नाहीं, पण स्वतःच्या बुद्धिकौशल्यावर मात्र तो महिना हजारों रुपये मिळवितो किंवा दुसऱ्या उद्योगधंद्यापासून गडगंज पैसा मिळवितो, अशास वरील तऱ्हेनें कांहींच कर द्यावा लागणार नाहीं. उदाहरणार्थ, वकील, डॉक्टर, मोठमोठ्या पगाराचे नोकर, कारखानदार यांना करच द्यावा लागणार नाहीं. हें कोणाहि विचारवंतास पटणार नाहीं. म्हणून वरील विचारसरणींत कांहींच अर्थ नाहीं. उलट जमीन-धाऱ्यासारखे कर अगदींच अशास्त्रीय असल्यानें हे काढून टाकून त्याची जागा शेती उत्पन्नावरील कर ( Agricultural incometax ) अशा प्रकारानें घेणें शास्त्रीय ठरेल.

**( ऊ ) अंमलबजावणींतील सुलभता, निःपक्षपातीपणा व सोय साधेल असा कर असावा**—या सर्व विवेचनावरून हें लक्षांत येईल कीं,

जेव्हां आपण एखाद्याची कर भरण्याची कुवत ( Ability to Pay ) ही न्याय व वाढती श्रेणी ( Progressive ) या तत्त्वांवर आधारली जावी असें म्हणतों, तेव्हां ठराविक रकमेच्याखालीं उत्पन्न असणाऱ्यांवर आजिबातच कर असूं नये असें गृहीतच धरतों. समजा, एखाद्याचें वार्षिक उत्पन्न रु. ५०० आहे, अशावर कर लादणें अगदींच अयोग्य ठरेल. अन्न-वस्त्रादि प्राथमिक गरजा भागून जर त्याच्या-जवळ जादा उत्पन्न राहील तरच त्याचेवर कर लादणें योग्य ठरेल. अन्न-वस्त्र-आसरा या अगदीं प्राथमिक गरजा आहेत. या तरी कमींत कमी भागल्याच पाहिजेत, पण त्याचबरोबर लग्नकार्य, आजार-औषध यांसाठींहि लागणाऱ्या पैशाची तरतूद करतां आली पाहिजे. यानंतर जर एखाद्याजवळ जादा उत्पन्न राहणें शक्य असेल तरच त्याचेवर कर लादला जाणें योग्य आहे. अर्थात् हें करतांना अगदीं संख्याशास्त्राप्रमाणें एखाद्यावरील तन्तोतंत कराचा आंकडा ठरवावा असें म्हटल्यास तें वस्तुस्थितिदर्शक होणार नाहीं. उदाहरणार्थ, 'अ' आळंदीस रहातो, त्याचेवर पांच माणसें अवलंबून आहेत व त्याचें वार्षिक उत्पन्न रु. ३५०० आहे. आणि 'ब' पुण्यांत रहातो, त्याचेवरहि पांचच माणसें अवलंबून आहेत व त्याचें वार्षिक उत्पन्न रु. ३५०० आहे. पण पुणें हें आळंदीपेक्षां केव्हांहि जास्त महागडें ठिकाण आहे. तेव्हां पुण्यांतील गृहस्थापेक्षां आळंदींतील गृहस्थाचें उत्पन्न आंकड्यांत सारखें जरी असलें, तरी वस्तुस्थितींत अधिक ठरतें. पुणें हें आळंदीपेक्षां फार मोठें शहर आहे, म्हणून कदाचित् पुण्याचें रु. ४००० उत्पन्न म्हणजे आळंदीचें रु. ४५०० असें ठरवून, त्या प्रमाणांत कर आकारतां येतील. पण असें करीत जर बसलों तर मग आळंदी व खेड ( आळंदी खेड तालुक्यांत आहे ) या दोन्हींतील महागाईचें प्रमाण ठरवावें लागेल. बरें, हें ठरविलें तरी तेवढ्यानें काम भागणार नाहीं. प्रत्येक वर्षी प्रत्येक गांवचें महागाईचें प्रमाण कमीजास्त होऊं शकतें. एखाद्या गांवाजवळ एखादा कारखाना निघतो, तर दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं लष्करी छावणी तात्पुरती पडते, तर तिसऱ्या ठिकाणची लोकवस्ती उठून जाते. असे एक ना दोन, अनेक प्रकार होतात. पण इतके सूक्ष्म श्लेष काढणें व ते अंमलांत आणणें, हें त्या कराच्या अंमलबजावणीच्या ( Administrative ) दृष्टीनें जाचक ठरतें. म्हणून रु. ३५०० पर्यंत उत्पन्न असणाऱ्या सर्व इसमांस कराची माफी देण्याचें ठरविल्यास तशी ती, अंमल-बजावणीच्या दृष्टीनें जेवढ्या बाबींचा विचार करणें शक्य आहे तेवढ्या बाबी

लक्षांत घेऊन, मग निरनिराळ्या ठिकाणीं, निरनिराळ्या परिस्थितींत रहाणाऱ्या सर्वच इसमांस द्यावी लागेल.

ज्यानें त्यानें आपापल्या कर भरण्याच्या पात्रतेप्रमाणें कर द्यावा एवढेंच ठरवून अर्थशास्त्रज्ञांस चालणार नाहीं. ह्या पात्रतेचें मापन कोणीं व कसें करावयाचें हेंहि ठरविलें पाहिजे. नाहीं तर अनवस्थाप्रसंग ओढवावयाचा. कारण ज्यानें त्यानें आपापली पात्रता ठरवावयाची, असें जर गृहीत धरलें तर हजारांतून एखादा तरी योग्य प्रमाणांत कर देईल कीं नाहीं याची वानवाच ! बरें, असें जरी मानलें कीं, प्रत्येकजण या प्रमाणांत कर देईल, तरी पण प्रत्येकानें स्वतः आपली पात्रता ओळखावयाची कशी ? याकरितां सरकारनेंच प्रथम ठराविक दर जाहीर करून त्याप्रमाणें निःपक्षपातीपणें सर्व नागरिकांकडून कर वसूल केले पाहिजेत. असें केल्यानें सरकारास स्वतःच्या गरजांचा अंदाज लागत असल्यानें दर काय असावा याबाबत तें निश्चित निर्णय घेऊं शकेल, आणि नागरिकांसहि आपणांस काय कर द्यावा लागेल, याची निश्चित कल्पना येईल.

याबरोबरच नागरिकांच्या सोईप्रमाणें कर वसूल करणें हेंहि इष्टच असतें. प्रत्येक नागरिकाचें उत्पन्न पैशापैशानें जमा होत असतें, व तसेंच तो जरूरीप्रमाणें व खिशांत खेळत असलेल्या पैशाच्या मानानें दररोज खर्च करीत असतो. तेव्हां कर वर्षांतून एकदां केव्हां तरी वसूल करावयाचा म्हटल्यास तें त्यास फारच जड वाटणार. जमा झालेला पैसा खर्च होऊन गेल्यावर तो कर भरणार कसा ! तेव्हां जसा जमा होईल तसा त्याच्याकडून वसूल करणें हें कर भरणारा नागरिक व सरकार या दोघांच्या दृष्टीनें हितावह असतें. ( Pay as you earn. ) पैसा जवळ असल्यावर तो कर म्हणून देण्यास जड वाटत नाहीं, व वसुली अधिकाऱ्यांसहि अशा रीतीनें विनासायास वसूल करितां येतो. याच तत्त्वावर जमीन-धारा पिकाच्या मोसमावर वसूल करतात किंवा प्राप्तिकर दर तिमाहीस अनामत रकमा घेऊन वर्षाच्या शेवटीं ज्याच्या त्याच्या खातीं जमा केला जातो.

**( ए ) वसुली खर्च प्रमाणांत असावा**—विशिष्ट कर लादतांना त्यापासून एकंदर उत्पन्न किती येईल, याचाहि अंदाज बांधला पाहिजे; नाहीं तर ‘ आठ हात लांकूड व नऊ हात ढलपी ’ असा प्रकार व्हावयाचा. कागदावर एखादा कर

फारच चांगला दिसेल, पण तो वसूल केल्यावर एकंदर जेवढा कर येईल, त्यांपैकीं बराचसा भाग जर वसूल करण्यावरच खर्च होणार असेल तर तो मार्ग अवलंबिण्यांत अर्थ नाहीं. उदाहरणच घ्यावयाचें झाल्यास प्राप्तिकराचें घेऊं.

जेव्हां कर आकारण्याच्या तत्त्वांचा (Principles of Taxation) सामान्य माणूस विचार करितो, तेव्हां करपद्धति अगदीं साधी ( Simple ) असावी असें तो म्हणतो.त्याच्या मतें हजारों प्रकारचे कर असण्यापेक्षां, एकच (Simple) साधासुधा प्राप्तिकर असावा, व ज्या अर्थी प्रत्येक नागरिक शासनसंस्थेच्या छत्राखालीं स्वास्थ्य उपभोगितो, त्या अर्थी त्यानें आपलें उत्पन्न कितीका असेना, आपल्या मानानें अल्प प्रमाणांत कां होईना, प्राप्तिकर द्यावा. मग सतरा कर नकोत व आणखी गुंतागुंत नको. असें केल्यानें कर आकारण्याचीं जीं प्रधानभूत तत्त्वें न्याय आणि वाढती श्रेणी ( Progressive ) यांनाहि अनुसरल्यासारखें होतें, व करपद्धति साधीसुधी राहाते. पण असें करण्यांत या तऱ्हेनें प्राप्तिकर लादणें हें ' कर भरण्याची कुवत ' या प्रमुख तत्त्वाशीं विसंगत होतें. हा विचार जरी थोडा वेळ बाजूला ठेवला, तरी, करवसुलीचा खर्च काय येईल व त्यांत जिकीर काय होईल, याची तो दखल घेत नाहीं. प्रत्येक नागरिकापासून कांहींना कांहीं तरी कर वसूल करावयाचा म्हटल्यास एखाद्यापासून दोन आणे वसूल करण्याकरतां दोन रुपये खर्च करण्याची पाळी यावयाची. एवढें करूनहि प्रत्येकाचें उत्पन्न किती हें ठरविण्याचें किती जिकीरीचें काम ! अहो, ज्यांच्याजवळ अगदीं दहादहा कारकून हिशेब लिहिण्यास ठेविलेले असतात व बारीक-सारीक बाबींचीहि नोंद ठेविलेली असते, त्यांचेंदेखील करपात्र उत्पन्न ठरविणें हें केवढें जिकीरीचें काम असतें, याची प्रत्येक प्राप्तिकर अधिकाऱ्यास व असा कर भरणारास कल्पना असते. तर मग एखादा मजूर जो रोज रुपया, आठ आणे मिळवितो, त्याचें उत्पन्न कसें ठरवावयाचें व ठरविल्यास कर वसूल कसा करावयाचा व त्यासाठीं अधिकारी वर्ग लागेल किती ! इतकें असूनहि प्रत्येकजण आपलें उत्पन्न वाजवी-पेक्षां कमीच आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करणार व अधिकारी जास्त आहे असें म्हणणार, व तेंहि वर्षाचें शें-दोनशें रुपयांचें उत्पन्न ठरविण्याकरितां. यांत उभयपक्षीं जिकीर व त्यांतून निर्माण होणारा असंतोष, या गोष्टी दुर्लक्ष करण्याजोग्या नाहींत.तेव्हां करपद्धति ठरवितांना करवसुली खर्च ( Collection

Charges ) कमी असावा, अंमलबजावणीस सुकर ( Administrative Convenience ) असावा, व गैरवाजवी असंतोष ( unnecessary friction ) टाळावा, या तिन्ही तत्त्वांची योग्य दखल घ्यावी लागते.

अर्थात् याचा अर्थ करपद्धतींत साधेपणा ( Simplicity ) असूं नये असा नव्हे. वरील सर्व तत्त्वें सांभाळून जर त्यांत साधेपणा ठेवतां आला तर तो जरूर ठेवला पाहिजे. कारण निष्कारण गुंतागुंत करण्यानें असंतोष, जिकीर, या गोष्टी वाढतात व त्या तर टाळल्या पाहिजेत यावर आपला कटाक्ष आहे.

आतांपर्यंत कर किती असावा व कसा वसूल करावा याचें विवेचन केलें. यावरून हें दिसून आलें कीं, ( १ ) कर ज्याच्या त्याच्या ( व्यक्ति किंवा धंदेवाईक मंडळी ) कुवतीप्रमाणें असावा. मात्र असें करतांना मानवाच्या सहज-प्रवृत्ति मारल्या जाऊं नयेत. आपण जास्त काम करावें व जादा उत्पन्न मिळवावें अशा त्याच्या सहजप्रवृत्ति कायम ठेवाव्यात. नाहींतर एकंदर आर्थिक व्यवहारांत ( Economic activity ) शैथिल्य येईल. अर्थात् वाढत्या उत्पन्नावर वाढता कर असावा हें युक्तियुक्तच आहे. ( २ ) प्रत्येक घटकास कर किती द्यावयाचा हें निश्चित कळावें, व घटकाघटकांत कोणताहि भेदभाव न करतां ठराविक नियमानुसार सर्वांकडून ठरलेल्या प्रमाणांत कर वसूल करावा. ( ३ ) तो ज्याच्या त्याच्या सवडीप्रमाणें व पैसा हातीं आल्याबरोबर वसूल करावा. ( ४ ) वसुलीखर्च कमी असावा. ( ५ ) करपद्धति सर्वांस समजतील अशा साध्या व सुलभ असाव्यात.

पण एवढ्यानेंच हें विवेचन पुरें होत नाहीं. वरील सर्व कसोट्यांस उतरलेली करपद्धति योग्य आहे असें म्हणून भागत नाहीं. कोणती करपद्धति योग्य याचा विचार करतांना आणखी खालील बाबींचा विचार करावा लागतो.

**( ऐ ) एखाद्या करापासून भरपूर उत्पन्न मिळविण्याची शक्यता असणें**—पहिली बाब अशी कीं, जो कर आकारण्याचें ठरविण्यांत येईल त्या करापासून सरकारला इष्ट असें उत्पन्न मिळावें. एखाद्या करापासून भरपूर उत्पन्न मिळणें शक्य असणें ( Productivity ) हें एक चांगल्या करपद्धतीचें लक्षण समजण्यांत येतें, व तें साहाजिकच आहे. नुकताच मुंबई व मद्रास सरकारनें

वृत्तपत्रांच्या जाहिरातींवर कर आकारला होता. त्या करापासून मुंबई सरकारचें वार्षिक उत्पन्न अवघ १० लाख म्हणजे एकंदर उत्पन्नाच्या सहाशें अंशभाग; व जरूरीप्रमाणें त्यांत वाढ होणेंहि शक्य नाहीं. तशांतच अर्थशास्त्रज्ञांनीं अनुभवावरून ठरविलेल्या सर्व कसोट्यांकडे दुर्लक्ष करून त्यांत वाढच करावयाची ठरविलें तर, 'मुले कुठारः' ह्या न्यायानें अगदीं बाल्यावस्थेंतल्या व अत्यंत उपयुक्त अशा वृतपत्रव्यवसायावरच आघात ठरावयाचा. ह्या उलट विक्रीकर (Sales Tax) हा एक भरपूर उत्पन्न मिळविण्याची शक्यता, या कसोटीस उतरणारा असा कर आहे. जसजशी लोकसंख्या वाढेल, तसातसा एकंदर आर्थिक व्यवहारहि वाढेल, त्यामुळें वाढत्या लोकांच्या सोईसाठीं हवा असलेला पैसा सरकारला आणखी कांहींहि कर न बसवितां उभा करतां येईल. तसेंच औद्योगिक प्रगति ज्या प्रमाणांत होईल त्या प्रमाणांत अधिक उत्पादनामुळें लोकांची क्रयशक्तीहि वाढेल, व त्यामुळें अधिक विक्रीवर अधिक कर वसूल होऊन सार्वजनिक सुखसोई अधिक प्रमाणांत जनतेस उपलब्ध होऊं शकतील, व. अशा रीतीनें एकंदर समाजाचें जीवनमान अधिक सुखसोईपूर्ण होण्यास मदत होईल.

**( ओ ) गरजेप्रमाणें उत्पन्नांत वाढ करतां येणें**—करपद्धतीचे बाबतींत आणखी ज्या एका कसोटीचा उल्लेख करण्यांत येतो, ती म्हणजे त्या पद्धतीचा लवचिकपणा(Elasticity). सरकारच्या गरजेप्रमाणें हवें तेव्हां जादा उत्पन्न, कराच्या एकंदर स्वरूपांत फारसा फरक न करतां, उभें करतां आलें पाहिजे. अर्थात् असें करण्यानें जनतेच्या एकंदर उत्पन्नाच्या प्रमाणांत कांहीं मूलगामी फरक होतां कामा नये. ह्या कसोटीस, प्राप्तिकर, विक्रीकर हे पूर्णपणें उतरतात. दरामध्यें १।२ पैंचा फरक करून देखील, सरकार लक्षावधि रुपये जादा गोळा करूं शकतें.

**३. व्यवहारांत व आणीबाणीच्या प्रसंगीं या सर्व कसोट्यांस उतरतील अशाच करपद्धती असतात असें नाहीं**-- सरकार जो कररूपानें पैसा उभा करतें, तो सामान्यतः वर उल्लेखिलेल्या सर्व कसोट्यांस उतरणारी करपद्धति निवडून. पण प्रत्यक्ष व्यवहारांत बऱ्याच वेळां निराळा प्रकार दिसून येतो. जमीनधारा अशास्त्रीय असूनहि तो पूर्वीपासून अस्तित्वांत आहे म्हणून हल्लींहि वसूल केला जातो. करपद्धतींत ज्या त्या राष्ट्राच्या ऐतिहासिक परंपरेचें प्रतिबिंब दिसून येतें. तसेंच लढाई किंवा अशाच कांहीं

राष्ट्रीय आणीबाणीच्या प्रसंगीं, या सर्व कसोट्या धाब्यावर बसवून, सुचेल त्या मार्गानें सरकार पैसा वसूल करतें. अर्थात् सरकार हें लोकमतानुवर्ती असल्यानें अशा रीतीनें पैसा वसूल करण्यास जनतेची संमति असतेच, आणि म्हणूनच एरवीं वाम समजल्या जाणाऱ्या मार्गांनींहि पैसा गोळा करणें सरकारला शक्य होतें. युद्धकाळांत युद्धफंड लॉटरीरूपानें वसूल करण्यांत आले, ते या न्यायानेंच. किंवा हल्लीं निर्वासितांची पुनर्रचना करण्यासाठीं, पुनर्रचना फंड, सरकारनें ठराविक दरानें (Levy) आकारून वसूल करावा, असें जें म्हणण्यांत येतें, तेंहि याच तत्त्वानें.



## प्रकरण ५ वें

# कराचें स्वरूप

**१. कर व त्याचा मोबदला**—मागील प्रकरणांत केलेल्या सर्व विवेचनावरून हें दिसून येईल कीं, सरकार कर म्हणून जेव्हां पैसा वसूल करतें, तेव्हां एवढ्या कराकरितां कर देणाऱ्यांस अमुक एवढा मोबदला, असें समीकरण मांडून कांहीं तो वसूल करीत नाहीं. ह्या वसूल केलेल्या करांतूनच सार्वजनिक जरूरीच्या अशा लष्कर, पोलीस व सर्वसामान्य राज्यकारभार या बाबींवर सरकार पैसा खर्च करतें. यामुळें कर म्हणून मीं दिलेल्या १०० रु. मधून माझ्या एकंदर सुरक्षिततेकरितां एवढा पोलीस खर्च, एवढा लष्करी खर्च, एवढा इतर खर्च, असें कांहीं म्हणतां येत नाहीं. याचाच अर्थ, माझ्या कर देण्याशीं व माझ्याकरितां या करांतून केल्या जाणाऱ्या खर्चाशीं प्रत्यक्ष असा संबंध असूं शकत नाहीं.

कराशिवाय इतर मार्गांपासून मिळणाऱ्या उत्पन्नाचें असें नाहीं. तिसऱ्या प्रकरणांत आपण सरकारी उत्पन्नाच्या मार्गांचें विवेचन करतांना कराशिवाय इतर मार्गांनीं मिळणाऱ्या उत्पन्नांचाहि उल्लेख केलेला आहे. पण हे इतर मार्ग व कर यांत मूलतः असा फरक आहे कीं, कर हे द्यावेच लागतात. ते कर देणाऱ्याच्या मर्जीवर नाहींत. पण समजा, आपण सरकारी मालकीच्या रेल्वेंतून प्रवासास निघालों, तर त्यावेळीं ठराविक रक्कम भरून ठराविक ठिकाणचें तिकीट विकत घेतों; व नंतर आपला प्रवास सुरू करतों. यावेळीं भरलेल्या तिकिटाचा पूर्णतः मोबदला वाहनांचा उपभोग केल्यानें मिळतो. प्रवास करावयाचाच नसला तर तिकीट काढण्याचीहि गरज नाहीं. आपणांस जेवढ्या प्रमाणांत रेल्वेपासून फायदा मिळेल, तेवढ्याच प्रमाणांत पैसा तिकीटरूपानें द्यावा लागतो. जसा सरकारच्या ऐवजीं एखाद्या खाजगी संस्थेनें किंवा व्यक्तीनें केलेल्या आपल्या सेवेबद्दल आपण त्यास मोबदला देऊं, तसाच मोबदला सरकारनें केलेल्या आपल्या कामाबद्दल आपण सरकारास देतों.

**२. सरकारी धंद्याच्या मोबदला व कर**—याच मोबदल्याचे तत्त्वानुसार आपण सरकारी पोस्ट व तारखात्यास, ज्या प्रमाणांत आपण त्यांची सेवा घेऊं, त्या प्रमाणांत मोबदला देतों. अर्थात् या खात्यांवरील एकंदर खर्च, स्थावर व जंगम मिळकतीच्या झिजेबाबतचा घसारा व कर्जाऊ काढलेल्या रकमेवरील व्याज, या गोष्टींचा विचार करून जी वट रक्कम वसूल होणें इष्ट आहे, तेवढीच रक्कम वसूल व्हावी, ह्या हेतूनें जेव्हां रेल्वेचे किंवा पोस्टाचे दर ठरविण्यांत येतात, तेव्हां मोबदल्याचे तत्त्वानुसार, या सार्वजनिक मालकीच्या धंद्यांचे व्यवहार चालविण्यांत येतात, असें म्हणतां येईल. पण ज्या त्या खात्यावरील सर्व खर्चाशिवाय व वर निर्दिष्ट केलेल्या इतर बाबींवरील रकमांशिवाय, सर्वसामान्य राज्यकारभारावरील खर्चासदेखील जेव्हां या धंद्यांच्या उत्पन्नांतून पैसा घेतला जातो, तेव्हां हा जादा वसूल केलेला पैसाहि, कर या संज्ञेसच पात्र होईल, हें उघड आहे. कारण या सार्वजनिक मालकीच्या धंद्यांबाबत सरकारकडे पूर्णपणें मक्तेदारी असते. सरकारनें ठरविलेले दर देणें भागच असतें, त्याशिवाय ग्राहकांस गत्यंतरच नसतें. अशाच तऱ्हेच्या खाजगी धंद्यांपासून चढाओढीची या सरकारी धंद्यांस भीति नसल्यानें, जेव्हां जादा पैशाची गरज भासते व जादा पैसा जमा करण्याकरितां इतर मार्गांपेक्षां या धंद्यांचे दर वाढविणें सोईस्कर वाटतें, तेव्हां असें करण्याचा साहजिकच मोह अर्थमंत्र्यास होतो. शुद्ध तात्त्विक दृष्टीनें विचार केल्यास असें करणें योग्य वाटत नाहीं. खाजगी धंदेवाल्यांनीं जर जादा नफा घेतला तर आपण ओरड करतों. मग ज्याच्यापासून आदर्श वागणुकीची अपेक्षा करावयाची त्या सरकारनेंच असा बेजबाबदारपणा दाखविला तर मग दाद मागावयाची कोणाजवळ, असें साहजिकच कोणासहि वाटेल. पण अलीकडे या विचारसरणींतदेखील क्रांतिकारक बदल होऊं लागला आहे.

लोकशाहीच्या वाढीबरोबर सरकारी व्यापहि वाढूं लागला आहे. सरकारनें शांतता, सुव्यवस्था ठेवणें ह्यांशिवाय, सार्वजनिक आरोग्य, शिक्षण, रस्ते, सार्वजनिक उद्यानें, म्हाताऱ्यांस व बेकारांस पेन्शन किंवा नजराणा, गरिबांस मोफत औषध, ह्याहि बाबी सरकारी कामकाजाच्या मर्यादेंत येऊं लागल्या आहेत. तेव्हां ह्या व्यापास लागणारा पैसा, कररूपानें उभारणें अशक्य झाल्यास सार्वजनिक मालकीच्या धंद्यांच्या उत्पन्नांतूनहि तो मिळविण्यास हरकत नसावी, अशी

विचारसरणी मूळ धरूं लागली आहे. जेव्हां असे धंदे खाजगी मालकीचे होते, तेव्हां तरी काय स्थिति होती ? उद्योगपति आपणांस कसा जास्त नफा होईल ह्या दृष्टीनें हे धंदे चालवीत. तर मग जेव्हां सरकार हा धंदा चालवितें व जेव्हां दर वाढवून मिळालेल्या जादा पैशांतून, जनतेच्या राहणीचें मान सुधारण्याचा सरकारचा हेतु असतो, तेव्हां अशा रीतीनें जादा पैसा जमवून तो सरकारी तिजोरींत जमा करणें हें सयुक्तिकच नव्हे का ? अर्थात् 'होय,' असेंच ह्या प्रश्नाचें उत्तर द्यावें लागेल.

बरें, सध्यां जनतेकडून इतक्या निरनिराळ्या तऱ्हेनें कर वसूल केले जातात कीं, नवीन करहि शोधून काढणें जड जाऊं लागलें आहे. कर मुळांतच अप्रिय व तशांतच ते सध्यां बरेच वाढलेले आहेत. त्यामुळें लोकशाही सरकारास कर आणखी वाढविणें जड जाऊं लागलें आहे. अशा स्थितींत, सरकारी धंद्यांपासून जादा उत्पन्न मिळावें अशाकडे अर्थमंत्र्याची प्रवृत्ति होऊं लागली असल्यास नवल नाहीं. १९५१ सालीं हिंदुस्थानसरकारनें रेल्वेच्या व पोस्टाच्या दरांत जी वाढ केली, त्यांत वरील प्रवृत्तीच दृग्गोचर होते.



# प्रकरण ६ वें

# योग्य करपद्धति

**१. एककरपद्धति**--हें पुस्तक तज्ज्ञांकरितां नसून प्रायः सामान्य सुजाण माणसास सरकारी अर्थव्यवहार व अर्थनीति यांचें सुलभरीत्या ज्ञान व्हावें, या हेतूनें लिहिलें असल्यानें, आतांपर्यंतचें हें सारें विवेचन वाचून त्याच्या मनांत साहजिकच असा प्रश्न उभा राहील कीं, हा काय करप्रपंचाचा महाभयंकर डोलारा! प्राप्तिकर, विक्रीकर, जमीनधारा, आयातकर, निर्यातकर, करमणूककर, चहाकर, साखरकर, कापूसकर, कापडकर, दारूकर, वीजकर, कोर्टफी, रजिस्ट्रेशन-फी, स्टँप-ड्यूटी, मेल्यावर कर ( वारसाकर ), जिवंतपणीं कर, ब्रह्मचाऱ्यावर कर, हा आणि तो, असे अनंत कर. ह्या निरानिराळ्या करांच्या प्रचंड चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याचा कांहीं मार्ग आहे कीं नाहीं?

अहो! जर सार्वजनिक हिताकरितां पैसाच हवा व तोहि जनतेकडूनच वसूल करावयाचा तर, हे निरनिराळ्या प्रकारचे कर हवेत कशास? तज्ज्ञांस योग्य वाटेल असा एकच कर वसूल करा म्हणजे झालें. वसूल करावयाचा खर्चेहि कमी, गुंतागुंतहि कमी व प्रत्येकास समजेल कीं, मला इतका पैसा माझ्या शासनसंस्थेस माझ्या स्वास्थ्याकरितां व सुखोपभोगवृद्धीकरितां द्यावा लागतो. पण पुनरुक्तीचा दोष पत्करूनहि मला पुन्हां येथें नमूद केलें पाहिजे कीं, मानवी व्यवहार इतका साधा नसतो. तो अत्यंत गुंतागुंतीचा असतो. ती गुंतागुंत कशी निर्माण होते, तें पाहूं.

**जिंदगीकर**—एकच कर घ्यावयाचा तर तो कशावर घ्यावयाचा? कांहींच्या मतें स्थावर जिंदगीवर तो घ्यावा. कारण अशी जिंदगी हेंच खरें संपत्तिमापनाचें साधन आहे. पण असा कर जमिनीच्या उत्पन्नावर घ्यावयाचा तर तो अशास्त्रीय ठरतो हें आपण चवथ्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. बरें, तो स्थावराच्या किंमतीवर

घ्यावयाचा तर अशा किंमती ठरविणें हें तज्ज्ञ इंजिनियरांचें काम. त्यामुळें कर-वसुली अधिकाऱ्यांस इंजिनियरांची मदत घ्यावी लागेल. इतकें करूनहि अशा किंमती ठरविण्यांत अनेक व्यावहारिक अडचणी येतील. रस्त्यावरील मिळकतीची किंमत वेगळी, थोडी पाठीमागची असेल तिची वेगळी, बाजारपेठेंतील वेगळी, राहात्या वस्तींतील वेगळी, असें एक ना अनेक प्रकार. “ रात्र थोडी व सोंगेंच फार ” अशांतली गत व्हावयाची. जमिनीच्या उत्पन्नाबाबत कांहींतरी निश्चितता असते. स्थावराची किंमत ठरविण्यांत लबाडीच होण्याचा संभव फार. एवढें करूनहि हवें तेवढें उत्पन्न या करापासून मिळण्याची शाश्वती नाहीं. असल्या करवसुलींत तर फारच अडचणी निर्माण होण्याची शक्यता असते. स्थावरांच्या मालकांजवळ नेहमीं रोकड पैसा असतोच असें नाहीं. तेव्हां असले कर वसूल करावयाचे म्हणजे घरांचा लिलाव करण्याचाच धंदा पत्करल्यासारखें होणार आहे. त्यांतून असलाच कर योग्य असें ठरविलें तर, ज्यांना दिडकीचीहि स्थावर जिंदगी नाहीं, पण ज्यांचें वार्षिक उत्पन्न हजारों, लाखों रुपयांचें आहे, असे वकील, डॉक्टर, सरकारी नौकर, सरकारी कर्जरोखे धारण करणारे, असे असंख्य ऐपतदार लोक वगळले जातील. तेव्हां हा पर्याय योग्य आहे, असें कोणीहि म्हणूं शकणार नाहीं.

**प्राप्तिकर**—हा कर जर योग्य नाहीं, तर मग कोणी असें सुचवील कीं, ज्याचे त्याचे उत्पन्नावर प्राप्तिकर घ्यावा. असा कर सर्वांवरच लादला तर तें एक अत्यंत जिकीरीचें काम होईल व मग वसुलीचा खर्चहि फार वाढेल हें आपण चौथ्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. वाढत्या उत्पन्नावर वाढत्या दरानें तो आकारावयाचा असें म्हटलें तर सध्यां असा कर असूनहि तो सरकारच्या साऱ्या गरजा भागवूं शकत नाहीं. तशांतच ठराविक रकमेच्या पुढील सर्वच्या सर्व उत्पन्न कर म्हणून घ्यावयाचें म्हटलें तर कोणी त्या मर्यादेच्या पुढें उत्पन्न व्हावें म्हणून धडपडच करणार नाहीं. तसें झालें तर सर्वच आर्थिक व्यवहार शिथिल होईल, व मानवी प्रयत्नाला तीव्रता बिलकूल राहाणार नाहीं व मग यासारखी राष्ट्रीय आपत्ति दुसरी कोणती असूं शकेल? दिवसेंदिवस राहाणीचें मान प्रयत्नाच्या शिथिलतेनें कमी होत जाईल, व सर्व मानवी व्यवहाराचें जें ध्येय कीं पृथ्वीवर नंदनवन बनवावयाचें, त्या ऐवजीं नरक मात्र निर्माण व्हावयाचा.

**विक्रीकर**—प्राप्तिकराऐवजीं विक्रीकरच नुसता ठेवावयाचा असें ठरविलें तर तो सध्यांच्या दरापेक्षां फारच जास्ती दरानें आकारावा लागेल. असा जादा दर ठेवून कदाचित् हवी तेवढी रक्कम वसूल होईल. मुंबई राज्यांत एकेरी (Single-Point) पद्धतीनें शें. ३ टक्के सामान्य कर व विशेष कर शें. ६ टक्के आकारून १९५१-५२ सालीं तो १२ कोट रुपये वसूल झाला. यांत जानेवारी ते मार्च १९५१ मधील परराज्यांतील विक्रीवरील करहि समाविष्ट आहे. हिंदच्या घटनेच्या २८६ कलमान्वयें एप्रिल १९५१ पासून असा कर आकारतां येत नाहीं. वरील तिमाहीचा हा १$\frac{१}{४}$ कोट रुपयांचा कर वजा केला तर १९५१-५२ चें मुंबईराज्याचें विक्रीकराचें उत्पन्न १०$\frac{३}{४}$ कोट रुपयांचें ठरतें. मुंबईराज्याचें १९५२-५३ चें अंदाजपत्रक रु. ६७ कोटींचें आहे. हें सर्व उत्पन्न एकेरी विक्रीकरपद्धतीनें वसूल करावयाचें म्हणजे शें. ३ चे ऐवजीं शें. १८ व शें. ६ चे ऐवजीं शें. ३६ असा दर करावा लागेल. मध्यसरकारचेंहि उत्पन्न याच करापासून मिळवावयाचें म्हणजे हा दर आणखी शें. १८ नें व शें. ३६ नें वाढवावा लागेल. मध्यसरकारचें उत्पन्न साधारणतः सर्व राज्यसरकारांच्या उत्पन्नांच्या बेरजेइतकें आहे. याचा अर्थ सामान्य विक्रीकर शें. ३६ या दरानें, व विशेष कर शें. ७२ या दरानें आकारावा लागेल.

या एकेरी पद्धतीऐवजीं, बहुस्पर्शी (Multi Point) पद्धति अंमलांत आणावयाची म्हटलें तरी हे दर अनुक्रमें शें. १२ व शें. २४ असे ठेवावे लागतील.

अर्थात् हे दर इतके भयंकर आहेत कीं, या दरानें छोटेखानी व्यापारी तर रसातळास जातीलच, पण याशिवाय या दरानें लोकांमधील अप्रामाणिक प्रवृत्तीस अति उत्तेजन मिळेल. शें-दोनशें विक्री दाबून ठेविली तरी रु. २५ सहज मिळतात. व्यापाऱ्यांचीच अशी विक्री दाबून टाकण्याची प्रवृत्ति होईल असें नाहीं, तर गिऱ्हाईकहि व्यापाऱ्यास सहर्ष साहाय्य देऊन या लबाडींत सहभागी होईल. अधिकारी वर्ग कितीहि कार्यक्षम व प्रामाणिक असला तरी मोठ्या प्रमाणांत जेव्हां सामाजिक नीति बिघडते तेव्हां तोहि कांहीं करूं शकत नाहीं.

बरें, असें कांहींहि न होतां ही पद्धति सुसूत्र चालली असें क्षणभर मानलें, तरी श्रीमंत वर्ग या एकाच करानें जास्त श्रीमंत होतो व गरीब वर्ग जास्त गरीब होतो. कसें तें पहा. श्री. 'अ' यांची वार्षिक प्राप्ति रु. १ लाख आहे.

त्यांचेवर ४ माणसें अवलंबून आहेत. त्यांचा वार्षिक खर्च जास्तींत जास्त रु. २००००।– आहे; पण विक्रीकरास पात्र व्यवहार रु. १००००।– आहे. याचा अर्थ श्री. ‘ अ ’ यांस आपल्या एकंदर उत्पन्नाच्या $\frac{१}{१०}$ भागावर कर द्यावा लागतो. आतां श्री. ‘ ब ’ हा त्यांचा कारकून, यांचें वार्षिक उत्पन्न रु. १२००।– आहे. यांना हा पगारच पुरत नाहीं. तेव्हां ह्यांना सारेंच्या सारें उत्पन्न खर्चून टाकावें लागणार. यांचें वार्षिक घरभाडें रु. २००।– धरलें व दूध, सरपण, अन्न-धान्य या वस्तू कीं ज्यांच्या विक्रीवर कर नाहीं, या रु. ४०० च्या धरल्या तर त्यांस आपल्या रु. ६०० वर विक्रीकर द्यावा लागणार. याचा अर्थ त्यांना आपल्या उत्पन्नाच्या $\frac{१}{२}$ भागावर कर द्यावा लागणार. श्री. ‘ अ ’ यांचें उत्पन्न श्री. ‘ ब ’ यांच्यापेक्षां जवळ जवळ ८ पट असून देखील श्री. ‘ ब ’ यांना श्री. ‘अ’ यांच्यापेक्षां ५ पटीनें जादा प्रमाणांत कर द्यावा लागतो. हा अन्याय नव्हे तर काय ? असें करण्यांत आपण चौथ्या प्रकरणांत शास्त्रीयदृष्ट्या प्रमाणित मानलेल्या ‘ वाढत्या उत्पन्नावर वाढत्या प्रमाणांत कर ’ ह्या तत्त्वाचें उल्लंघन केलें असें होईल. अशी पद्धति ही प्रतिगामी आहे, हें सकृद्दर्शनींच उघड आहे. तेव्हां वस्तूंच्या विक्रीवरच कर घ्यावा हाहि पर्याय अयोग्य ठरतो.

**२. एककरपद्धति भांडवलवादी समाजांत अशक्य**—यावरून असें दिसून येईल कीं, एककरपद्धति अंमलांत आणणें हें जवळ जवळ अशक्यच आहे. त्यांतून भांडवलवादी समाजरचनेंत तर तें शशशृंगच ठरेल. कोणताहि एक कर ठेवला कीं, तो वर विवेचन केल्याप्रमाणें शेंकडा फार मोठ्या प्रमाणावर ठेवला पाहिजे. कराचा दर मोठा असणें हें लोकांच्या अप्रामाणिकपणास उत्तेजन देण्या-सारखें आहे, हें आपण वर पाहिलेंच आहे. तशांतच ज्या वस्तूंवर तो अधिक ठेवला जाईल, त्यांवर मिळणाऱ्या नफ्याचें प्रमाण घटण्याचा व खप कमी होण्याचा संभव असल्यानें उत्पादनांत जरूरीपेक्षां जास्त घट करून, किंवा मालाची कोंडी करून व अशा कृत्रिम रीतीनें मालाचे भाव वाढवून व्यापारी व कारखानदार सामान्य जनतेच्या हालांत भर घालूं शकेल, इतकेंच नव्हे तर, जरूर त्या मालाचें उत्पादन न करतां भलत्याच मालाचें उत्पादन करणें, माल परदेशीं पाठविणें, कमी प्रतीचा माल काढणें, ह्या व तत्सम इतर गोष्टींचा अवलंब करून भांडवलवाला जनतेस त्राहि भगवान् करूं शकेल.

**३. एककरपद्धति समाजवादी राजवटींत शक्य**—समाजवादी समाजरचनेंत मात्र एककरपद्धति अंमलांत आणणें शक्य आहे. या समाजरचनेंत उत्पादनसाधनें राष्ट्रीय मालकीचीं असल्यानें व उत्पादनांत जनहितैकदृष्टि असल्यानें वरील प्रकारें सामान्य जनतेची अडवणूक कोणी करील अशी भीति नसते. अशा राजवटीस राष्ट्रीय मालकीच्या उद्योगधंद्यांपासून उत्पन्न मिळूं शकतें. या राजवटींत प्रत्येकाची प्राप्तीहि मर्यादित असते. त्यामुळें विक्रीकरासारखा कर आकारूनहि हवें तेवढें उत्पन्न उभें करणें सरकारला शक्य होतें. सर्व लोकांतील आर्थिक विषमता नष्ट करून सर्वात जास्तींत जास्त समता आणण्याच्या दृष्टीनें समाजरचना केली असल्यानें पुन्हां करपद्धतीनें आर्थिक विषमता नष्ट करण्याचा प्रयत्न करण्याची जरूरीच भासत नाहीं.

साधारणतः अशा तऱ्हेचें सरकार रशियांत आहे. पण तेथेंहि असा कर आकारणें सरकारला शक्य झालेलें नाहीं. विक्रीकराशिवाय निर्यातकर व थोड्या प्रमाणांत प्राप्तिकर, हे इतर कर रशियांत आकारले जातात. जोंपर्यंत सर्व जगांत एकच सरकार नाहीं, तोंपर्यंत स्वदेशी मालास उत्तेजन देणें हें एकंदर राष्ट्राच्य आर्थिक व्यवहाराच्या दृष्टीनें व बेकारीस आळा घालण्याचे दृष्टीनें जरूरच असतें. याकरितां व मागणी व पुरवठा या न्यायानुसार शक्य झाल्यास सरकारला अधिक उत्पन्न मिळावें याकरितां, आयात, निर्यात करहि आकारावे लागतात. तसेंच रशियांत देखील ज्याच्या त्याच्या काम करण्याच्या कुवतीप्रमाणें व एखादें काम करण्यास लागणाऱ्या कौशल्याच्या श्रेणीप्रमाणें पगार आहे. त्यामुळें ठराविक मर्यादेच्या पुढें गेलेल्या उत्पन्नावर प्राप्तिकर आकारला जातो.

तात्पर्य, जेव्हां जागतिक समाजवादी सरकार स्थापन होईल व पगारहि ज्याच्या त्याच्या काम करण्याच्या कुवतीऐवजीं ज्याच्या त्याच्या गरजेप्रमाणें दिला जाईल, किंवा हेंच थोड्या निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे जेव्हां कुवतीप्रमाणें काम व गरजेप्रमाणें दाम हें तत्त्व अंमलांत आणणारें जागतिक सरकार प्रस्थापित होईल, तेव्हांच एककरपद्धति अंमलांत येईल, एरवीं नाहीं.

· **४. अनेककरपद्धति संमिश्र अर्थव्यवस्थेंत योग्य**--संमिश्र अर्थव्यवस्थेंत मात्र एककरपद्धतीऐवजीं अनेककरपद्धतीच योग्य असते. निरनिराळे कर असल्यानें निरनिराळ्या अधिकाऱ्यांमार्फत ते वसूल केले जातात.

त्यामुळें एकाच्या नजरेंतून एखादा करचुकवाचुकवीचा प्रकार सुटल्यास तो दुसऱ्याच्या नजरेस येण्याची शक्यता असल्यानें, कर भरणारा नागरिक कर भरण्याबाबत जास्त जागरूक राहातो. त्याच्या डोक्यांत असा सारखा विचार घोळत राहातो कीं, विक्रीकर–अधिकाऱ्याच्या नजरेंतून एखादा मुद्दा सुटला तर तो प्राप्तिकर–अधिकाऱ्याच्या नजरेस येईल. ह्या दोघांच्याहि नजरेंतून तो सुटला तर जकात-अधिकाऱ्याच्या तो नजरेस येईल. अशा रीतीनें आपणांवर लबाडीचा आरोप येईल व मग त्या कचाट्यांतून सुटण्याकरितां ‘ दे माय धरणी ठाय ’ अशी पाळी येईल. ह्या सर्व कटकटी टाळण्याकरितां प्रथमपासूनच तो सर्व बाबी ज्या त्या अधिकाऱ्यापुढें मांडील.

अनेककरपद्धतीचा दुसरा एक असा फायदा असतो कीं, एखाद्या करापासून कांहीं विशिष्ट गटास जाच किंवा फायदा होत असेल तर तो दुसऱ्या करापासून दूर केला जाईल; व अशा रीतीनें नागरिकानागरिकांत पक्षपात न होतां समतोलपणा राहून सर्वांना सारखीच वागणूक शासनसंस्थेकडून दिली जाईल. विक्रीकर कायद्यानें वस्तूंच्या वापरावरच कर असल्यानें श्रीमंतांच्या सर्व उत्पन्नावर कर घेतला जाणार नाहीं. जेवढें उत्पन्न खर्च होईल तेवढ्यावरच कर आकारला जाईल. ही उणीव प्राप्तिकरकायद्यानें भरून निघते. आणखी प्रत्येकाच्या स्वभाव व रुचिभिन्नतेमुळें एखाद्या कराचा बोजा एखाद्यावर बिलकूल पडणार नाहीं. असें धरून चाला कीं, ‘ अ ’ स अति साधी राहाणी आवडते. त्याच्या गरजा अति कमी आहेत. तेव्हां एकटा विक्रीकर असला तर त्याच्या खर्चाचें प्रमाण अगदीं कमी असल्यानें त्यास पुष्कळ उत्पन्न असूनहि फारच कमी कर द्यावा लागेल. एकटा प्राप्तिकरच असेल तर जो जास्त खर्चिक स्वभावाचा आहे, त्यास थोडासा आळा घालण्याकरितां किंवा वायफट खर्चच करावयाचा तर मग त्या खर्चापैकीं कांहीं भाग सरकारला दिला तर काय बिघडलें, या न्यायानें विक्रीकर बसविणें योग्य ठरतें. परदेशी वस्तूंचा वापर त्यांच्या दिखाऊपणामुळें व स्वस्तपणामुळें वाढला व त्याचा परिणाम स्वदेशी धंदे बंद होण्यांत दिसूं लागला तर आयात-करासारखे कर लादून स्वदेशी धंद्यास उत्तेजन देतां येतें. तेव्हां हा कर वाईट, तो चांगला, असें विशिष्ट कराबाबत मत व्यक्त करण्यापेक्षां, एकंदर करव्यवस्था कशी काय आहे, ती चौथ्या प्रकरणांत चर्चिलेल्या सर्व कसोट्यांस उतरते कीं नाहीं, हें पाहाणेंच सयुक्तिक ठरतें.

वरील विवेचनाचा अर्थ निरनिराळ्या प्रकारचे पुष्कळ कर असावेत, असें म्हणण्याचा आमचा उद्देश आहे, असा जर कोणीं केला तर तो मात्र चुकीचा होईल. एककरपद्धतीपेक्षां अनेककरपद्धति असावी याचा अर्थ एवढाच कीं, कोणत्याहि एका करानें भरपूर उत्पन्न मिळणार नाहीं व असें करणें शास्त्रीयहि ठरत नाहीं; तेव्हां भरपूर उत्पन्न देणारे व करपद्धतींच्या कसोटयांस उतरणारे दोन किंवा अधिक कर असावेत.

**५. जाणवणारी व न जाणवणारी करपद्धति**—कांहीं कांहीं विचारवंतांचें असें म्हणणें आहे कीं, लोकांना न जाणवतील अशा तऱ्हेचे थोडें थोडें उत्पन्न देणारे कां असेनात पण पुष्कळ प्रकारचे कर असावेत. आपल्याला कल्पना येत नाहीं, पण परिणामीं मात्र मोठा खर्च होऊन जातो, असा पुष्कळ खर्च आपण करीत असतों. पण प्रत्यक्ष अगदीं योग्य कारणांकरितां एखादा रुपया देण्याची पाळी आली तरी आपण कांकूं करतों. हा मनुष्यस्वभावच आहे. या दृष्टीनें न जाणवणारे पुष्कळ कर असावेत, असें म्हणणाऱ्या पक्षाचें म्हणणें बरोबर वाटतें. पण असें करण्यांत वसुलीखर्च किती वाढेल व कर-कारभारांतील गुंतागुंत किती तापदायक होईल, ह्याची नुसती कल्पनाच केलेली बरी. आतां जितके कर आहेत, त्यांसच मनुष्य कंटाळून गेलेला आहे. त्यांत आणखी भर घालावयाची म्हणजे लोकांत असंतोष माजून अराजकच होण्याचा संभव फार.

या उलट लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांकडून असा एक युक्तिवाद नेहमीं पुढें मांडण्यांत येतो कीं, समाजांतील प्रत्येक घटकास आपण कांहींतरी कर सरकारास देत आहों, अशी जाणीव व्हावी, म्हणून करपद्धति अशी असावी कीं, जिचा संपर्क सर्वांस पोहोंचेल. लोकशाहींत सर्वजण मतदार असतात. त्या सर्वांना जेव्हां आपण कांहीं कर भरतों आहोंत अशी कल्पना येईल, तेव्हांच आपण भरलेले कर खरोखरच आपल्या हिताकरितां खर्च केले जातात कीं नाहीं, हें पहाण्याची जिज्ञासा उत्पन्न होईल. अशी जिज्ञासा हेंच लोकशाही यशस्वी होण्याचें लक्षण आहे. आपलें सरकार योग्य रीतीनें राज्यशकट हांकतें कीं नाहीं, हें पहाण्याची जेव्हां नागरिकांत तीव्रता उत्पन्न होते, तेव्हांच राज्यकारभारांतलि त्यांना न पटणाऱ्या गोष्टींबाबत ते टीका करूं लागतात. अशा टीकेचा परिणाम लोकमतानुवर्ती सरकारावर होतोच होतो. जें सरकार लोकमताची कदर करीत नाहीं, तें लोकशाहीमध्यें अधिकारावर राहाणेंच

शक्य नाहीं. याकरितां जनतेंत राज्यकारभाराविषयीं सतत जागरूकता राहाण्याकरितां प्रत्येकाला जाणवणारे कर असावेत असें या गटाचें म्हणणें आहे.

पण थोडा विचार केला असतां, यांत फारसा तथ्यांश आहे, असें वाटणार नाहीं. कर भरण्याच्या जाणीवेमुळें कोणी राज्यकारभाराकडे लक्ष देतो असें नसून, सरकारी कायदेकानू जाचक असतील, किंवा प्रत्यक्ष व्यवहारांत त्यांचा त्रास जाणवेल, तरच प्रायः लोक त्या विशिष्ट नियमाबद्दल ओरडून उठतील. एक दैनंदिन कर्तव्य म्हणूनच लोक कर भरीत असतात. एकदां तो भरल्यानंतर, तो कसा खर्च होतो, त्याचा आपणांस फारसा उपयोग होतो कीं नाहीं, याकडे पाहाण्याची लोकांची वृत्ति मूलतःच नसते. प्रत्येकास स्वतःचा दैनंदिन व्यवहार इतका पुरून उरणारा असतो कीं, या बाहेरच्या गोष्टींकडे लक्ष देण्यास त्यांना उसंतच नसते. "घरचें झालें थोडें आणि व्याह्यानें धाडलें घोडें," अशा वृत्तीनेंच ज्यांचा स्वतःशीं प्रत्यक्ष संबंध नाहीं, अशा गोष्टींकडे बघण्याची सामान्य माणसाची प्रवृत्ति असते. बरें, इच्छा असली तरी या बाबतच्या माहितीचा अभाव, यामुळेंहि ते कराबाबत फारशी चौकशी करीत नाहींत. इतिहासहि हेंच सांगतो. इंग्लंडच्या इतिहासाचा अभ्यास करणारांना, कायदेमंडळांत प्रतिनिधित्व नाहीं तर कर नाहीं, ( No taxation without representation ) हें घोषवाक्य आठवत असेल. पण याचा अर्थ एवढाच होता कीं, लोकमतानुवर्ती राज्यकारभार असावा, अनियंत्रितपणें राजास राज्य करावयाचें असेल तर आम्ही कर देणार नाहीं. पण कर भरण्याच्या जाणिवेमुळें त्यावेळीं लोकांनीं असें केलें असें कोणी म्हणूं शकणार नाहीं. कारण तत्पूर्वी हजारों वर्षांपासून लोक कर देत आले होते. पण या काळींच हा प्रश्न उद्भवला. पूर्वी कोणीं याकडे लक्षहि दिलें नाहीं. तात्पर्य, ज्या त्या काळची समाजांतील राजकीय जागृति, सार्वजनिक गोष्टींविषयींचें लोकांचें औत्सुक्य, एकंदर समाजाची शैक्षणिक प्रगति व आवड या व इतर तत्सम गोष्टींवर सरकारी कारभाराविषयींची जनतेची जिज्ञासा अवलंबून असते. कर भरण्याच्या जाणिवेवर ती नसते. यास आणखी पुरावा म्हणून पहिल्या महायुद्धाचें उदाहरण देतां येईल. पहिलें युद्ध ( १९१४–१८ ) झाल्यावर, त्या वेळच्या मुत्सद्दयांची अशी कल्पना होती कीं, जर्मनीकडून जबर युद्धभरपाई घेतली तर पुन्हां म्हणून जर्मन जनता युद्धाकडे वळणार नाहीं. पण झाला प्रकार

त्याच्या अगदीं उलट. जेमतेम वीस वर्षांच्या अवधींत पुन्हां जर्मनी दंड थोपटून युद्धास उभा राहिला. याचा अर्थ असाच होतो कीं, कर लोकांस जाणवतील असे असावेत, या म्हणण्यांत कांहीं राम नाहीं. मनुष्याचा स्वभाव हा ठरलेला आहे, त्यांत फारसा फरक होत नाहीं. त्याच्या स्वभावांतला मुख्य गुण असा आहे कीं, वाईट विसरावयाचें व चांगलें होईल, अशा कल्पनेनें पुन्हां जरूर तर ज्या गोष्टीनें आपलें वाईट झालें, तीच गोष्ट नेमकी करावयाची. तो इतिहासापासून फारसें कांहीं शिकूं शकत नाहीं.

त्यांतून एखादा कर जोंपर्यंत नवीन आहे, तोंपर्यंतच त्याची कोणालाहि जाणीव होईल. तो एकदां जुना झाला कीं, अंगवळणीं पडतो व त्यांतील नावीन्याच्या अभावामुळें त्याविषयींचें औत्सुक्य कमी होतें, म्हणूनच नेहमीं जुना कर तो चांगला ( An old tax is a good tax ) असें म्हणण्यांत येतें.

**६. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर**—कर जाणवणारे असावेत किंवा ते तसे नसावेत, याचाच एक पर्याय म्हणून प्रत्येकावर कराचा बोजा प्रत्यक्ष असावा किंवा तो अप्रत्यक्ष असावा हा एक वाद करपद्धतीचें विवेचन करतांना नेहमीं उपस्थित करण्यांत येतो.

प्रत्यक्ष कर याचा अर्थ जो कर नागरिकांकडून प्रत्यक्ष वसूल केला जातो तो; उदा० प्राप्तिकर, वारसाकर यांसारखे कर, कीं जे ज्या त्या अधिकाऱ्यांकरवीं प्रत्यक्ष कर भरण्यास पात्र असलेल्या नागरिकांकडूनच वसूल केले जातात.

आयात–निर्यातकर, उत्पादित वस्तूंवरील कर ( Excise ) अशांसारखे कर, ज्या त्या वस्तूंचा व्यापार करणाऱ्यांमार्फत वसूल केले जातात. तो व्यापारी पर्यायानें आपल्या खरेदी किंमतींत अशा करांची गणना करून, अप्रत्यक्षरीत्या वस्तूंचा वापर करणारा जो नागरिक त्याच्याकडून वसूल करितो, म्हणून त्यास अप्रत्यक्ष कर असें म्हणण्यांत येतें. विक्रीकरासारखे कर धड प्रत्यक्षहि नव्हत किंवा अप्रत्यक्षहि नव्हत. कारण विक्रीकिंमतीवर व्यापारी जर कर वेगळा आकारूं लागेल तर तो प्रत्यक्ष ठरेल. पण विक्रीकरासहित जर वस्तूंची किंमत तों आकारूं लागेल तर तो अप्रत्यक्ष ठरेल. तसेंच पाहिलें तर प्राप्तिकर तरी काय, अगदीं बारकाईनें पाहूं गेलें असतां उपभोक्त्या नागरिकांकडूनच वसूल केला जातो. कसें तें पहा, तुम्ही बाजारांत गेलां व एक १५ रु.ची ‘ परमसुख ’ धोतर-

जोडी आणली. ह्या धोतरजोडीस लागणारा कच्चा माल, ती तयार करण्यास लागणाऱ्या यंत्रसामुग्रीवरील व मजुरीवरील खर्च हा तर गिरणीमालक घाऊक व्यापाऱ्यापासून वसूल करतोच, पण त्याशिवाय त्याच्या भांडवलावरचें व्याज व त्याच्या परिश्रमाचा मोबदला म्हणून तो कांहीं नफा आकारतो. हा जो खर्चाव्यतिरिक्त जादा पैसा वसूल केला जातो, तोच त्याचें उत्पन्न म्हणून त्याच्याकडे जमा होतो; व ठराविक रकमेच्या पुढें असें उत्पन्न आल्यास त्यावरच प्राप्तिकर आकारला जातो. म्हणजे हा प्राप्तिकर तो अप्रत्यक्षपणें नागरिकांकडूनच वसूल करतो, असें होत नाहीं का? तो वस्तूंचें उत्पादन करतो व त्याच्या मोबदला वस्तूंचें मूल्य मोजण्याचें साधन म्हणजे पैसा, तो गिऱ्हाइकां-कडून वसूल करतो, आणि त्यांतील कांहीं भाग प्राप्तिकर म्हणून तो सरकारी खजिन्यांत भरतो.

असा विचार केला असतां, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर ह्या शब्दप्रयोगाला कांहीं अर्थच राहात नाहीं. एकंदर राष्ट्रीय उत्पन्नाचा कांहीं भाग सरकार आपणाकडे, सर्व समाजाच्या सुखसोयी पाहाण्याकरितां व राष्ट्रांत शांतता व सुव्यवस्था राखण्याकरितां घेतें. कर लादण्याच्या वेळीं चौथ्या प्रकरणांत चर्चिलेल्या तत्त्वांस अनुसरून तो कर आहे कीं नाहीं एवढेंच पाहावयाचें असतें. तो प्रत्यक्ष आहे कीं अप्रत्यक्ष आहे याचा विचार करण्याचें फारसें कारण नसतें. कर जाणवणारे असावेत कीं ते तसे नसावेत या बाबींस कांहीं महत्त्व नसल्याचें आपण पाहिलेंच आहे. सामान्यतः प्रत्यक्ष करास जाणवणारे व अप्रत्यक्ष करास न जाणवणारे असें म्हणण्याचा प्रघात आहे. मग जाणवणारे व न जाणवणारे कर या मुद्द्यास जर महत्त्व नाहीं तर प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर याहि मुद्द्यास कांहीं महत्त्व राहात नाहीं, हें ओघानेंच प्राप्त होतें.

असें जरी असलें तरी या मुद्द्यास थोडेंसें महत्त्व प्राप्त होण्याचें कारण म्हणजे ग्लॅडस्टनसारख्या इंग्लंडच्या मातबर अर्थमंत्र्यानेंदेखील, या दोन्ही करांपासून सारखाच पैसा वसूल करणें हें अर्थमंत्र्याचें कर्तव्य होय, असें म्हटलें आहे. अर्थात् अर्थमंत्रि झाला तरी तो अर्थशास्त्रज्ञ असतोच असें नाहीं. मंत्रि म्हटला कीं, तज्ज्ञपणापेक्षां तत्कालीन जनमताचें योग्य प्रतिनिधित्व करणारा तो जननेता असतो. जनमत हें ऐतिहासिक, सामाजिक, आर्थिक व कांहीं विशिष्ट घडामोडीं-

मुळें बनलेल्या विशिष्ट मनोवृत्तींचें परिपाकरूप असतें. त्यांत शास्त्रीयदृष्ट्या नेहमींच योग्य मत प्रतिबिंबित केलेलें असतें, असें थोडेंच आहे !

तथापि कराचा बोजा कसा कोणावर पडतो, या बाजूचा विचार करावयाचा असतां, विवेचनांत सुलभता येण्याचे दृष्टीनें करांची प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अशी दोन गटांत विभागणी करण्याचा प्रघात आहे. हें विवेचन पुढें प्रकरण ८ मध्यें केलेलें आहे.



# प्रकरण ७ वें

# करांचा बोजा—सामान्य विवेचन

**१. प्रास्ताविक**—कर कोण भरतो हा प्रश्न बराच गुंतागुंतीचा पण तितकाच मनोरंजक आहे. ह्या प्रश्नाचे दोन भाग पाडतां येतील. एक कर प्रत्यक्ष कोण भरतो व दुसरा तो वस्तुतः कोणाकडून वसूल केला जातो. अर्थात् हे दोन्ही प्रश्न परस्परावलंबी असल्यानें त्याचा साकल्यानेंच विचार केला पाहिजे. ह्या दोन्ही प्रश्नांचा विचार करणें म्हणजेच समाजाच्या निरनिराळ्या थरांवर एकंदर करांचा बोजा ( Incidence of taxation ) कसा विभागला जातो हें पहाणें होय.

प्रथमच हें स्पष्ट केलें पाहिजे कीं, कर कोण भरतो व तो वस्तुतः कोणाकडून वसूल केला जातो हा मुद्दा एकंदर करपद्धतीचा ( tax structure ) विचार करावयाचा असतां अत्यंत महत्त्वाचा ठरतो. मागील प्रकरणांत आपण पाहिलेंच आहे कीं, एखाद्या करापासून एखाद्या गटावर न्याय्य रीतीपेक्षां कराचा बोजा जादा पडत असेल तर, त्या गटास दुसऱ्या एखाद्या कराच्या योगें वाजवीपेक्षां कमी बोजा पडेल, व अशा रीतीनें कराचा एकंदर बोजा सर्व गटांवर पांचव्या प्रकरणांत निर्देशिलेल्या कसोट्यांस अनुसरून असेल. त्यामुळें कोणावरच अन्याय होणार नाहीं. याचाच पर्याय म्हणून असेंहि म्हणतां येईल कीं, एखादा कर वस्तुतः कोणावरहि पडला तरी एकंदर करपद्धति अशीच असावी कीं, त्यायोगें सर्व गटांवर न्याय्य बोजा पडावा. म्हणूनच कर कोण भरतो व शेवटीं कोणाकडून प्रत्यक्षपणें भरला जातो या मुद्द्याचा विचार सार्वजनिक अर्थव्यवस्थेच्या सांगोपांग विवेचनाच्या दृष्टीनें जरुर आहे. कारण ह्या मुद्द्याचें नीट आकलन जर झालें नाहीं, तर एकंदर करपद्धतींत न्याय्यता येईलच असें म्हणतां येणार नाहीं. या विवेचनाच्या पूर्वी करव्यवस्थेचा उद्देश काय याचा सविस्तर विचार केला पाहिजे. उद्देश जनसंमत असेल तरच बोजा कितीहि असला तरी त्याविषयीं तक्रार शक्य तितकी कमी असेल.

**२. करव्यवस्थेचा उद्देश : समाजाचें जास्तींत जास्त हित—** या पुस्तकांत, राष्ट्रांत शांतता व सुव्यवस्था राखण्याकरितां शासनसंस्था हवी व त्या शासनसंस्थेचा खर्च चालविण्याकरितां करहि हवेत असा उल्लेख अधूनमधून आलेला आहेच. तसेंच जसजसें शासनसंस्थेस लोकशाही स्वरूप येऊं लागलें, तसतसें तिचें क्षेत्र वरील दोन बाबींपुरतेंच मर्यादित न राहतां, एकंदर समाजाच्या आधिभौतिक सुखाकरितां व गरजा भागविण्याकरितां झटणें एवढें विस्तृत झालें आहे, याहि गोष्टींची आपण दखल घेतलेली आहे. एवढें सारें करण्याकरितांच कर आकारले जातात; यावरून करव्यवस्थेचा उद्देश समाजाचें जास्तींत जास्त कल्याण करणें (Maximum social advantage) हाच आहे, हें उघड होतें. हिंदुस्थानांत साक्षरतेचें प्रमाण फार कमी आहे, तें शेंकडा वीस देखील नाहीं. साक्षरतेचें प्रमाण जर एवढें कमी तर सुशिक्षितांचें किती कमी असेल, याची कल्पना केलेली बरी. तें शेंकडा २।३ हून कमी असेल. तेव्हां शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून जर सरकारनें शैक्षणिक कर ( Education Cess ) लादला तर, तो योग्यच ठरेल. मी माझ्या मुलांच्या शिक्षणावर भरपूर खर्च करितों, तेव्हां मीं निष्कारण दुसऱ्यांच्या मुलांच्या शिक्षणावर कां खर्च करावा ? स्वतःच्या मुलास शिक्षण देणें वा न देणें हा ज्याचा त्याचा वैयक्तिक प्रश्न आहे. ज्याला परवडेल त्यानें तें द्यावें वा न द्यावें, असें कोणीं म्हटलें तर तें व्यावहारिकदृष्ट्या फारसें वावगें ठरेल असें नाहीं; पण या प्रश्नास एवढीच बाजू नाहीं. सुशिक्षित इसम हा अशिक्षित इसमापेक्षां केव्हांहि अधिक कार्यक्षम ठरेल यांत संदेह असण्याचें कारण नाहीं. तेव्हां जेवढा शिक्षणप्रसार अधिक, तेवढी राष्ट्रीय कार्यक्षमतेंत वाढ झाल्यानें एकंदर समाजाच्या सुखसोयींतहि वाढ होण्याची शक्यता निर्माण होते. यावरून सकृद्दर्शनीं शैक्षणिक-कर हा दुसऱ्याकरितां मीं सोसलेली झळ, असें दिसत असलें, तरी यायोगें माझ्या एकंदर सुखोपभोगांत वाढच होते, हें दिसून येईल. तसेंच मजुरांकरितां चांगल्या हवेशीर चाळी बांधल्या तर त्याकरितां खर्च होणारा पैसा हा प्रथमदर्शनीं मालकांच्या नफ्यांतून जातो, असें जरी वाटलें, तरी मजुरांच्या घरांत आजार कमी व त्यांच्या शरिरांत तक्वा अधिक, यायोगें मजूर अधिक कार्यक्षम होईल व त्यामुळें तो एकंदर उत्पादनांत जास्त भर घालूं शकेल. याचा अर्थ मजुरांच्या चाळीकरितां खर्च केलेला पैसा दामदुपटीनें पुन्हां अप्रत्यक्षरीत्या मालकांच्या घरांतच येऊन पडेल. दिल्यानें कमी होत नाहीं पण

वाढतें, असें जें विद्याधनाबाबत म्हणतात, तें सर्व धनांस लागू आहे, हें वरील विवेचनावरून दिसून येईल. दूरदर्शीपणें हें सर्व हेरून कार्याची योजना करणारा दुर्मिळ. ' योजकस्तत्र दुर्लभः ' हेंच खरें.

असा योजक भेटणें कठीण, म्हणूनच सरकारनें स्वतःच्या शिरावर ही जबाबदारी घेऊन जास्तींत जास्त कल्याणास योग्य असें आर्थिक धोरण ठेवलें पाहिजे. असें आर्थिक धोरण ठेवण्यास योग्य अर्थ-व्यवस्थेचीच कांस. धरावी लागते. एखाद्या खाजगी व्यक्तीनें मोटारीवर पैसे उडविण्यापेक्षां तेच सरकारनें आपल्याकडे खेचून त्याचा विनियोग ज्यायोगें एकंदर उत्पादन वाढेल याकडे केला तर तें केव्हांहि श्रेयस्कर.

**३. सरकारी खर्च जास्त, या घोषणेवर भर देण्यापेक्षां तो योग्य असावा, असा भर देणें इष्ट**—अलीकडे जो तो उठून बोलतांना दिसतो कीं, सरकारी खर्च फार वाढत चालला आहे, त्यास कात्री लावली पाहिजे. पण वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं, सरकारनें खर्च करणें यांत कांहीं वावगें नाहीं, उलट तें इष्टच आहे. अनाठायीं खर्च करणें हें वावगें आहे. सरकारी खर्च म्हणजे तरी काय? एखाद्या व्यक्तीनें कसा तरी पैसा खर्च करण्यापेक्षां, सरकारनें एकंदर समाजाच्या हितवृद्धीकरितां तो योग्य रीतीनें खर्च करणें हें होय. अशानें खाजगी व्यक्तीची खर्च करण्याची ऐपत कमी होईल हें खरें, पण त्यायोगें सरकारची ऐपत वाढेल व त्याचा फायदा एखाद्या व्यक्तीस मिळण्यापेक्षां सबंध समाजास मिळेल. बर्क म्हणतो त्याप्रमाणें निव्वळ खर्चात बचत करणें यांत शहाणपणा नसून खर्च योग्य रीतीनें करणें यांत शहाणपणा आहे. पैसा खर्चच करावयाचा नाहीं म्हटलें, तर तें अप्रबुद्ध माणूसदेखील पैसा कुलुपांत ठेवून करूं शकेल, पण समंजसपणें पैसा खर्च करणें हें शहाण्यासुर्त्या माणसासच शक्य आहे.[1]

---

1. Mere parsimony is no economy–parsimony requires no providence, no sagacity, no powers of combination, no comparision, no judgement. Mere instinct may produce this false economy in perfection. The other economy has larger views, it demands a discriminating judgment and a firm sagacious mind. ( Burke's works v. p. 229 )

पण सरकारकडे हा अधिकार देण्याबाबतच कांहीं तज्ज्ञ मूलग्राही आक्षेप घेतात. त्यांच्या मतें, सरकार झालें तरी तें चुका करणें अशक्य नाहीं. समाजाचें जास्तींत जास्त हित या गोंडस नांवाखालीं त्यांतील कांहीं व्यक्ती स्वतःच्या निव्वळ तात्त्विक कल्पना अंमलांत आणण्याचा प्रयत्न करून समाजाचें जास्तींत जास्त अनहित करूं शकतात. याबाबत ते हिंदमधील कांहीं राज्यसरकारांनीं अंमलांत आणलेल्या दारूबंदीच्या धोरणाचा उल्लेख करतात. ते म्हणतात, दारूबंदी करणें योग्य हें तात्त्विकदृष्टया एकदम मान्य. कारण, दारूबंदीच्यायोगें दारूबाजांचा शरिरास अपायकारक वस्तूंवर खर्च होणार नाहीं. त्यामुळें शरीर कार्यक्षम राहून पैसाहि खिशांत राहील. या दोन्ही गोष्टींच्या सदुपयोगानें राष्ट्रीय उत्पादनांत भर पडेल व त्याचा फायदा सर्व समाजास मिळेल. तेव्हां जरी अशा धोरणाचा पाठपुरावा करणाऱ्या सरकारच्या उत्पन्नांत या धोरणानें मोठी खोट बसली, तरी पर्यायानें समाजास एकंदर फायदाच होणार. लोकांच्या वाढत्या कार्यक्षमतेनें होणारा फायदा हा केव्हांहि या तुटीपेक्षां जास्त असणार. हा झाला तात्त्विक विचार. पण प्रत्यक्ष व्यवहारांत काय झालें तें पहा. वर्षास रु.१२ कोटींप्रमाणें गेल्या पांच वर्षांत (सन १९५२ मार्च अखेर) एका राज्यसरकारास रु. ६० कोटींची तूट सोसावी लागली. हा पैसा दारूबाजांच्या खिशांत तर राहिलाच नाहीं, तर तो सर्व चोरटया रीतीनें गाळलेल्या दारूवर खर्च होऊन गेला तो गेलाच. " म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं, पण काळ सोकावतो, " असें म्हणतात ना, त्याप्रमाणें पैसा बुडाला तरी दुःख नाहीं, पण लोकांत बेकायदा वाटेल तें करण्याची प्रवृत्ति बळावत चालली. राजसत्तेविषयीं आदर किंवा भीति कमी होत चालली. बरें लोकांचे हे ६० कोट रुपये वांचले असें धरून चाललें तरी त्याचा योग्य उपयोग करण्याची सरकारजवळ योजना नाहीं. त्यामुळेंहि जादा उत्पन्नांत या वांचलेल्या ६० कोटी रुपयांची परिणति होऊं शकली नाहीं. यावरून नुसता हेतु शुद्ध असून चालत नाहीं, तो प्रत्यक्ष परिणत करण्याकरितां अवश्य असलेल्या सामाजिक परिस्थितीचा व इतर शक्याशक्यतेचाहि विचार करावा लागतो. या उलट दारूबंदी केली नसती तर या ६० कोट रुपयांवर एखादें धरण बांधून निघालें असतें. यावरील पाण्याच्या उपयोगावर तो प्रांत सबंध हिंदुस्थानास साखर पुरवून बाहेर देशीं ती रवाना करूं शकला असता व अन्नधान्याच्या बाबतींतहि तो स्वयंपूर्ण होऊं शकला असता. एवढें झाल्यावर मग फार तर दारूबंदीचा प्रयोग

करून पाहिला असता तर तें योग्यहि ठरलें असतें. आज हजारों वर्षें सर्व जगांत कांहीं टक्के लोक दारू पीत आले आहेत. बाहेरील जगांत ते अद्यापीहि पीत आहेत. हिंदुस्थानांत ते आणखी कांहीं वर्षें पीत राहिले असते, म्हणून फारसें समाजाचें अनहित झालें नसतें. दारूबंदीचा प्रयोग अवेळीं करून मात्र सरकारनें समाजाचें जास्तींत जास्त हित असा मंत्र तोंडानें जपत जपत समाजाचें जास्तींत जास्त नकळत अनहित मात्र केलें. या विवरणावरून सरकारी आर्थिक धोरण व करपद्धती समाजाचें जास्तींत जास्त हित साधण्याकरितां कटिबद्ध असावयाच्या, तर त्या व्यवहारी व समंजस माणसाच्या मार्गदर्शनाखालीं हव्यात हें निर्विवाद आहे. अशीं माणसें मिळणें अर्थात् ज्या त्या समाजाच्या सुदैवावर व त्याच्या एकंदर राष्ट्रीय सद्गुणांवर अवलंबून आहे.

अर्थात् प्रत्येक सरकारच्या धोरणाविषयीं, ज्या त्या काळीं कांहीं लोकांचे मूलभूत मतभेद असणारच. म्हणून तर प्रत्येक राष्ट्रांत परस्परविरोधी धोरणाचा पाठपुरावा करणारे निरनिराळे पक्ष असतात. ज्या पक्षास बहुमताचा पाठिंबा मिळेल, तो पक्ष आपलें सरकार स्थापून त्यामार्फत आपलें धोरण अंमलांत आणण्याचा प्रयत्न करतो. पण याकरितां सरकारपेक्षां खाजगी व्यक्ती समाजोपयोगी खर्च करण्यास जास्ती लायक असें म्हणतां येणार नाहीं. सर्वजनप्रतिनिधिभूत जशी जी शासनसंस्था तीच समाजाचें जास्तींत जास्त हित कोणतें, याविषयींचा निर्णय देण्यास अधिक पात्र आहे यांत संदेह बाळगण्याचें कारण नाहीं. प्रत्येक व्यक्तीनेंहि स्वतः सुजाण व कर्तव्यास जागरूक असें बनलें पाहिजे. याकरितां प्रत्येकानें राजकारण व अर्थकारण या बाबींचा थोडा अभ्यास करून आपला दृष्टिकोन विशुद्ध ठेवणें जरूर आहे.

**४. समाजाचें जास्तींत जास्त हित म्हणजे उत्पादनांत वाढ, व त्याची समतोल वांटणी**—समाजाचें जास्तींत जास्त हित म्हणजे तरी काय, याचाहि थोडासा विचार करूं. आर्थिक बाबींची चर्चा जेव्हां करण्यांत येते, तेव्हां हा शब्दप्रयोग एकंदर राष्ट्रीय उत्पादन व त्याचें विभाजन एवढयापुरताच मर्यादित असतो. पारलौकिक कल्याणाची दखल निदान सध्यांच्या मानवी दृष्टीनें कोणतीहि शासनसंस्था घेऊं शकत नाहीं. जगांत परमेश्वर आहे कीं नाहीं, मरणोत्तर आत्म्यास कांहीं कार्य असतें का, आत्म्याचें स्वरूप काय, या गोष्टीं-

विषयींचें आपल्या पूर्वजांचें दोन हजार वर्षांपूर्वींचें ज्ञान व आतांचें ज्ञान यांत रतिभरहि प्रगति दिसत नाहीं. उलट दिवसानुदिवस जडवादी विचारसरणी अंगिकारण्याकडेच लोकांची प्रवृत्ति होत चालली आहे. अशा अनिश्चित स्थितींत, निश्चित बाबींत प्रगति करणें हेंच केव्हांहि श्रेयस्कर. म्हणूनच शासनसंस्था समाजाचें जास्तींत जास्त हित करण्याचा प्रयत्न करते; याचाच अर्थ राष्ट्रीय उत्पादनवाढ व त्याची योग्य वांटणी यांबाबत आपलें सारें लक्ष केंद्रित करते. कमी खर्चांत जास्त उत्पादन कसें होईल, हें पाहणें हाच शासनसंस्थेचा हेतु असतो. समतोल वांटणी म्हणजेच सामाजिक विषमता शक्य तितकी कमी करणें हें होय.

तेव्हां समाजाचें जास्तींत जास्त हित हा प्रधान हेतु असल्यावर कोणतीहि न्याय्य करव्यवस्था समाज निमूटपणें मानतो. कारण स्वतःच्या खिशांतून पैसा काढून तो सरकारला आपल्याच हिताकरितां खर्चण्यास द्यावयाचा असतो. त्या करव्यवस्थेचें यथायोग्य आकलन करून घेण्याकरितां तिचा व्यक्ति, संस्था यांवर व तसाच एकंदर राष्ट्रीय उत्पादनावर कसा परिणाम होतो, हें आतां पाहूं.



## प्रकरण ८ वें

# प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष करांचा बोजा

**१. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष करांचें स्वरूप**—सहाव्या प्रकरणांत आपण पाहिलें कीं, जो कर आकारला जाईल तो चिकित्सक दृष्टीनें पाहिलें असतां शेवटीं कोणाकडून वसूल केला जाईल, हें पाहाणेंच अर्थशास्त्रज्ञांचें काम आहे. मग तो प्रत्यक्ष आहे कीं अप्रत्यक्ष, या प्रश्नास फारसें महत्त्व देण्याचें कारण नाहीं. पण करांचा बोजा प्रत्यक्ष कोणावर पडतो या प्रश्नाचा विचार करावयाचा असतां या बाबीचा एका वेगळ्या दृष्टीनें विचार करावा लागतो.

ज्यांच्यावर प्राप्तिकर, वारसाकर यांसारख्या प्रत्यक्ष करांचा बोजा पडतो, त्यांना हे कर दुसऱ्याकडून वसूल करतां येत नाहींत. अगदीं शेवटीं कर हे उपभोक्त्या-कडून ( Consumer) वसूल केले जात असले तरी, प्रत्यक्ष बोजा या दृष्टीनें असल्या करांचा भार दुसऱ्याच्या खांद्यावर ढकलतां येत नाहीं. पण विक्रीकर, उत्पादनकर, आयातनिर्यातकर यांसारख्या अप्रत्यक्ष करांचा बोजा दुसऱ्यांवर म्हणजे उपभोक्त्या नागरिकांवर लादतां येतो. प्रत्यक्ष कर भरणारा एक व प्रत्यक्ष कर देणारा वेगळाच, अशी स्थिति या करांबाबत होऊं शकते.

अर्थात् विवेचनास सोपें पडतें म्हणूनच या दृष्टिकोनांतून विचार कर्तव्य आहे. कारण, सामान्यतः जरी प्रत्यक्ष करांचा बोजा श्रीमंतांवर पडतो व अप्रत्यक्ष करांचा बोजा गरिबांसह सर्वांवर पडतो असें दिसून येत असलें तरी, हें नेहमींच खरें असतें असें नव्हे. समजा, उद्यां प्रत्येकाच्या उत्पन्नावरच जशी उत्पन्नांत वाढ तसें कराचें प्रमाण अधिक, या तत्त्वानें कराची आकारणी केली व आतां जशी पहिल्या रु. ३६०० पर्यंत उत्पन्न असणाऱ्यांस माफी आहे तशी सवलत ठेवली नाहीं, तर हा प्रत्यक्ष करहि समाजांतील खालच्या थरांपासूनच वसूल केला जाईल. याउलट, अति मौल्यवान् अशा हिरे, माणिक, मोतीं यांसारख्या वस्तूंवरील विक्रीकर हा अप्रत्यक्ष असूनहि, तो फक्त श्रीमंतांकडूनच वसूल केला जाईल. तात्पर्य, करांचा

बोजा कोणावर पडतो ह्या प्रश्नाचें विवेचन करतांना असें पृथक्करण केल्यानें त्या विवेचनांत सुलभता येते एवढेंच.

**२. अप्रत्यक्ष करांचा बोजा बाजाराच्या चढउतारावर व ज्या त्या वस्तूच्या उत्पादनक्षमतेवर**—विक्रीकर, उत्पादनकर यांसारखे कर जेव्हां एखाद्या वस्तूवर आकारले जातात, तेव्हां ज्या व्यापाऱ्यांकडून ते वसूल केले जातात, ते व्यापारी पर्यायानें हे कर ग्राहकांकडून वसूल करूं शकतात. उदाहरणार्थ, सध्यां (सन १९५२ सालीं) कापडावर उत्पादनकर व विक्रीकर हे दोन्ही कर लादलेले आहेत. असें असूनहि उत्पादक व मधले व्यापारी हे दोन्ही कर पूर्णतः ग्राहकांकडून वसूल करूं शकतात. कारण, कापड ही वस्तु सर्वांसच अत्यंत जरुरीची आहे. वस्त्र ही एक प्राथमिक गरज आहे व तिचें जेव्हां उत्पादन कमी असतें, तेव्हां मागणी ठराविक राहात असल्यानें, त्यावरील कर, व्यापारीवर्ग सहजच ग्राहकांकडून वसूल करूं शकतो. पण ही शक्यता, जोंपर्यंत ज्या वस्तूवर असा कर लादला जातो त्या वस्तूची मागणी कमी होण्याची शक्यता नाहीं, तोंपर्यंतच टिकूं शकते. समजा, फाउन्टनपेन्सवर अशा तऱ्हेचे कर आकारले जाऊं लागले, तर ग्राहक साहजिकच आपली मागणी कमी करतील, व खप कमी म्हणून उत्पादकांस आपलें उत्पादन कमी करणें भाग पडेल. पण उत्पादन कमी केल्यास एकंदर उत्पादनखर्च कमी करतां येणें नेहमींच शक्य होतें असें नाहीं. यंत्रसामग्री, नौकरवर्ग, मजूर ह्यांवरील खर्च फार मोठ्या प्रमाणावर कमी करतां येत नाहीं. त्यामुळें नफ्याचें प्रमाण कमी करूनहि उत्पादकांस, उत्पादनाचें प्रमाण कायम ठेवावें लागतें. असें करावयाचें म्हटलें तर साहजिकच वरील कराचा बोजा त्यास गिऱ्हाइकांवर ढकलतां येत नाहीं. जेव्हां उत्पादकांस यापेक्षां अधिक अनुकूल परिस्थिति असते, तेव्हां कांहीं अंशीं कराचा बोजा तो ग्राहकांवर लादूं शकतो. ह्या फाउन्टनपेन्सचेंच उदाहरण पुन्हां घेऊं या. फाउन्टनपेन ही वस्तु बऱ्याच दिवसांच्या वापरानें सुशिक्षित समाजांत तरी आवश्यक होऊन बसली आहे. तेव्हां उत्पादक व व्यापारीवर्ग जर गिऱ्हाइकांशीं तडजोडीच्या वृत्तीनें वागला तर गिऱ्हाईकहि थोडेंसें पडतें घेऊन, या नवीन कराचा कांहीं भाग देण्यास तयार होईल. अशा स्थितींत मागणी पूर्वीइतकीच राहिल्यानें, या कराचा कांहीं भाग स्वतः सोसण्याशिवाय उत्पादकांचें जादा नुकसान होत नाहीं, त्यामुळें तोहि अशा

तडजोडीस तयार असतो. कांहीं कांहीं वेळेस फाउन्टनपेन्सची मागणी कमी होण्याची शक्यता नसतांहि, ती आहे यापेक्षां वाढविण्याकरितां उत्पादक अशा करांचा सबंधच्या सबंध बोजा उचलण्यास तयार होतो. त्यांतून यंत्रसामग्री व इमारती वगैरेवरील खर्च फारा दिवसांच्या उत्पादनामुळें सर्वस्वीं निघाला असला व ती निव्वळ फायद्यांत असली, तर अशा करांचा सर्वच्या सर्व बोजा उचलण्यासहि तो तयार होणें शक्य असतें. यावरून असें दिसून येईल कीं, अप्रत्यक्ष करांचा बोजा कोणावर पडतो, हें बाजाराच्या चढ–उतारावर व त्या वस्तूंच्या उत्पादन-क्षमतेवर अवलंबून आहे.

**३. जीवनावश्यक वस्तूंवरील अप्रत्यक्ष कर प्रतिगामी**—चौथ्या प्रकरणांत करपद्धति ही वाढत्या उत्पन्नावर वाढता कर किंवा प्रोग्रेसिव्ह असावी, असें सिद्ध केलेलें आहे. तेव्हां विक्रीकरासारखे अप्रत्यक्ष कर जर जीवनावश्यक वस्तूंवर लादले गेले, तर ते प्रतिगामी किंवा रिग्रेसिव्ह ठरतील. अन्न व वस्त्र ह्या दोन गोष्टी गरिबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वांनाच अत्यावश्यक आहेत. उद्यां जर अन्नधान्यावर विक्रीकर आकारला तर, दरमहा रु. ५० मिळविणारास जेवढा कर द्यावा लागेल, तेवढाच दरमहा रु. ५००० मिळविणारास द्यावा लागेल. ( येथें दोघांच्याहि कुटुंबांत सारखींच माणसें आहेत असें गृहीत धरलें आहे; ) व अशा तऱ्हेची करपद्धति असणें हें योग्य नव्हे, हें तर आपण मानलें आहे, म्हणूनच हिंदी राज्यघटनेंतदेखील जीवनावश्यक वस्तू कोणत्या व त्यांवर कोणते कर लादावेत किंवा लादूं नयेत, हें ठरविण्याचा अधिकार मध्यवर्ती लोकसभेकडे सोंपविला आहे. मुंबईसरकारनेंहि अन्नधान्य व हातमागाचें जाडेंभरडें कापड यांवर विक्रीकर माफ केलेला आहे. पण असें जरी असलें तरी, जेव्हां एखादा अर्थमंत्रि अगदींच पेचांत सांपडतो, तेव्हां अशा तत्त्वांचा फारसा विचार करीत न बसतां, सहजासहजीं जास्त पैसा कसा गोळा करतां येईल, यापुरताच विचार करून, जीवनावश्यक वस्तूंवरहि असे कर आकारण्यास तो मागेंपुढें पहात नाहीं. उदाहरण म्हणून द्यावयाचें झाल्यास सध्यां गिरणीच्या जाड्याभरड्या कापडावर मध्यवर्ती सरकारनें आकारलेला उत्पादनकर व मद्राससरकारनें अन्नधान्याच्या होणाऱ्या एकंदर व्यापारी व्यवहारावर आकारलेला शेंकडा ४ आणे विक्रीकर, यांचें देतां येईल. ह्या आकारलेल्या करांच्या दरांत मात्र पुरोगामी धोरण स्वीकारलेलें

आहे. जसें, तलम कापडावर २५ टक्के उत्पादनकर तर जाड्याभरड्या कापडावर ५ टक्के, किंवा इतर जिनसांच्या व्यापारी व्यवहारांवर शेंकडा ८ आणे ते १ रुपया विक्रीकर, तर अन्नधान्याच्या अशा व्यवहारावर शेंकडा ४ आणे विक्रीकर.

**४. प्रत्यक्ष कर पुरोगामी, अप्रत्यक्ष कर प्रतिगामी**—प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष करांचा बोजा कोणावर पडतो, या बाबतींत जेव्हां आपण विचार करूं लागतों, तेव्हां प्रत्यक्ष कर हा पुरोगामी ( Progressive ) व अप्रत्यक्ष कर हा बव्हंशीं प्रतिगामी ( regressive ) असें ठरतें. वर केलेल्या विवेचनानें, या आपल्या विधानास पुष्टीच मिळते. हीच बाब आणखी थोड्याशा विस्तारानें सुस्पष्ट करूं.

मुंबईसरकारनें कपड्याला लावण्याच्या साबणावर दर रुपयास पाव आणा याप्रमाणें विक्रीकर ठरविलेला आहे. साबण ही कांहीं जीवनावश्यक वस्तु नव्हे. तेव्हां यावर विक्रीकर आकारला गेला तर तें फारसें वावगें आहे असें कोणास वाटणार नाहीं. पण ही वस्तु सर्रास सर्वांच्या वापरांत आहे. त्यामुळें दरमहा रु. २०० प्राप्ति असणाराचा साबणावर जेवढा खर्च होईल, साधारणपणें तेवढाच दरमहा रु. २०००।– प्राप्ति असणाऱ्या गृहस्थाचाहि असेल. फार तर थोडासा जास्त असेल पण मिळकतीचें प्रमाण दसपटीनें वाढलें, म्हणून हा खर्चहि दसपटीनें वाढेल, असें मात्र खास म्हणतां येणार नाहीं.

विक्रीकर मात्र साबणावर जेवढा खर्च होईल त्यावरच दोघांसहि द्यावा लागणार. फार तर दरमहा रु. २०० प्राप्ति असणारास खर्च थोडासा कमी असेल, तर थोडा कमी द्यावा लागेल एवढेंच. एकास १ रु. विक्रीकर द्यावा लागला तर दुसऱ्यास १० रु. द्यावा लागेल असें मात्र होणार नाहीं. याचाच अर्थ, हा कर वाढत्या उत्पन्नावर वाढता कर या तत्त्वास अनुसरून लादला जातो असा होत नाहीं, म्हणजेच हा कर प्रतिगामी ठरतो.

आतां दुसरें उदाहरण मध्यवर्ती सरकारच्या सायकलीवरील आयातकराचें घेऊं. समजा हा कर शेंकडा ४० रु. आहे. रु. २०० किंमतीची सायकल आयात केली, तर त्यावर रु. ८० आयातकर म्हणून द्यावे लागतील, व हा कर अर्थातच व्यापारी ग्राहकांकडून वसूल करणार. असें करतांना त्या गिऱ्हाइकाची वार्षिक प्राप्ति काय आहे याचा तो बिलकूल विचार करणार नाहीं. ज्याची वार्षिक प्राप्ति

रु. १०००।– आहे त्यास व ज्याची वार्षिक प्राप्ति रु. १००००।– आहे त्यास, या दोघांसहि सायकलीवर आयातकर म्हणून रु. ८० च लागतील. यावरून हें उघडच होतें कीं, वाढत्या उत्पन्नावर वाढता कर या तत्त्वाचें असा आयातकर लादतांना उल्लंघन झालें.

**५. निर्यातकराचा बोजा परदेशी ग्राहकांवर पडतोच असें नाहीं**—आणखी दुसऱ्या कोणत्याहि अप्रत्यक्ष करांचा बोजा कोणाकोणावर किती पडतो, हें पाहूं गेलें असतां हाच प्रकार दिसून येईल. उत्पादनकर, विक्रीकर, आयातकर हे तीन प्रमुख अप्रत्यक्ष कर आहेत, व ते सर्व प्रतिगामी आहेत हें आपण पाहिलेंच आहे. याचसारखा दुसरा कर म्हणजे निर्यातकर. पुष्कळ वेळां असें म्हटलें जातें कीं, निर्यातकर म्हणजे एतद्देशीय लोकांच्या सुखाकरितां शहाण्या व धूर्त अर्थमंत्र्यानें परदेशीय लोकांकडून सक्तीनें वसूल केलेली देणगी होय. पण हें फार थोड्या बाबतींत खरें आहे. हिंदुस्थान गोणपाटाच्या बाबतींत, इराण पेट्रोलच्या बाबतींत, किंवा मलाया रबराच्या बाबतींत हे निर्यातकर एका विशिष्ट मर्यादेपर्यंत परदेशीय लोकांकडून वसूल करूं शकेल. कारण, या देशांकडे या विशिष्ट वस्तूंबाबत जवळजवळ जागतिक मक्तेदारी असल्यासारखी आहे. पण तेंच जर हे देश खुळेपणानें परदेशियांना अशक्य किंवा अति जड वाटतील, इतके जबर कर बसवूं लागतील तर असे दुसरे देश या वस्तूंच्याऐवजीं दुसऱ्या कांहीं वस्तू शोधूं लागतील. हिन्दी गोणपाटाची निर्यात जेव्हां दक्षिण आफ्रिकेकडे राजकीय कारणांसाठीं बंद करण्यांत आली, तेव्हां दक्षिण आफ्रिकेनें गोणपाटाऐवजीं कागदाच्या पिशव्या वापरण्यास सुरवात केली. तसेंच मलायाचें रबर अमेरिकेस फार महाग पडूं लागलें, तेव्हां अमेरिकेनें सिंथेटिक रबराचें उत्पादन वाढविलें. असें झालें म्हणजे बाजारपेठ टिकविण्याकरितां अर्थातच वस्तूंची किंमत कमी करावी लागते व अशा रीतीनें निर्यातकर एतद्देशीय उत्पादकांस अप्रत्यक्ष रीत्या भरावा लागतो. असें झालें म्हणजे, हा कर प्रतिगामी ठरतोच; कारण ह्या वस्तूंचें उत्पादन करणाऱ्या लहान लहान शेतकऱ्यांवर त्या कराचा बोजा पडतो.

**६. प्रत्यक्ष करांचा बोजा**—अप्रत्यक्ष कर हे जर प्रतिगामी तर पुरोगामी कोणते, ह्या प्रश्नाचें उत्तर वरील विवेचनावरून चटकन् ध्यानांत येईल. प्रत्यक्ष कर हे पुरोगामी होत; प्रत्यक्ष कर म्हणजे प्राप्तीवरील कर व वारसाकर. जसजसें

उत्पन्न वाढेल तसतसा प्राप्तीवरील कर हा वाढत्या प्रमाणांत घेतां येतो. तसेंच ज्या प्रमाणांत वारशानें इस्टेट मिळेल त्या प्रमाणांत वारसाकरहि वसूल करतां येतो. वारसाकराऐवजीं नुसता प्राप्तीवरील करहि प्राप्तिकरकायद्याच्या नियमांत थोड्याफार फरकानें वसूल करतां येईल. वारशानें आलेली इस्टेट, हें परार्जित उत्पन्न ( unearned income ) ठरवावयाचें व ज्या वर्षी तें एखाद्यास मिळेल, त्या वर्षीच्या त्याच्या परार्जित उत्पन्नांत ह्या उत्पन्नाची गणना करून, प्राप्तिकर आकारावयाचा. याविषयीं सविस्तर विवेचन ११ व्या प्रकरणांत केलें आहे.

चौथ्या प्रकरणांत करपद्धतींच्या कसोट्यांचें विवेचन करतांना प्राप्तिकर हा पुरोगामी कर आहे, हें सविस्तर दर्शविलें आहे. जसजसें उत्पन्न वाढेल तसतसा हा कर वाढत्या प्रमाणांत आकारतां येतो. मात्र हा आकारतांना एखाद्याची काम करून उत्पन्न वाढविण्याची इच्छा मारली जाणार नाहीं, एवढी दक्षता घेतली म्हणजे झालें.

यानंतर साहजिकच असा प्रश्न उपस्थित होतो कीं, अप्रत्यक्षकर जर प्रतिगामी तर पुरोगामी असे प्रत्यक्ष करच कां लादले जाऊं नयेत? प्रत्यक्षकर हा प्राप्तिकराशिवाय दुसरा असूं शकत नसल्यानें पुरोगामी करपद्धति अमलांत आणावयाची तर हा एकच कर वसूल करावा लागेल, व एककरपद्धति अमलांत आणणें अशक्य आहे, हें आपण सहाव्या प्रकरणांत पाहिलें आहे. याबरोबरच अप्रत्यक्ष कर लादण्यास दुसरींहि जोरदार कारणें आहेत, तीं कोणतीं तें पाहूं.

**७. अप्रत्यक्ष करांची जरूरी-वसूल करण्यास सोपे, पैसा ताबडतोब मिळतो, राष्ट्रीय व सामाजिक हित साधतां येतें—** पहिल्या प्रकरणांत प्राचीन करपद्धतीचें जें धांवतें समालोचन केलें, त्यावरून हें दिसून आलें कीं, औद्योगिकक्रांतिपूर्वकाळांत, प्राप्तिकर जवळ जवळ नव्हताच. जेव्हां राजे लोकांस पैशांची अगदींच निकड लागे, तेव्हां तात्पुरता कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें श्रीमंत लोकांकडून पैसा गोळा करण्यांत येई. या पद्धतीस थोडेंबहुत शास्त्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न १९ व्या शतकांत प्रथमच झाला. पण यास खरें स्थैर्य पहिल्या महायुद्धानंतर लाभलें. तोंपर्यंत प्रत्येक अर्थमंत्रि अंदाजपत्रकी भाषणांत पुढल्या वर्षी प्राप्तिकर थोडासा कमी करणें मला शक्य होईल किंवा मी तो अजिबातच रद्दबातल करीन, अशा तऱ्हेचें आश्वासन देई.

प्राप्तिकर पुरोगामी असतांहि अप्रत्यक्ष कर त्या काळीं कां लोकमान्य होते व अद्यापहि आहेत यांस तशींच सबळ कारणें आहेत.

पहिलें कारण असें कीं, अप्रत्यक्ष कर वसूल करण्यास फार सोपे. हल्लीं राज्यकारभाराचा खर्च अतोनात वाढलेला आहे. त्याबरोबरच करवसूल-पद्धतीसहि फारच शास्त्रीय स्वरूप दिलें गेलें आहे. प्राप्तिकरखातें, विक्रीकर-खातें, कस्टमडयूटी–खातें यांच्या नियमावलींचा थोडासा जरी अभ्यास केला, तरी, वरील विधानाची सत्यता पटेल. यांत काम करणारा नौकरवर्गहि सुशिक्षित, कार्यक्षम व ज्या त्या खात्यांतील बारीकसारीक गोष्टींचें शिक्षण देऊन तरबेज केलेला आहे. पूर्वीं असें नव्हतें, तेव्हां सहजासहजीं पैसा गोळा करतां येईल, अशा करपद्धति त्याकाळीं अस्तित्वांत असत. एखाद्याचें उत्पन्न किती हें ठरवावयाचें म्हणजे केवढी गुंतागुंत. त्या काळीं हिशोबहि हल्लींसारखे विस्तारानें लिहीत नसत, त्यामुळें जमीनधाऱ्यासारखा साधासुधा कर हाच त्या काळच्या शासनसंस्थेच्या उत्पन्नाचा प्रमुख भाग असे. तो दरएकरी जमिनीच्या सरसनीरसतेच्या मानानें आकारला जाई. एकर मोजणें हें कांहीं कठीण काम नव्हे. तसेंच सर्वसाधारण सरसनीरसपणा हा नुसत्या अनुभवी माणसाच्या दृष्टिक्षेपानेंहि ठरवितां येतो. ह्या साधेपणामुळेंच असा कर लोकमान्य होता. हल्लींहि जुना कर म्हणजे चांगला कर या रूढीनें तो चालू आहे.

दुसरें कारण असें कीं, कर लादल्या दिवसांपासून अप्रत्यक्ष कर तिजोरीकडे पैसा खेचतो. विक्रीकर लादला न लादला कीं, झाली तिजोरींत पैसा येण्यास सुरुवात. विक्री रोजच होणार, म्हणून करहि रोजच वसूल होणार. वसूल करणाऱ्यास भरतां येणें सोईस्कर व्हावें म्हणूनच तो तिजोरींत भरण्याची मुदत दर तीन महिन्यांची ठेवलेली आहे. जेव्हां पैशाची टंचाई भासते तेव्हां असा कर तरी लादला जातो, किंवा तो पूर्वींपासूनच अंमलांत असेल तर कराच्या दरांत तरी वाढ केली जाते

पण या दोहोंपेक्षांहि सर्वांत प्रबळ कारण म्हणजे अशा करानें कांहीं सामाजिक व राष्ट्रीय हित साधण्याचें साधन शासनसंस्थेच्या हातीं येतें. सायकलीवरील आयात-कर हा प्रतिगामी आहे, असें आपण वर म्हटलें आहे. पण देशी उद्योगधंद्यास उत्तेजन देण्याचे दृष्टीनें हा एक अति योग्य कर आहे असेंच वाटेल. अशा करानें

आपणांस एका कमी दर्जाच्या सायकलीस दुसऱ्या उत्कृष्ट सायकलीपेक्षां जादा किंमत द्यावी लागेल हें खरें, पण एतद्देशीय सायकलीस दिलेला पैसा हा सर्वच्या सर्व आपल्या देशांत राहातो, व अशा रीतीनें पर्यायानें तो आपल्याच देशबांधवांच्या उपयोगी पडतो. परदेशीं गेलेला पैसा तो एकदां गेला कीं गेलाच. त्याचा स्वबांधवांस कांहींहि उपयोग नाहीं. तेव्हां आयातकर विशुद्ध कर-शास्त्राच्या दृष्टीनें जरी प्रतिगामी असला तरी व्यवहारी करशास्त्राच्या दृष्टीनें तो योग्यच आहे, हें सिद्ध होतें. जेव्हां एका मध्यवर्ती आंतरराष्ट्रीय अर्थनियंत्रणमंडळाकडून सर्व राष्ट्रांचे अर्थव्यवहार नियंत्रित केले जातील, तेव्हां विशुद्ध करशास्त्राप्रमाणें करपद्धति अमलांत आणणें शक्य होईल, एरवीं नाहीं. अशी स्थिति जेव्हां जागतिक सरकार अस्तित्वांत येईल तेव्हांच शक्य आहे. असें सरकार निदान शेंदोनशे वर्षांच्या अवधींत स्थापन होईल अशी आशा आपण करूं या.

आयातकरानें असें राष्ट्रहित साधलें जातें असें जरी दिसत असलें, तरी या सवलतीचा एतद्देशीय कारखानदार दुरुपयोग करणार नाहींत याचीहि दक्षता घेतली पाहिजे. आयातकर लादण्याचा मूळ हेतु एतद्देशीय नव्या धंद्यास त्याच स्वरूपाच्या सुसंघटित व फारा दिवसांपासून प्रस्थापित झालेल्या परदेशी धंद्यांशीं टक्कर देतां यावी व थोड्या कालावधींत असल्या सवलतीशिवायहि आपलें आसन स्थिर करतां यावें असा असतो. पण जर कारखानदारांनीं तसें केलें नाहीं, तर तो एतद्देशीय नागरिकांवर एक प्रकारचा भुर्दंडच ठरेल. परदेशी साखरेशीं टक्कर देतां यावी म्हणून सरकारनें १९३४ सालीं येथील अगदीं बाल्यावस्थेंतील साखरधंद्यास संरक्षण देऊन परदेशी साखरेच्या आयातीवर जबर आयातकर बसविले. पण येथील कारखानदारांनीं स्वतःचे खिसे गरम करण्याशिवाय गेल्या १८ वर्षांत दुसरें काय केलें? तेव्हां असे आयातकर लादतांना ज्या धंद्यास संरक्षण द्यावयाचें त्यांना, ठराविक कालावधींत आपला धंदा परदेशियांच्या तोडीचा करावा नाहींतर त्या धंद्याचें राष्ट्रीयीकरण केलें जाईल, किंवा अशी सवलत काढून घेतली जाईल अशी ताकीद देणें योग्यच ठरेल.

तसेंच अशा अप्रत्यक्ष करानें सामाजिक हितहि साधतां येतें. कसें तें पहा. दारूवर उत्पादनकर ज्या प्रमाणांत एखादा दारू विकत घेईल, त्या प्रमाणांत द्यावा असें ठरविलें तर असा कर देण्याचा व ग्राहकाच्या उत्पन्नाचा अर्थाअर्थी कांहींहि

संबंध नाहीं. पण तेंच अशा करानें एक मोठें सामाजिक हित साधतें. दारू पिणें हें वाईट, त्यायोगें मनुष्याचें शारीरिक, मानसिक व कौटुंबिक नुकसान होतें. व्यक्तीच्या कौटुंबिक नुकसानीबरोबर सामाजिक व राष्ट्रीय नुकसानहि होतें. याबद्दल कोणाचें दुमत असण्याचें कारण नाहीं. मग एक आण्यांत दारूची तल्लफ भागवितां येणें व दोन आण्यांत ती पिऊन बेहोष होतां येणें हें केव्हांहि अनिष्टच. तेव्हां अशा प्रवृत्तीस आळा बसावा. दारू महाग झाली तर त्या प्रमाणांत पिण्याची प्रवृत्तिहि कमी होईल, या हेतूनें असे कर लादले जातात. असें करणें हें योग्यच होय, यांत संदेह असण्याचें वरील विवेचनावरून कारण दिसत नाहीं.

**८. अप्रत्यक्ष कराचा बोजा मागणी-पुरवठ्याच्या व्यस्त प्रमाणावर**—अप्रत्यक्ष करांचा बोजा प्रत्यक्ष कोणावर पडतो हें बाजाराच्या चढउतारावर व ज्या त्या वस्तूंच्या उत्पादनक्षमतेवर अवलंबून आहे हें आपण पाहिलें. हेंच थोडें निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे एखाद्या वस्तूची जशी मागणी जास्त व पुरवठा कमी, तसा त्या वस्तूवरील कराचा बोजा उपभोक्त्यावर पडतो. याउलट परिस्थितींत अशा कराचा बोजा त्या वस्तूंचा व्यापार करणाऱ्या-वर पडतो. आणि मागणी व पुरवठा समसमान असेल तर कराचा बोजाहि ग्राहक आणि विक्रेता या दोन्ही पक्षांत सम प्रमाणांत विभागला जातो. थोडक्यांत म्हणजे कराचा बोजा मागणी-पुरवठ्याच्या व्यस्त प्रमाणांत ग्राहकांवर वा विक्रेत्यांवर पडतो. हा नियम फक्त अंतर्गत व्यापाराबाबतच खरा आहे असें नसून परदेशीय व्यापारा-लाहि हा तंतोतंत लागू पडतो. फरक एवढाच कीं, एतद्देशीय व्यापारांत वस्तूंची मागणी व पैशाचा पुरवठा यांवर कोणीं कर भरावा हें ठरतें, तर परदेशीय व्यापाराचे बाबतींत एका देशांतील एखाद्या वस्तूची दुसऱ्या देशाची मागणी, यावर ज्या त्या वस्तूवरील आयात वा निर्यातकर कोणत्या देशानें भरावयाचा हें ठरतें. समजा, हिंदुस्थानांतील गोणपाटास अमेरिकेची भरमसाट मागणी असेल व त्याच्या बदला हिंदुस्थानची अमेरिकन मोटारगाड्यांची मागणी तितकीशी जोराची नसेल, तर गोणपाटावरील निर्यातकर अमेरिकन लोक भरतील व ह्या उलट अमेरिकन मोटारगाड्यांवर अमेरिकन सरकार निर्यातकर तर लादणार नाहींच, पण हिंदुस्थानसरकारनें त्यावर लादलेला आयातकरहि हिंदी लोकांस भरावा लागूं नये म्हणून अमेरिकन कारखानदार मोटारीच्या मूळ किंमतींत कपात करतील.

अमेरिकन कारखानदार तसें न करतील तर त्यांच्या मोटारगाड्यांस हिंदी लोकांची मागणी कमी होईल, व त्यांना तर गोणपाटाची अत्यंत जरूरी; मग त्या बदला किंमती कमी करूनहि ते मोटारगाड्या हिंदुस्थानांत पाठवतील. याउलट इजिप्तच्या कापसाचें उदाहरण घेऊं. लांब धाग्याचा कापूस मोठ्या प्रमाणांत उत्पादन करणारा इजिप्त हाच एक मोठा देश आहे. त्या कापसाची तर हिंदुस्थानला फार गरज, तेव्हां त्यावर जर इजिप्शियन सरकारनें निर्यातकर लादला, तर तो हिंदी कापडगिरणीवाल्यांना द्यावा लागणार व त्या उलट हिंदी कापडास इजिप्तची मागणी त्या प्रमाणांत नसल्यानें, हिंदी कापडावरील निर्यातकर हिंदी गिरणी-वाल्यांस भरावा लागणार.

यावरून निर्यातकर परदेशीय रहिवाशांस भरावा लागतो, व अशा रीतीनें आपल्या सुखाकरितां असेच कर लादणें हें युक्तियुक्त, ही सामान्य समजूत चुकीची आहे, हें दिसून येईल. निर्यातकर कोणत्या देशानें भरावयाचा हें ज्या त्या वस्तूच्या संबंधीं देशांतील मागणी-पुरवठ्याच्या व्यस्त प्रमाणावर अवलंबून आहे.

**९. विशिष्ट परिस्थितींतील अप्रत्यक्ष करांचा बोजा**—अप्रत्यक्ष करांचा बोजा व्यक्तीच्या उत्पन्नाच्या प्रमाणावर अवलंबून नसल्यानें असे कर प्रतिगामी होत असें आपण वर म्हटलेंच आहे. त्यांतच आणखी कांहीं विशिष्ट परिस्थितीमुळें अशा करांचा बोजा श्रीमंतांपेक्षां कमी प्राप्तीच्या लोकांवर जादा पडतो. उदाहरण म्हणून आपण साखरेचें घेऊं. पुणें शहरासारख्या मोठ्या शहरांत या वस्तूची मागणी पुष्कळ व त्यामुळें विक्रेतेहि पुष्कळ. जो तो आपली या बाबतींतील उलाढाल जास्त व्हावी म्हणून साखर जितक्या कमी किंमतींत विकतां येईल तेवढ्या किंमतींत विकण्याचा प्रयत्न करील. कारण, अशानें प्रत्येक पोत्यामागें जरी नफा कमी मिळाला तरी जादा पोत्यांची विक्री झाल्यानें, त्या व्यापाऱ्याचा एकंदर नफा जादा होईल. तेव्हां अशा घाऊक विक्रेत्यांकडून साखर विकत घेण्यानें ग्राहकांचाहि फायदा होईल. पण घाऊक विक्रेता सहसा पोतें, अर्धे पोतें यापेक्षां कमी साखर विकणार नाहीं. तो किरकोळ विक्रीत बसला तर त्यास त्या प्रमाणांत अधिक नौकरवर्ग ठेवावा लागेल, व अशानें त्याचा खर्च वाढेल व मग त्यास कमी किंमतींत साखर विकणें परवडणार नाहीं. पोतें किंवा अर्धें पोतें साखर विकत घेणें फक्त सधन वर्गासच परवडेल. ज्यांची महिन्याची

प्राप्ति जेमतेम महिन्याचा खर्च भागविण्याइतपत असेल, ते अर्थातच अशी घाऊक खरेदी करूं शकणार नाहींत. तेव्हां अशा कमी प्राप्तीच्या वर्गाकडून किरकोळ विक्रेता जादा भाव घेऊं शकतो. यापेक्षांहि जादा भाव खेडेगांवांतील व्यापारी ग्राहकांकडून घेऊं शकतो. एक तर खेडेगांव शहरापासून दूर असल्यानें, ज्यांचें शहराकडे जाणें येणें कमी, अशा लोकांस खेडेगांवांतील व्यापाऱ्यांपासूनच साखर खरेदी करणें भाग पडतें. खेडेगांवांत कोणत्याहि वस्तूची एकंदर उलाढालच कमी असल्यानें त्या व्यापाऱ्यास आपल्या पोटापुरतें उत्पन्न मिळवावयाचें म्हणजे ज्या त्या वस्तूवरील उत्पादनकर, विक्रीकर हे सर्वंधच्या सबंध वसूल करून आणखी शहरांतील व्यापाऱ्यापेक्षांहि नफ्याचें प्रमाण जादा ठेवावें लागतें व असे जादा दर खेडेगांवांतील कमी प्राप्तीचा ग्राहक देतो. शहरांत उलाढालच जास्त होत असल्यानें वेळप्रसंगीं करांचा कांहीं बोजा व्यापारी स्वतःहि सहन करतो.

ज्यांना रोख पैसे देऊन जिनसा घेणें परवडत नाहीं, अशांवर तर त्यांचेकडे असलेल्या देणेंबाकीवर व्याज सुटेल अशा बेतानें, वस्तूंचे भाव आकारले जातात. तेव्हां ग्राहकांची जसजशी प्राप्ति कमी व वस्तूंची गरज जास्त तसतसा अप्रत्यक्ष कराचा बोजा त्यांचेवर जादा प्राप्तीवाल्यांपेक्षां जास्त पडतो.

आपण वर म्हटलेंच आहे कीं, मागणी-पुरवठ्याच्या व्यस्त प्रमाणावर कराचा बोजा उपभोक्ता ( Consumer ) अथवा ' उपभोग्य वस्तू पुरवणारा ' या दोन गटांपैकीं कोणीं भरावयाचा व किती भरावयाचा हें ठरतें. वरील विवेचनावरून यास पुष्टीच मिळते. एखाद्या वस्तूची मागणी जास्त व त्या प्रमाणांत पुरवठा कमी, असें झालें कीं, उपभोक्त्यांवर त्या वस्तूंवरील कराचा बोजा लादणें हें पुरवठा करणारांस शक्य होतें. याउलट मागणी कमी व पुरवठा जास्त झाला कीं, आपल्यावरील कराचा बोजा उपभोक्ता टाळूं शकतो, आणि तेंच मागणी व पुरवठा समसमान झाला कीं, दोघांसहि करांचा बोजा समसमान सोसावा लागतो. याप्रमाणें जणूं या दोन गटांत करभार कोणीं सोसावा याबाबत रस्सीखेंच चालू असते.

---

## प्रकरण ९ वें

# मक्तेदारींतील कर व आयातकर यांचा बोजा

**१. मक्तेदारींतदेखील करांचा बोजा मागणी-पुरवठ्याच्या व्यस्त प्रमाणावर**—जसें खुल्या व्यापाराचें तसेंच मक्तेदारी पद्धतींतील व्यापाराचें. मक्तेदारी पद्धतीनें व्यापार करण्यांतहि तो उत्पादन करणाऱ्या वस्तूंवरील कराचा बोजा त्या वस्तूंच्या मागणी-पुरवठ्याच्या व्यस्त प्रमाणावरच स्वतः किंवा ग्राहक यांपैकीं कोणीं सहन करावयाचा हें ठरलें जातें. आपल्या देशांत अशा तऱ्हेची मक्तेदारी पद्धति वस्तूंच्या उत्पादनाच्या बाबतींत फारशी नाहीं. तथापि विवेचन सुस्पष्ट करण्याच्या दृष्टीनें अशीं कांहीं उदाहरणें घेतां येतील. देशी दारूचें उत्पादन सरकार स्वतः मक्तेदारी पद्धतीनें करतें. तेव्हां त्यावरील उत्पादन-कर, विक्री-कर इत्यादि कर सरकार ग्राहकांकडून वसूल करूं शकतें. असें जरी असलें तरी या वस्तूंचें उत्पादन मोठया प्रमाणांत व सरसहा बेकायदा करण्याची प्रवृत्ति वाढूं नये, ही गोष्ट सतत डोळ्यापुढें ठेवूनच वरील कर किती असावेत हें सरकारास ठरवावें लागतें. असें उत्पादन होऊं नये म्हणून जो प्रतिबंधक नौकरवर्ग ठेवावयाचा तो 'आठ हात लांकूड व नऊ हात ढलपी' या वृत्तीनें ठेवून चालत नाहीं. कोणताहि कर आकारतांना त्यावरील वसुली खर्च साधारणतः २।३ टक्क्यांपेक्षां जास्त असूं नये, हें सर्वमान्य झालेलें आहे.

**२. जीवनावश्यक वस्तूंच्या मक्तेदारींत सर्व कर ग्राहकांवर**—जीवनावश्यक वस्तू जर मक्तेदारी पद्धतीनें एखादा कारखानदार उत्पादन करीत असेल, तर मात्र त्यांवरील सारे कर तो ग्राहकांवर लादूं शकेल. समजा, कापडाचें उत्पादन करण्याचा 'क्ष' गृहस्थास मक्ता दिलेला आहे. तो नेहमींच उत्पादन कमी ठेवून सारे कर ग्राहकांवर लादील. एवढेंच नव्हे तर, स्वतःहि भरमसाट प्रमाणांत नफा मिळवूं शकेल. पण निदान लोकशाही राज्यव्यवस्थेंत तरी अशा गोष्टी चालूं देणें कोणाहि सरकारास परवडणार नाहीं.

असें करूं देणें म्हणजे 'मूले कुठारः' या न्यायानें सरकारच्या अस्तित्वावरच घाला येईल. हुकुमशाही राष्ट्रांतदेखील अशी गोष्ट चालूं शकत नाहीं. हुकुमशाही झाली तरी समाजाच्या साऱ्याच थरांना असंतुष्ट करणारी गोष्ट चालू देऊन, ती टिकूं शकणार नाहीं.

कांहीं विशिष्ट परिस्थितीमुळें कांहीं सर्वसामान्य गरजांच्या वस्तूंचें उत्पादन मक्तेदारी पद्धतीनें केलें जातें. उदाहरणार्थ, पोलाद. हिंदुस्थानांत पोलादाचें उत्पादन करणारे फक्त दोनच कारखाने आहेत. एक 'टाटा' चा जमशेटपूरचा व दुसरा 'बेंगाल आयर्न अॅण्ड स्टील कंपनी' चा कलकत्त्याचा. दोन्ही कारखान्यांचें उत्पादन हिंदुस्थानच्या वाढत्या गरजा भागविणारें नाहीं, व परदेशांतूनहि या वस्तूंचें उत्पादन एवढ्या मोठ्या प्रमाणांत होत नाहीं कीं, ज्यायोगें तें आयात करून एतद्देशीय उत्पन्नाशीं स्पर्धा करूं शकेल. या स्थितींत अशा धंद्यास मक्तेदारी स्वरूप येतें. त्यामुळें या वस्तूंवर जर उत्पादनकर, विक्रीकर अशांसारखे कर असतील तर ते विक्रेता ग्राहकांकडून वसूल करूं शकतो. पण एकंदर उत्पादन लक्षांत घेऊन लायसेन्सफीसारखी कांहीं तरी रक्कम ठरविली, तर ती मात्र ग्राहकांकडून वसूल करणें शक्य होणार नाहीं.

**३. परवानाफीचा बोजा मक्तेदारावर**—मुंबई राज्यसरकार घोडयांच्या शर्यती चालविणाऱ्या क्लबाकडून-रॉयल इंडिया वेस्टर्न टर्फ क्लब-लायसेन्सफी म्हणून दरवर्षी १२।१५ लाख रुपये वसूल करतें. अर्थातच असा कर उपभोक्त्यांकडून वसूल करतां येत नाहीं. एकंदर उत्पन्नांतून तो द्यावा लागतो.

मक्तेदारानें आपल्या जिनसांची किंमत ठराविक रकमेपेक्षां जास्त ठेवूं नये म्हणून सरकार त्या वस्तूंच्या किंमती नियंत्रित करतें. अशा वेळीं उत्पादनकर, विक्रीकर यांसारखे कर वेगळे वसूल करण्याची मक्तेदारास परवानगी नसेल तर त्याला स्वतःला या करांचा बोजा सोसावा लागतो. अशा स्थितींत तो आपल्या वस्तूंचा दर्जा कमी करूं लागतो व दर्जावर नियंत्रण ठेवणें कठीण जातें. अलीकडे वस्तूंच्या दर्जावरहि नियंत्रणें ठेवण्याच्या शास्त्रांत बरीच प्रगति झाली आहे. अर्थात् कापड, अन्नधान्य, कीं ज्यांचा दर्जा प्रायः दृष्टिप्रमाणानें ठरवावा लागतो, त्या वस्तूंबाबत दर्जावर नियंत्रण ठेवणें बरेंचसें कठीणच. मात्र वीज, गॅस, पाणी या बाबतींतील किंमत-नियंत्रण पूर्णतः यशस्वी ठरतें, व मग अशांवरील लायसेन्स-

फीसारखे कर मक्तेदारांसच भरावे लागतात. या वस्तूंवरील बाकीच्या करांचा बोजा तशी परवानगी नसेल तर मक्तेदारांवरच पडतो.

**४. खुल्या व्यापारांत आयात मालावरील करांचा बोजा**—ह्याच सर्वसामान्य नियमान्वयें आयात मालावरील इतर करांचा बोजा एका गटावरून दुसऱ्या गटावर बदलण्यांत कसा होतो तें पाहूं.

ज्या देशांत खुल्या व्यापाराचें तत्त्व अंमलांत आणलेलें असतें, तेथें हा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. मागणी व पुरवठा या सर्वसामान्य तत्त्वानुसार वस्तूंच्या किंमती ठरतात. अशा स्थितींत चढाओढ फार असल्यानें ह्यावरील सारे कर बहुधा विक्रेत्यांसच भरावे लागतात. सायकलीचें उदाहरण घेऊं. आपल्या देशांत फार चांगल्या दर्जाच्या सायकली तयार होत नाहींत. त्यामुळें हा माल परदेशांतूनच इकडे येतो. खुल्या व्यापाराचें धोरण जर अमलांत आणलें तर अशा आयातीवर कर लादावयाचा नाहीं हें ओघानेंच येतें. परदेशी माल भरपूर आला, तर येथील सायकलधंदा बुडालाच, एवढेंच नव्हे तर, आयात भरपूर झाली तर चढाओढीनें त्यावरील नफ्याचें प्रमाण शक्य तितकें कमी ठेवलें जाईल व सारे एतद्देशीय करहि त्यांतूनच भरण्याचा विक्रेता प्रयत्न करील. ह्याउलट मागणीपेक्षां पुरवठा कमी झाला तर सर्व कर ग्राहकांस द्यावे लागतील.

**५. खुला व्यापार व आयातकर**—गेल्या शतकापर्यंत इंग्लंडनें खुल्या व्यापाराचें धोरण अवलंबिलें होतें. पण त्या देशास तशीच परिस्थिति अनुकूल होती. औद्योगिक क्रांतीस तेथेंच प्रथम सुरुवात झाली, त्यामुळें यांत्रिक साहाय्यानें मोठ्या प्रमाणावर मालाच्या उत्पादनांत तो देश फार काळ अग्रेसर राहूं शकला. जरी दुसऱ्या देशांनीं आपलें उत्पादन अशा तऱ्हेनें वाढविण्याचा प्रयत्न केला तरी प्रथमपासून इंग्लंडनें वस्तूंचें उत्पादन चांगल्या तऱ्हेनें करण्यांत कौशल्य मिळविलें असल्यानें व राजकीय दृष्ट्याहि जगांतील जवळजवळ साऱ्या बाजारपेठा काबीज केल्या असल्यानें तो देश सर्वांशीं खुल्या बाजारांत चढाओढ करूं शकला. किंबहुना खुल्या बाजाराच्या तत्त्वानें ज्या देशांतून कच्चा माल निर्यात होई, तेथेंहि निर्यात-कर नाहीं ( ही गोष्ट कच्च्या मालाचें उत्पादन करणाऱ्या देशावर इंग्लंडचें राजकीय वर्चस्व असल्यानें सहज साध्य असे ) व त्यावर आयातकरहि नाहीं, यामुळें तयार मालाचें उत्पादन स्वस्त पडे. त्याचा दर्जाहि चांगला असल्यानें व पुन्हां

बाजारपेठाहि स्वाधीन असल्यानें उत्पादित मालाचा उठाव ताबडतोब होई. सरकारला पैशाची जरूरच लागली तर असे कारखानदार मोठमोठीं कर्जें अल्प व्याजानें देत व प्रसंगीं प्राप्तिकरहि देण्याची त्यांची तयारी असे. या सर्व कारणांनीं तेथें असें धोरण फार काळ यशस्वी होऊं शकलें. पण कालांतरानें यांत बदल होत गेला. कच्चा माल उत्पन्न करणाऱ्या देशांत राजकीय जागृति होत गेली. तेथेंच कारखाने उभारले गेले. स्वदेशबांधवांच्या हितासाठीं कच्च्या मालावर निर्यातकर लादून पैसा सरकारनें उभारावा, अशा चळवळी यशस्वी होत गेल्या. त्यामुळें इंग्लंडनें आयात-कर लादावयाचा नाहीं असें ठरविलें, तर फ्रान्स-जर्मनीसारखे देश आपला तयार माल इंग्लंडची बाजारपेठ काबीज करण्याकरितां, तेथें तयार होणाऱ्या मालाच्या किंमतीपेक्षांहि कमी किंमती ठेवून व दर्जा तोच ठेवून माल जर तिकडे रवाना करूं लागतील तर अशानें इंग्लिश उद्योगधंदे बसण्याची पाळी येणार हें ओघानेंच आलें. तेव्हां इंग्लंडनेंहि तें धोरण सोडून दिलें. हल्लीं आयात-कर स्वदेशी उद्योगधंद्यास उत्तेजन देण्याकरितां सर्रास सर्व देशांत आकारले जातात. असें जरी असलें, तरी सर्वच जिनसा कांहीं आपल्या देशांत तयार होणें शक्य नसतें. परदेशांशीं व्यापार हा चालू ठेवावाच लागतो. समजा, आपल्या देशास अन्नधान्याची अत्यंत आवश्यकता आहे; व आपल्या देशांत घड्याळें, फाउन्टनपेन्स, गालीचे, कंगवे अशा वस्तूंचें फारसें उत्पादन करणें अनेक कारणांनीं अशक्य झालें तर अशा वस्तूंवर आयात-कर लादण्याची, स्वदेशी उद्योगधंद्यास उत्तेजन देण्याकरितां जरी जरूरी नसली तरी, अत्यावश्यक अशा अन्नधान्याच्या आयाती-करितां परदेशी हुंडणावळ राखून ठेवावी म्हणून आयातकर लादावे लागतात. आयातकरानें अशा वस्तू महाग होतात व त्यामुळें त्यांची मागणीहि कमी होते. पर्यायानें त्यावर परदेशीं जाणारा पैसा अन्नधान्याकरितां राखून ठेवणें शक्य होतें. आयात-कर लादतांना एकाच तऱ्हेच्या सर्व परदेशी मालांवर सारखाच कर आकारला जाईल असें वाटणें साहजिकच आहे. पण प्रत्येक देश स्वतःच्या सोयी-गैरसोयी पाहून, निरनिराळ्या देशांतील त्याच वस्तूंच्या बाबतींत निरनिराळ्या दरानें आयात-कर लादतो. हिंदुस्थान स्वतंत्र होण्यापूर्वी साम्राज्यांतील राष्ट्रघटकांच्या बाबतींत विशेष सवलतीचें धोरण ठेवलें गेलें होतें. तें राष्ट्र-गट-सवलत ( Empire preference ) या नांवानें ओळखलें जाई. त्याअनुसार

इंग्लंडच्या मालावर इतर देशांच्या त्याच तऱ्हेच्या मालावरील आयात-करापेक्षां कमी कर आकारला जाई. हल्लीं अशाच तऱ्हेची सवलत परस्परांस देण्यास राष्ट्र-कुलांतील ( Commonwealth ) देश बांधले गेले आहेत. इतरहि देशांबरोबरील व्यवहारांत अशा तऱ्हेचें धोरण एकमेकांच्या सोईप्रमाणें आंखलें जातें. पाकिस्तानांतून आयात होणाऱ्या व इकडून तिकडे जाणाऱ्या, कांहीं विशिष्ट वस्तूंवरील आयातीवर कर आकारला जाऊं नये, अशा तऱ्हेचा करार फेब्रुवारी १९५१ मध्यें केला गेला होता. आपणांस पाकिस्तानच्या कापूस, ताग या कच्च्या मालाची अत्यंत आवश्यकता व पाकिस्तानास कापड, कोळसा या वस्तूंची जरूरी असून दोन्ही देश अगदीं जवळजवळ, यामुळें परस्परांतील व्यापारवृद्धि व्हावी व दुसऱ्या देशांशीं चढाओढीचा प्रसंग येऊन, शेवटीं दोन्ही देशांस त्याची झळ लागूं नये या हेतूनें असा करार केला होता.

**६. आयातकरांचा बोजा मागणी-पुरवठ्यावर अवलंबून—** वरील विवेचनावरून आयातकरामुळें प्रत्येक वस्तूवरील कराचा बोजा विक्रेता किंवा ग्राहक यांपैकीं एकाच गटावर पडतो असें होत नाहीं, हें दिसून आलें. आयातकराच्या बाबतींत निरनिराळ्या देशांकरितां निरनिराळें धोरण आंखलें जातें. तसेंच स्वदेशी धंद्यास उत्तेजन देण्याकरितां एखाद्या वस्तूच्या बाबतींतहि वेगळें धोरण आंखलें जातें. तथापि मागणी व पुरवठा या सर्वसामान्य नियमानुसारच कराचा बोजा कोणीं उचलावा हें ठरलें जातें. इंग्लिश मेकच्या मोटारगाड्या अमेरिकन गाड्यांपेक्षां थोड्या स्वस्त पडतात. कारण, डॉलरशीं तुलना केली असतां रुपयाची किंमत सप्टेंबर १९४९ पासून कमी केली गेली आहे. पण पौंड व रुपया यांची किंमत मात्र एकमेकांच्या संबंधांच्या बाबतींत पूर्वीचीच ठेवली आहे. तेव्हां इंग्लिश गाड्या स्वस्त पडत असल्यानें त्यांवरील आयातकर, विक्री-कर, म्युनिसिपल जकात आदि कर ग्राहकांस भरावे लागतील. पण तेंच अमेरिकन गाड्या येथें खपविण्याची जर अमेरिकन कारखानदारांस जरूरी वाटली, तर त्याची मूळ किंमत कमी करून येथील त्यांच्या विक्रेत्यास जादा कमिशन देऊन त्यांचा येथील खप वाढविला जाईल. येथील विक्रेताहि त्याला जादा कमिशन मिळत असल्यानें, त्यावरील आयातकर आदि कर कांहीं प्रमाणांत स्वतः सोशील. अर्थात् हा प्रश्न हल्लीं उपस्थितच होत नाहीं. कारण अमेरिकन कारखानदारी

युद्धोपयोगी माल उत्पादन करण्यांत गुंतविली गेली असल्यानें शांततेच्या काळांत हवें असलेलें उत्पादन करण्याची व तें केलेंच तर चढाओढीच्या दरांत विकण्याची जरूरी तिला भासत नाहीं. युद्धजन्य परिस्थितींतील अर्थव्यवस्था हा एक स्वतंत्रच प्रश्न आहे. शांततेच्या काळांतील अर्थव्यवस्था कोणत्या सर्वसामान्य तत्त्वानुसार आंखली जाते, याचें विवेचन झाल्यावर त्याचा थोडया विस्तारानें विचार करूं.

**७. जबर आयातकरानें परदेशी व्यापारी दुसऱ्या बाजारपेठा शोधतात**—आयातकरामुळें परदेशी गाड्या जर महाग पडूं लागल्या तर स्वदेशी गाड्यांचें उत्पादन वाढविण्याचा येथील कारखानदार प्रयत्न करूं लागतील. असें उत्पादन वाढूं लागलें असें दिसूं लागलें तर परदेशी कारखानदार आपल्या मालाची बाजारपेठ कमी होऊं नये म्हणून चढाओढीनें माल खपविण्याकरितां आपल्या मालाची किंमत, धंदा तोट्यांत पडूं नये एवढ्याच दृष्टीनें जेवढी कमी ठेवतां येईल तेवढी ठेवतील. पण असें झालें, तर अशा धंद्यांत आणखी पैसा गुंतविणें भागीदारांस फायदेशीर वाटणार नाहीं. एवढेंच नव्हे तर, तो पैसा दुसऱ्या एखाद्या धंद्यांत गुंतवावासा वाटेल. परंतु दुसऱ्या धंद्याची पुरेपूर माहिती नसल्यानें व त्यांतहि भरपूर नफा होईल अशी आगाऊ खात्री पटत नसल्यानें ही गोष्ट नेहमींच शक्य होते असें नाहीं. त्यामुळें माहिती असलेला सैतान पुरवला, पण आगंतुक सैतान नको, या लोकोक्तीप्रमाणें चालू धंद्यांतील भांडवल कमी करून दुसऱ्या एखाद्या धंद्यांत गुंतविण्यापेक्षां, दुसरी बाजारपेठ काबीज करण्याकडे कारखानदारांचा कल होतो. बरें, जगांतील मोठा भाग अद्यापि मध्ययुगीन परिस्थितींत आहे. यावरून जगांत विकासास आणखी कित्येक शतकें वाव आहे यांत संदेह वाटत नाहीं. असें जरी असलें तरी नवीन पैसा अशा धंद्यांत देणें कांहीं काळ थांबेल यांत शंका नाहीं. त्या पैशाचा ओघ दुसरीकडे वळेल.

यावरून करपद्धतीचा परिणाम, माल पुरविणारा व त्याचा उपभोग घेणारा या दोन गटांपैकीं कोणीं कर भरावयाचा, एवढ्याचपुरता मर्यादित नसून त्याचा परिणाम प्रत्यक्ष उत्पादनाच्या परिमाणावरहि होतो, हें दिसून येईल. या व इतर परिणामांचें विवेचन पुढील प्रकरणांत करूं.

## प्रकरण १० वें

# करांचे परिणाम

**१. जबर कराचे परिणाम—(अ) भांडवलाचें पलायन—** मागील प्रकरणांत आपण पाहिलें कीं, अमेरिकन गाड्यांवर जर हिंदुस्थाननें आयातकर लादला तर अमेरिकन कारखानदार हिंदची बाजार-पेठ कायम ठेवावयाची तर आपल्या गाड्यांची किंमत कमी करतील. आतां आपण असें समजूं कीं, अमेरिकन सरकारनेंच स्वतःची सांपत्तिक स्थिति सुधारण्याकरितां मोटार-गाड्यांवर जबर उत्पादनकर लादला. याचा परिणाम अर्थातच गाड्यांची किंमत अधिक होण्यांत होणार. असें झालें कीं, मोटारगाडी ही कांहीं अत्यावश्यक अशी वस्तु नसल्यानें, त्यांची मागणी कमी होणार; मागणी कमी झाली कीं, किंमत उतरवावी लागणार. किंमत उतरविली तर नफा फारच कमी होणार. या सर्वांचा परिणाम त्या धंद्यांत नवीन पैसा गुंतविण्याची इच्छा राहणार नाहीं, एवढेंच नव्हे तर, आहे तें भांडवलहि दुसऱ्या धंद्यांत गुंतविण्याचा प्रयत्न होणार. असें करणें हें नेहमींच फायद्याचें ठरतें असें नाहीं; त्यामुळें भांडवलाचा ओघ परदेशाकडे वळतो. परदेशीं भांडवल जाऊं लागलें तर त्यापासून स्वदेशांतील सामान्य माणसास जो फायदा मिळावयाचा त्याऐवजीं भांडवलदार अशा थोड्या व्यक्तींसच त्याचा फायदा मिळेल. अमेरिकेसारख्या अति सधन राष्ट्रास हें कदाचित् परवडेल पण आपल्यासारख्या दरिद्री देशास भांडवल परदेशीं जाणें हें पाठींत खंजीर खुपसल्यासारखेंच होईल. अशा रीतीनें भांडवल परदेशीं जाणें राष्ट्रीय हिताचें नाहीं, असें आढळून आल्यास, सरकार त्यावर नियंत्रण घालूं शकतें.

**(आ) मालाच्या दर्जांत अनिष्ट फरक, किंवा मालाची निर्यात—** भांडवल परदेशीं जाण्याऐवजीं कांहीं करांचा परिणाम भांडवलदारांस अति सधन करण्यांत होतो. हिंदुस्थानसरकारनें सन १९४८ सालीं सर्वच तऱ्हेच्या कापडावर उत्पादनकर बसविला. त्यामुळें कापड महाग झालें. कापड ही एक जीवनावश्यक

गोष्ट असल्यानें ती कितीहि महाग झाली तरी लोकांना घेणें भाग पडतें. पण महागाईच्या मानानें लोकांच्या हातांत चलन खेळतें नसलें कीं, आपल्या कापड वापरण्याच्या पद्धतींत शक्य तो बदल करून, प्रत्येकजण आपली कापडाची गरज कमी करतो. गरज कमी झाली कीं, त्या मानानें मागणी कमी, म्हणून भांडवलदारांस उत्पादनहि कमी करावें लागतें. उत्पादन कमी झालें कीं, एकंदर नफा कमी होतो. अशा स्थितींत मालाचा दर्जा कमी करून कमी किंमतीनें तो विकतो. यामुळें वस्तुतः त्यास जो नफा मिळावयाचा त्यापेक्षांहि त्याच्या नफ्याचें प्रमाण वाढतें. समजा, पूर्वी मालाचा दर्जा १०० असतांना त्याचा नफा शेंकडा ५ असला तर दर्जा १० टक्क्यांनीं कमी करून व किंमत ५ टक्क्यांनीं कमी करून, तो जादा नफा मिळवतो.

सरकारनें जर दर्जावर नियंत्रण बसविलें तर, असें नियंत्रण यशस्वी करणें हें एक फार कठीण काम असल्यानें व्यवहारांत त्याचा फारसा उपयोग होत नाहीं. 'दर्जा'वर लक्ष ठेवणें म्हणजे अगदीं सूतकताईपासून शेवटीं कापड तयार होईतों त्यावर डोळ्यांत तेल घालून लक्ष ठेवलें पाहिजे. असें करण्याकरितां माणसें किती लागणार व किती खर्च होणार! इतकेंहि करून नजर चुकवून किंवा प्रतिबंधक अधिकाऱ्यांस मलिदा चारून कापसांत किंवा सुतांत मिसळ केली, तर काय होणार? तेव्हां असलीं गुंतागुंतीचीं व व्यावहारिकदृष्ट्या कुचकामी नियंत्रणें ठेवून चालत नाहीं. अगदींच निकृष्ट दर्जाचें कापड उत्तम म्हणून विकलें जाऊं नये, याकरितां त्यांतील तज्ज्ञाकडे तें तपासणीस पाठविलें जातें व तो स्थूलमानानें त्याचा उत्कृष्ट–कनिष्ठ असा दर्जा ठरवितो. तात्पर्य, दर्जावर प्रभावी नियंत्रण ठेवणें ही एक कठीण गोष्ट आहे.

दुसरी एक गोष्ट कारखानदार करूं शकतो आणि ती म्हणजे येथें कापड खपत नाहीं तर पाठव पाकिस्तानांत. तेथें तें अगदींच दुर्मिळ असल्यानें त्यास भरपूर फायदा मिळतो. परदेशीं माल पाठविण्यावर जरी नियंत्रण बसविलें तरी पाकिस्तान-सारख्या अगदीं शेजारच्या देशांत सरहद्दीवरील जकात अधिकाऱ्यांची नजर चुकवून किंवा त्यांचे हात गरम करून व्यापारी लोक माल पाठवितात. हिंदुस्थान व पाकिस्तान यांची सरहद्द इतकी कृत्रिम व लांब आहे कीं, सरहद्दीवर सर्व ठिकाणीं नोकरवर्ग ठेवणें हें महा खर्चाचें काम. त्यामुळें माल गुपचूप पाठविणें शक्य होतें

अशानें सरकारास निर्यातकरहि मिळत नाहीं. तेव्हां कर आकारतांना अशी कोणतीहि फसवाफसवीची गोष्ट करण्याची सहजप्रवृत्ति उत्पादकांत किंवा विक्रेत्यांत सहसा होऊं नये, याचीहि दक्षता बाळगावी लागते. अर्थशास्त्रज्ञास मानसशास्त्राच्या ज्ञानाचीहि जोड जेव्हां मिळते, तेव्हांच तो तज्ज्ञ व यशस्वी अर्थमंत्रि होतो.

**( इ ) भांडवल व व्यापार परस्थळीं जाण्याचा धोका**—आपण वर कांहीं करांमुळें भांडवल परदेशीं जाऊं शकेल, हें पाहिलें. तसेंच एखाद्या प्रांतांतील कांहीं करामुळेंहि त्या प्रांतांतील भांडवल परप्रांतीं जाऊं शकेल. अशानें त्या प्रांतांतील धंदा कमी होईल, त्याबरोबरच तेथील व्यापारहि कमी होईल. मग अशा करानें प्रांतांतील प्रजेचें एकंदर सुख वाढण्याच्या ऐवजीं तें कमीच होईल. मुंबईराज्यांत १ एप्रिल सन १९४८ पासून सोन्याचांदीच्या लगडी यांवरहि रुपयास अर्धा आण्याप्रमाणें विक्रीकर आकारला जाऊं लागला. मुंबईस सोन्याचांदीचा धंदा फार मोठ्या प्रमाणावर चालतो. तेथील बाजार हिंदमध्यें प्रमुखपैकीं आहे. बरें हा धंदा शेंकडा ४–८ आणे नफ्यावर होतो. अशा वस्तूंवर जर शेंकडा रु. ३ आ. २ कर आकारला जाऊं लागला तर साहजिकच येथील हा धंदा बंद होऊन जेथें असा कर नाहीं, अशा मध्यप्रदेशांत हा धंदा जाईल. त्यामुळें मुंबईराज्यांतील कित्येक व्यापाऱ्यांचें नुकसान होईल. एवढेंच नव्हे तर कांहीं कालानें हा धंदा अजिबात बसल्यानें मुंबईसरकारास कांहींच विक्रीकर मिळणार नाहीं. हा अनुभव घेऊन मुंबईसरकारनें हा कर १–११–४८ पासून म्हणजे अवघ्या ७ महिन्यांत शेंकडा रु. ३ आ. २ पासून शें. ४ आणेपर्यंत कमी केला.

अशाच तऱ्हेचा परिणाम म्युनिसिपल करांमुळें होतो. म्युनिसिपालिट्यांचें जकातीचें उत्पन्न मोठें असतें. आतां हीच जकात कारखान्यास लागणाऱ्या कच्च्या मालावर जर आकारली जाऊं लागली तर म्युनिसिपल हद्दींत धंदा काढण्यापेक्षां त्या हद्दीबाहेर असा धंदा काढण्याची प्रवृत्ति होईल. पण मोठ्या शहरांत पाणी व वीज यांसारख्या कारखान्यास लागणाऱ्या अत्यावश्यक गोष्टी भरपूर प्रमाणांत व स्वस्त मिळत असल्यामुळें जकात भरूनहि असे कारखाने म्युनिसिपल हद्दींत काढले जातात. आतां दुसऱ्या एखाद्या शहरांत वीज, पाणी मिळूनहि आयात केलेल्या कच्च्या मालावर जकातीची माफी मिळाली, तर साहजिकच

कारखानदार त्या शहरांत कारखाना काढण्यास उद्युक्त होईल. कारखान्यांमुळें अशा शहरांची भरभराट होण्यास फार मदत होते. कारखान्यांत नोकरी मिळते. त्यामुळें नागरिकांच्या हातांत खेळता पैसा राहातो. त्यांच्या गरजा भागविण्याकरितां इतर व्यापार वाढतो. त्यावरील करांमुळें म्युनिसिपालिटीस कराचें उत्पन्नहि भरपूर मिळतें, व मग एकंदर शहरच पुढें येतें. अशा रीतीनें शहाणपणानें म्युनिसिपल कारभार हांकणारा, "आवळा देऊन कोहळा" काढूं शकतो. व तेंहि कोणास तशी नुसती कल्पनाहि येऊं न देतां. हिंदमध्यें संस्थानें विलीन होण्यापूर्वी भोर येथील राजानें कारखानदारांस अशा व इतर कांहीं सवलती दिल्या, त्यामुळें भोर हें एक कारखानदारीचें शहर बनलें गेलें आहे.

**२. अदूरदृष्टीनें लादलेल्या करांचा परिणाम**—सारासार विचार व दूरदृष्टि न ठेवतां जर कांहीं कर आकारले गेले तर मात्र त्यांचा फारच अनिष्ट परिणाम होतो. मुंबईराज्यांत १९४९-५० सालीं प्रथम वृत्त-पत्रीय जाहिरातींवर कर लादला गेला. वृत्त-पत्राचा धंदा हिंदमध्यें अद्याप बाल्यावस्थेंत आहे. मुंबई राज्यांत अगदीं बोटांवर मोजण्याइतकीं टाईम्स, केसरी, सकाळ हीं वृत्तपत्रें सोडलीं तर बाकीच्यांची प्रकृति अगदींच तोळामासा आहे. त्या धंद्यांत असणाऱ्या माणसांना सरकारी कचेरींतल्या शिपायांइतका तरी पगार मिळतो कीं नाहीं याची शंका. जाहिरातींचें उत्पन्नहि बेताचें. लोकांनीं जाहिराती द्याव्यात म्हणून छापलेल्या दरांपेक्षांहि कमी रक्कम घेण्याची तयारी. तशांत उधारी. यामुळें सबंधच्या सबंध पैसा बुडण्याची भीति. पण कर मात्र चुकणार नाहीं. अशा या धंद्यावर जाहिरातकर असणें म्हणजे दुष्काळांत तेरावा महिनाच. बरें, वृत्तपत्रीय व्यवसायच असूं नये असें कोणी म्हणणार नाहीं. सरकार स्वतःच अशा वृत्तपत्रीय व्यवसायाची महती गातें व तें योग्यहि आहे. लोकशिक्षणाचें अगदीं जरुरीचें काम, एक आण्यांत मिळणाऱ्या वृत्तपत्राशिवाय इतकें स्वस्त व सहजासहजीं दुसरें कोण करूं शकेल? ह्या सर्व गोष्टी जाणून सरकारनें हा कर सन १९५१-५२ पासून कमी केला आहे; केला म्हणण्यापेक्षां हिंदच्या घटनाकायद्यान्वयें तो कमी करावा लागला आहे.

**३. डॉ. डाल्टनचे तीन मुद्दे**—ब्रिटनचे भूतपूर्व अर्थमंत्रि डॉ. डाल्टन यांनीं आपल्या सरकारी अर्थव्यवस्था ( Public Finance ) या पुस्तकांत

करपद्धतीचा परिणाम समाजाच्या एकंदर उत्पादनक्षमतेवर कसा होतो, याचें विवेचन करतांना खालील तीन दृष्टींनीं विचार केला आहे.

( १ ) व्यक्तीव्यक्तीची काम करण्याची व संचय करण्याची कुवत यांवर होणारा परिणाम.

( २ ) काम करण्याची व संचय करण्याची इच्छा यांवरील परिणाम.

( ३ ) समाजांतील आर्थिक साधनांची निरनिराळ्या धंद्यांत व निरनिराळ्या ठिकाणीं होणारी विभागणी यावर होणारा परिणाम.

या प्रकरणाच्या प्रथमारंभीं आयातकरांचा किंवा उत्पादनकरांचा परिणाम एका धंद्यांतील भांडवलाचा ओघ दुसऱ्या धंद्याकडे जाण्यांत किंवा विक्रीकराचा व म्युनिसिपल करांचा परिणाम एका ठिकाणाहून एखादा धंदा दुसऱ्या ठिकाणीं हालविण्यांत होतो, हें दर्शविलें आहे. आणि हाच डाल्टनसाहेबांचा तिसरा मुद्दा. कराच्या कसोट्यांचें विवेचन करतांना आपण पाहिलें कीं, लोकांच्या काम करण्याच्या व संचय करण्याच्या सहजप्रवृत्तीस मारक असे कर असूं नयेत आणि हाच डाल्टनसाहेबांचा दुसरा मुद्दा. ह्यांतील ‘सहजप्रवृत्ति’ किंवा ‘इच्छा’ ( Desire ) ह्या शब्दांवरुन अर्थशास्त्रज्ञास मानवी स्वभावाचीहि किती दखल घ्यावी लागते, हें दिसून येईल. पण मानवी स्वभाव हा एक ब्रह्मघोटाळा आहे. ब्रह्माचा शोध लावण्याचा प्राचीन व अर्वाचीन सर्व विचारवंतांनीं आटोकाट प्रयत्न केला आहे. पण अद्याप कोणासच तसा शोध लागलेला नाहीं. प्राचीन ऋषी-मुनींनीं ‘नेति, नेति’ म्हणजे जें असें नाहीं किंवा ज्याचें वर्णन करतांना शब्दसंभार तोकडा पडतो व जेथें वाचाच कुंठते, व अशी वाचा कुंठित झाल्यावर जेव्हां मनानेंच ज्याचें चिंतन करणें हें अतिश्रेष्ठ ज्ञात्यास शक्य होतें, अशा नकारात्मक भाषेंत ज्या ब्रह्माचें वर्णन केलेलें आहे, त्यापुढें कोणास अद्याप जातां आलेलें नाहीं. तसाच कांहींसा प्रकार ह्या मानवी स्वभावाबाबत झालेला आहे.

हल्लीं मानसशास्त्राच्या अभ्यासांत बरीच प्रगति झालेली आहे. पण मानवी स्वभावाची गुंतागुंत अद्याप कोणासहि पूर्णपणें उकलूं शकलेली नाहीं. व्यक्ति तितक्या प्रकृति. प्रत्येकाचा स्वभाव निरनिराळा. प्रत्येकजण जन्मतःच कांहीं मूळ प्रकृति घेऊन आलेला असतो. सर्वसामान्यरीत्या मनुष्यस्वभावाचें वर्गीकरण

करतां आलें तरी कांहीं कांहीं वेळेला आपल्या चांगल्या परिचयांतला मनुष्य विशिष्ट तऱ्हेनें कां वागतो हें सांगणें मानसशास्त्रज्ञांसहि कठीण असतें. निष्कारण दुसऱ्याचें नुकसान करणारांची जात कोणती? ‘ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे।” या भर्तृहरीच्या प्रश्नाचें उत्तर अद्यापिहि कोणी मानसशास्त्रज्ञ देऊं शकला नाहीं. मानवी स्वभाव हें एक न उलगडणारें कोडें आहे, असें जरी असलें तरी अर्थशास्त्रज्ञाला इतक्या खोल पाण्यांत शिरण्याची जरूरी नाहीं. सर्व-सामान्य प्रवृत्ति तो जाणूं शकला म्हणजे पुरें. प्राप्तिकराचे दर ठरवितांना मनुष्या-मनुष्यांतील आर्थिक विषमता कमी करण्याच्या उदार प्रवृत्तीनें प्रवृत्त होऊन ठराविक रकमेचे पुढील सर्वच्या सर्व उत्पन्न कर म्हणून सरकारी तिजोरींत जमा करण्याचा मोह तो टाळूं शकला म्हणजे बस्स. कारण असें केलें नाहीं तर त्या मर्यादेपुढें उत्पन्न जावें म्हणून कोणीहि कधींच धडपडणार नाहीं; याकरितां रुपयांत पंधरा आण्यांपर्यंत कर आकारला तरी हरकत नाहीं; पण एक रुपया मिळविल्यावर त्याचेजवळ एक आणा तरी राहिला पाहिजे, एवढी दक्षता करपद्धतींत बाळगावी लागते.

**४. मानवी स्वभाव : काम करण्याची व संचय करण्याची प्रवृत्ति**—आतां असा मुद्दा उपस्थित होतो कीं, एक आण्याकरितां माणूस धडपड करील का? सर्व सामान्यरीत्या बोलावयाचें झाल्यास, तो तशी धडपड करील, असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण आपण जो रुपया मिळवूं त्यांतील पंधरा आणे सरकार वेऊन जाणार आहे, मग धडपड कशाला, या भावनेनें कोणी काम करीत नाहीं. मीं इतका पैसा मिळविला, इतका कर भरतों, यांतच सर्वसामान्य माणसास मोठेपणा वाटतो. “ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी” या गीतोक्तीप्रमाणें “मी मोठा, मी भोगी, मी सर्वसिद्ध, मी बलवान्, मी सुखी,” असें वाटून घेण्यांतच प्रत्येकजण सुख मानतो. शेजाऱ्याकडे रेडिओसेट असेल तर, मी शक्य झालें नाहीं तरी हप्त्याहप्त्यानें कां होईना तो विकत आणून मनाला समाधान मानून घेईन, मग कर्ज झालें तरी बेहत्तर, अशीच सर्वसामान्य मनुष्यप्रवृत्ति असते. डॉल्टनसाहेबांनींहि त्यांच्या एका उद्योगपतिमित्रानें ‘जर प्रत्येक कामगार फर्निचर व रेडिओसेटकरितां कर्जांत असेल तर तो वक्तशीर येईल व जास्त काम करील,’ असें म्हटल्याची आपल्या पुस्तकांत नोंद केली

आहे.[१] तेव्हां कर जादा असल्यानें माणसाची काम करण्याची प्रवृत्ति कमी होईल असें मानणें चुकीचें होईल. प्रत्येक करवाढीच्या वेळीं सध्यांचा कराचा बोजा असह्य असतांना जादा करवाढ करणें हें राक्षसी वृत्तीचें आहे, असें सर्वसामान्य माणूसहि म्हणतांना दिसतो. पण त्याचा अर्थ एवढाच कीं, सर्वसामान्य माणसास सरकारी अर्थव्यवहाराची गुंतागुंत समजणें कठीण असतें. तो एवढेंच पहातो कीं, मी आतांपावेतों १०० रु. कर देत होतों, त्याऐवजीं मला आतां १०५ रु. द्यावे लागणार. परंतु हे जादा ५ रु. दिल्यानें सरकार त्याचा उपयोग एकंदर समाजाच्या सुखसोईकडे खर्च करील व मग मलाहि पर्यायानें जादा सुख मिळेल, एवढा विचार करण्याची दूरदृष्टि त्याच्याजवळ नसते. पण हेंच जेव्हां एखादा उद्योगपति किंवा अर्थशास्त्रज्ञ म्हणूं लागेल, तेव्हां हा स्वार्थी पक्षनिष्ठ प्रचार आहे असें समजण्यास हरकत नाहीं. अर्थात् जादा कर हे कर-कसोट्यांस उतरणारे असले पाहिजेत, व त्यांचा उपयोग खरोखरच लोककल्याणाकडे केला पाहिजे. तसा तो केला जातो कीं नाहीं, हें पाहाणें प्रत्येक सुज्ञ नागरिकाचें कर्तव्य आहे. येथें जादा कराचा परिणाम मनुष्याच्या काम करण्याच्या प्रवृत्तीवर 'मूले-कुठारः' या न्यायानें होईल कीं नाहीं, एवढाच विचार प्रस्तुत आहे.

आतां करांचा परिणाम मनुष्याच्या संचय-प्रवृत्तीवर कितपत होतो तें पाहूं. मनुष्याच्या प्राथमिक गरजा प्रथम भागविल्या गेल्या पाहिजेत. या गरजा भागून शिल्लक उरण्याइतकें जर जादा उत्पन्न एखाद्यास असेल तरच अशा माणसाच्या बाबतींत संचय करण्याचा प्रश्न उपस्थित होतो. हिंदमधील सर्वसाधारण गरीब स्थितींतल्या माणसाजवळदेखील थोडें किडूकमिडूक असतें. व याचें प्रमाण जसजसें उत्पन्न वाढेल तसतसें वाढत जातें. पैशाचा अशा तऱ्हेनें संचय होणें हें राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीनें निरर्थक होय. शिल्लक पैसा जेव्हां धंदे वाढविणें व नवीन धंदे काढणें यांकडे वापरला जाईल, तेव्हांच एकंदर राष्ट्रीय उत्पादन वाढून समाजाच्या सुखांत भर पडेल. एरवीं हा पैसा म्हणजे मृत माणसाच्या हातांतील पैशाप्रमाणेंच होय. ही

[१] 'If every workman was £ 100 in debt in furniture and a wireless set and a motor-cycle, there would be far better time-keeping and much higher output.' (Dalton's principles of Public Finance).

हिंदमधील माणसाची जडजवाहिरांत पैसा गुंतवण्याची प्रवृत्ति त्याच्या राष्ट्रीय प्रवृत्तीस आवाहन करणाऱ्या सतत प्रचारानें व त्या पैशाचा त्याच्या सुखवृद्धीकडे उपयोग होतो, हें सोदाहरण दाखविल्यानें कमी होईल. जगांतील इतर देशांत अशी प्रवृत्ति आपल्याकडे ज्या प्रमाणांत आहे त्या प्रमाणांत दिसत नाहीं. यावरून ही मानवी स्वभावांतील मूलप्रवृत्ति आहे, असें मानण्याचें कारण नाहीं व म्हणूनच ती वरील उपायांनें निश्चित बदलेल असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. स्वतांचें शरीर भूषविण्याची सहजप्रवृत्ति सर्वांत दिसून येते, व तेवढ्या गरजे-इतपतच सोन्याचांदीचा उपयोग केला जाईल, उगाच सांठवून ठेवण्याकडे प्रवृत्ति होणार नाहीं, असें होण्यास योग्य वातावरण मात्र निर्माण केलें पाहिजे.

मानसशास्त्रदृष्ट्याच पहावयाचें झाल्यास कर आकारल्यानें जशी मनुष्याची काम करण्याची प्रवृत्ति मारली जात नाहीं, हें आपण वर पाहिलें तशी त्याची संचय करण्याची प्रवृत्तीहि मारली जाणार नाहीं, हें उघड आहे. मात्र कराच्या बोज्यानें त्याची संचय करण्याची कुवतच मारली गेली न पाहिजे, किंवा सरकारी धोरणच असें असावें कीं, संचय करण्यांत कांहीं अर्थ आहे असें मनुष्यास वाटूं नये.

**५. कम्युनिस्टप्रणीत समाजरचनेंत संचय करण्याची प्रवृत्ति जोपासली जात नाहीं**—कम्युनिस्टप्रणीत समाजरचनेंत आपत्कालाकरितां किंवा आपल्या मुलांबाळांकरितां कांहीं संचय करण्याची प्रवृत्तीहि असण्याचें कारणच उरत नाहीं. सरकारच ह्या सर्व जबाबदाऱ्या उचलण्यास पुढें येतें. अशा स्थितींत हातीं आलेला सर्वच पैसा खर्च होण्याची प्रवृत्ति होणें साहाजिकच आहे. पैसा खर्च होणार म्हणजे वस्तूंची मागणी वाढत जाणार व वस्तूंचा पुरवठा मागणीच्या प्रमाणांत नसला कीं, किंमती वाढणार. जीवनावश्यक वस्तूंच्या किंमतींत वाढ झाली कीं, सामान्य जनतेचे हाल वाढत जाणार. याकरितां अन्न, धान्य, कपडा वगैरे जिनसा वांटपपद्धतीनें पुरवाव्या लागतात. या सर्व गोष्टी केल्या तरी जादा उत्पन्न असणाऱ्यास अर्थातच निरनिराळ्या जिनसा विकत घेण्याची कुवत रहाणार, व त्या प्रमाणांत समाजाच्या निरनिराळ्या थरांत विषमता वाढत जाणार. त्यामुळें व्यक्तीव्यक्तींत असंतोष निर्माण होतो. ही गोष्ट तर टाळण्याचें अशा समाजरचनेचें मूळ उद्दिष्ट असतें. ती टाळण्याकरितां असें सरकार जादा उत्पन्नावर वाढत्या प्रमाणांत कर लादतें, त्यास तें गरजेपेक्षां जादा उत्पन्ना-

वरील कर असें नांव देतें ( Budget Surplus Tax ). या सर्व विवेचनावरून तेथें संचय करण्याची वृत्ति मारली जाते हें उघड होईल. अशी वृत्ति मारली जाणें हें सामाजिक धारणेस पोषक नसतें. संचय करण्याची प्रवृत्ति असली कीं, खर्चावर निर्बंध आपोआप येतो. अशा निर्बंधाचा परिणाम मनुष्याच्या एकंदर वागणुकीवर निर्बंध येण्यांत होतो. असें झालें कीं, सरकारला कम्युनिस्ट सरकार-सारखें हुकूमशाही राज्य करण्याची जरूरी भासत नाहीं. लोकशाही सरकार मनुष्याच्या मूलप्रवृत्ति जोपासून जरूरीइतपत नियंत्रण ठेवून राज्य चालवूं शकतें. कम्युनिस्ट सरकारास मनुष्याच्या हरघडीं होणाऱ्या हालचालींवर निर्बंध ठेवून राज्य करावें लागतें. त्यामुळें " एकमेकां साह्य करूं अवघे धरूं सुपंथ" ही समाज-धारणेची भूमिका सुटत जाते व मोटेला जुंपलेल्या बैलांचे एकमेकांशीं असलेल्या सहकार्याचें स्वरूप कम्युनिस्ट-प्रणीत समाजास येतें.

**६. संचयवृत्ति जोपासण्यासाठीं दिलेल्या सवलती**—लोकशाही सरकार लोकांत संचयवृत्ति वाढविण्याकरितां शिल्लक ठेवलेल्या रकमेवरील उत्पन्नावर ( व्याजावर ) कर न आकारण्याचें आश्वासन देतें. अशा प्रकारचें आश्वासन हिंदसरकारनें राष्ट्रीय बचतयोजनेच्या ( National Savings Scheme ) बाबतींत दिलेलें आहे. या योजनेच्या अन्वयें ठेवलेल्या शिलकेवरील व्याजावर सरकार प्राप्तिकर आकारत नाहीं. हा कर वांचविण्याच्या लालसेनें चांगले सधन लोकदेखील या योजनेंत पैसा गुंतवीत आहेत. अशा गुंतविलेल्या पैशाचा विनियोग सरकार राष्ट्रोद्धारक योजनेकडे करूं शकतें. अर्थात् यामुळें सरकारचें प्राप्तिकराचें उत्पन्न बुडतें. पण एरवीं हा पैसा कसातरी खर्चून गेला असता, त्याचा उपयोग चांगल्या कार्याकडे होतो; म्हणून सरकार अशी झीज सोसण्यास तयार होतें. पण अशी सवलत देतांना व्यवहारी दृष्टि मात्र हवी. नाहींतर श्रीमंतांना श्रीमंत करण्यांतच या सवलतीचा परिणाम होण्याचा संभव. कसें तें पहा. कमी उत्पन्नवाले अशा शिल्लक ठेवलेल्या रकमेच्या शेंदोनशें रुपये व्याजावरील ५।१० रुपये प्राप्तिकर वांचविण्याच्या उद्देशानें, अशा योजनेंत पैसा गुंतवितील असें समजणें खुळेपणाचें आहे. एकतर असा विचार करण्यास कोणास फुरसत नसते. फुरसत असलीं तर कुवत नसते व कुवत असली तरी होऊन होऊन फायदा किती होणार तर ५।१० रुपये. एवढ्याकरितां कोण

धडपडणार ? तेव्हां या योजनेचा खरा फायदा भांडवलवालेच लाटणार. ह्या उलट, अशी सवलत न देतां वार्षिक ५०००। रु. पर्यंत उत्पन्न असणाऱ्या लोकांनीं जर वार्षिक ५००। रु. या योजनेंत गुंतविले तर त्यांना प्राप्तिकर आकारला जाणार नाहीं असें आश्वासन दिलें गेलें, तर वार्षिक १००-१२५ रु. प्राप्तिकर वांचविण्याकरितां ५००। रु. अशा योजनेंत गुंतविणें त्यांना केव्हांहि श्रेयस्कर वाटेल, व अशा रीतीनें या वर्गाकडून एवढा पैसा गुंतविला गेला तर बरीच रक्कमहि सरकारास मिळेल. कोठेंतरी खर्च होणारा पैसा योग्य कारणीं खर्च होण्याकरितां सरकारकडे आकर्षिला जाईल. ज्या वर्गास अशा मदतीची जादा जरूरी आहे, त्यास ती मदतहि मिळेल. सध्यांचे योजनेनें जादा उत्पन्नवाल्यासच फायदा मिळतो तो मिळणार नाहीं. हा धनिक वर्ग कोठेंना कोठेंतरी पैसा गुंतवितोच व पर्यायानें सरकारास मिळतोच. तेव्हां अशी योजना आंखणें जास्त श्रेयस्कर होय.

जसें व्यक्तीचें तसेंच धंदेवाईक मंडळ्यांचें. कर आकारला म्हणून पैसा शिल्लक न ठेवतां, तो खर्च करण्याकडे प्रवृत्ति होईल, असें मानण्याचें कारण नाहीं. धंदा वाढावा अशीच सर्वसामान्य प्रवृत्ति असल्यानें, जादा उत्पादन करून, जादा पैसा मिळवून, लादलेले कर भागवून, जादा पैसा, तो धंदा वाढविण्यांत गुंतविला जाईल असें मानणेंच मनुष्यस्वभाव लक्षांत घेतां योग्य दिसतें.

**७. भांडवल-तरतुदीस अडथळा**—पुष्कळ वेळां असें म्हटलें जातें कीं, आलेला पैसा कर व खर्च यांत जिरून मग शिल्लक राहात नाहीं व त्यामुळें भांडवल जमा होण्यास ( Capital formation ) अडथळा निर्माण होतो. परंतु हें विधान तितकेंसें बरोबर नाहीं. पैसा खर्च होतो म्हणजे काय होतें ? त्या पैशाच्या मोबदल्यांत कांहींतरी जिनसांची खरेदी होते. ह्या जिनसा खपल्या म्हणजे त्या मोबदला आलेल्या पैशाचा विनियोग पुन्हां त्या जिनसा उत्पादन करण्याकडे होतो. म्हणजे असा खर्च केल्यानें नवीन भांडवलच निर्माण झालें. हा खर्च कांहीं वायां जात नाहीं. आतां जेव्हां असा माल परदेशांतून येतो, तेव्हां हा खर्च केलेला पैसाहि परदेशींच जाईल. असा माल स्वदेशांत निर्माण करून जरूर त्या धंद्याची जोपासना करण्याकरितां, अशा गोष्टींवर पैसा खर्च होणें सरकारास इष्ट वाटत नसेल, तर अशा गोष्टींच्या आयातीवरच निर्बंध

घातले पाहिजेत. पैसा वायफळ खर्च होतो, ह्या म्हणण्यांत अर्थ नाहीं. तसेंच समजा, आपणांस धान्योत्पादन वाढविण्यासाठीं अधिक पैशाची गरज आहे, तेव्हां अनावश्यक अशा छानछोकीच्या व चैनीच्या स्वदेशी वस्तूंवर खर्च होणाऱ्या पैशाचा ओघ संचय करण्याकडे वळवण्याची गरज आहे. अशा स्थितींतहि अशा वस्तूंच्या स्वदेशी उत्पादनावरदेखील नियंत्रण घालणें इष्टच ठरतें. तात्पर्य, पैसा व्यर्थ खर्च होतो, हें म्हणणें अज्ञानमूलक असून तो खर्च योग्य कारणीं झाला पाहिजे असें म्हणणें हें जास्त युक्तियुक्त आहे.

**८. कर भरण्याची कुवत**—येथपर्यंत आपण पाहिलें कीं, कराच्या बोज्यानें मनुष्याची काम करण्याची किंवा संचय करण्याची वृत्ति मारली जात नाहीं. पण ते जर प्रमाणाबाहेर लादले तर मात्र त्याची काम करण्याची व संचय करण्याची कुवत कमी होईल.

आतां कमींत कमी किती उत्पन्नापर्यंत कर लादला नाहीं म्हणजे मनुष्याची काम करण्याची व संचय करण्याची कुवत कमी होणार नाहीं, हें ठरवणें कठीण काम आहे. आहार व आरोग्य या शास्त्रांच्या दृष्टीनें पाहावयाचें झाल्यास पांच माणसांच्या कुटुंबास कमींत कमी वार्षिक ५०००।– रु. देखील अपुरेच ठरतील. आणि आपल्या देशांत तर बहुसंख्य कुटुंबांचें दर माणशीं वार्षिक उत्पन्न दोन-तीनशेंच्या पुढेंहि जाणार नाहीं. सन १९४८–४९ अशा उत्पन्नाची मोजदाद करण्यांत आली आहे. त्यावरून तें दरमाणशीं २५५।– रु. आहे असें दिसून आलें आहे. अशा स्थितींत कोणाहि अर्थमंत्र्यास आहेत ते सारे कर रद्द करून स्वतःचा व सरकाराचा राजीनामा देऊन, राज्य गुंडांच्या स्वाधीन करण्याशिवाय दुसरा उपायच नाहीं. तेव्हां या प्रश्नाकडे व्यावहारिक दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. सध्यां जे कर अस्तित्वांत आहेत, ते सर्वांच्या अंगवळणीं इतके पडले आहेत कीं, त्यांपासून कांहीं त्रास होतो असें फारसें कोणास वाटत नाहीं. करांचा बोजा जास्त आहे, अशी ओरड साधारणतः सर्वच करतात, पण त्यांत फारसें तथ्य नाहीं, हें आपण वेळोवेळीं पाहिलेंच आहे. अशा लोकांची खरी ओरड करांचा विनियोग सरकार कशा तऱ्हेनें करतें, याबाबत असणें इष्ट आहे. कारण कर-रूपानें पैसा सरकारी तिजोरींत गेला याचा अर्थ काय? तर कारखानदारांस स्वतः जादा नफा मिळविण्याकरितां त्याचा विनियोग करण्यास हा पैसा मिळत

नाहीं, किंवा बड्या प्राप्तिवाल्यांस स्वतांच्या जादा चैनीस मिळत नाहीं; पण सरकारास एकंदर समाजाच्या स्वास्थ्याकरितां खर्च करण्यास हा पैसा मिळतो हाच होय.

यावरून असें दिसून येईल कीं, नवीन कर लादतांना सहसा ते गरीब व मध्यम वर्गावर पडणार नाहींत व घातलेल्या भांडवलाची झीज भरून काढण्याइतपत तरी पैसा भांडवलदाराजवळ राहील एवढी दक्षता घेतली म्हणजे पुरें, मग अशा करांचा परिणाम धनिक लोकांची संचय करण्याची कुवत कमी कररण्यांत झाला तरी फारशी हरकत नाहीं. कारण, धनिकांच्या ऐवजीं सरकार त्या पैशाचा विनियोग करील, एवढाच त्याचा अर्थ होतो. आतां धनिकांपेक्षां सरकार अधिक योग्य कारणाकरितां पैसा खर्च करील असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. समंजस व सुज्ञ माणसाच्या दृष्टीनेंदेखील कांहीं कांहीं वेळेस सरकारनें अकारणीं पैसा खर्च केल्यासारखें दिसतें. पण लोकशाही पद्धतीच योग्य असें म्हटलें, कीं सरकार जें करतें तेंच समाजास पटतें असें मानणें अपरिहार्यच आहे. कम्युनिस्टदेखील लोकशाही राज्यव्यवस्था योग्य असें म्हणतात. त्यांचा लोकशाहीचा अर्थ मात्र कम्युनिस्टांनीं निवडून दिलेलें सरकार तेंच लोकशाही सरकार असा आहे, हा भाग वेगळा आहे.

--- --- ---

# प्रकरण ११ वें

# कोणताहि परिणाम न करणारे कर व वारसाकर

**१. विशिष्ट कारणांकरितां एकदांच आकारला जाणारा कर**— कोणताहि कर कांहीं विशिष्ट कारणांकरितां केव्हां तरी जरूरीप्रमाणें लादला तर त्याचा कसलाहि परिणाम कोणावर फारसा होत नाहीं. सध्यां आपल्याकडे निर्वासितांची पुनर्वसाहत हा एक मोठा प्रश्न आहे. निर्वासितांनीं सोसलेले हाल पाहून त्यांचेविषयीं लोकांचीहि सहानुभूति आहे. तेव्हां त्यांचेवर निर्वासित पुनर्वसाहत कर ( Refugee rehabitation levy ) यासारखा कर लादला, तर त्याबद्दल जनतेंत असंतोष उत्पन्न होणार नाहीं. उलट एखाद्या बाबतींत जनतेंत उत्साह उत्पन्न झाला असेल, तर कसल्याहि कठीण स्थितींत ती तडीस नेण्यास प्रत्येकजण उत्सुक असतो. सिंहगड चढण्यास आपण गेलों तर, आपणांस चढण कठीण आहे, हें माहीत असतें. तसेंच प्रत्यक्ष चढतांना अति त्रास वाटतो, हेंहि खरें आहे. असें असतांना आपण चढून जातोंच कीं नाहीं ? वर चढून गेल्यावरहि आपणांस थकवा वाटत नाहीं. उलट सरासरा सगळीकडे हिंडून येतों. लोकांचा उत्साह जागृत करणें व त्यास योग्य वळण लावणें हें सरकारचें आद्य कर्तव्य होय. राष्ट्राची संपत्ति म्हणजे त्यांतील जमीन व मनुष्यशक्ति. यांचा उपयोग करून घेणारें पुढारीपण मिळालें कीं काय होऊं शकतें याचें अगदीं ताजें उदाहरण म्हणजे पॅलेस्टाईन. एका माळरानाचें नंदनवन करणारे आधुनिक भगीरथ म्हणजे ज्यू होत यांत संशय नाहीं. जनतेच्या उत्साहाचा ओघ अर्थशास्त्रज्ञांनीं घालून दिलेल्या बंधनांचा बांध चुटकीसारखा फोडून टाकतो हेंच खरें.

या न्यायाप्रमाणें महाराष्ट्रांत कोयनाव्हॅलीसारखें धरण देखील पैसा नाहीं म्हणून अडून राहाण्याचें कारण नाहीं. ‘ आमचेजवळ पैसा नाहीं, जनता जर खुषीनें तेथें येऊन काम करण्यास तयार असेल तर आम्ही त्यांना अन्न व वस्त्र देऊं व

फार तर किरकोळ खर्चाकरितां ५-१० रुपये देऊं, बाकी कांहीं नाहीं. पहा येतां का ?' असा प्रचार व जनतेच्या सद्सद्विवेकबुद्धीस सतत आवाहन दिलें, तर महाराष्ट्रांतहि ही गोष्ट अशक्य होणार नाहीं. सरकारनें नवीन धंदे वाढविण्याकरितां 'सुखवृद्धिकर' ( betterment levy ) यासारखे कर आकारले, तर तेदेखील लोक खुषीनें देतील. सरकारनें धडाडीनें योजना हातीं घेतल्या पाहिजेत. कांहींची सुरुवात करून त्या यशस्वी रीतीनें पार पाडून लोकांचा विश्वास संपादन केला पाहिजे; व सरकारवर एकदां लोकांची श्रद्धा बसल्यावर व सरकार स्वतः कार्यक्षम असल्यावर मग भाग्याला काय रे उणें ! असा समसमां संयोग होण्याचा काळ व भाग्य राष्ट्रास हजारों वर्षांतून केव्हांतरी एकदां लाभतें. अर्थात् अशा असाधारण घटनेंत लक्ष घालून त्याचीं सुखस्वप्नें रंगविणें हें अर्थशास्त्रज्ञाचें काम नव्हे.

'भांडवलपट्टी' ( capital levy ) हाहि एक असाच कर आहे. खाजगी भांडवल जरुरीच्या वेळीं सरकारला योग्य व्याजानें कर्जरूपानें मिळवतां आलें नाहीं, तर केव्हांतरी १०-२० वर्षांतून एखादे वेळेस असा कर लादल्यास त्याचा लोकांच्या काम करण्याच्या किंवा संचय करण्याच्या प्रवृत्तीवर फारसा परिणाम होणार नाहीं. असले कर हे दैवी आघातासारखे होत. अस्मानीसुलतानी जशी सांगून येत नाहीं; तसेंच या करांचें. यामुळें लोकांच्या काम करण्याच्या व संचय करण्याच्या प्रवृत्तींवर जरी परिणाम झाला नाहीं, तरी अशा करांचा लोकांच्या मनोधैर्यावर विपरीत परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं. दैवी आघात निदान मनुष्यनिर्मित नसल्यानें, लोक हळहळ करीत झालेलें नुकसान भरून काढण्याकरितां कंबर कसतात; पण असे कर हे मनुष्यकृत असल्यानें लोकांत तीव्र असंतोष निर्माण करतील. तेव्हां बहुसंख्य लोकांची तशाच विशिष्ट कारणांकरितां असे कर देण्याची मनाची तयारी झाल्याशिवाय असे कर लादणें हें राष्ट्रीय हिताशीं विसंगत ठरेल.

**२. आकस्मिक लाभावरील कर**—आणखी ज्या कांहीं करांचा कांहीं परिणाम होत नाहीं, त्यांत आकस्मिक लाभावरील ( Tax on windfall wealth ) व नवीन भरभराटीस येणाऱ्या जमिनीवरील कर (Tax on sight

value of land) हे प्रमुख होत. मनुष्य आपलें अंदाजपत्रक आपल्या नेहमींच्या उत्पन्नावर ठरवीत असतो. आकस्मिक होणारा लाभ हा आपल्या येण्याची कधींच सूचना देत नसतो. तो तशी देता तर त्यास आकस्मिकच म्हणतां येणार नाहीं. तेव्हां अशा उत्पन्नाचा मोठा भाग कर म्हणून घेतला तर त्याचा कोणावरहि परिणाम होण्याचें कारण नाहीं. तसेंच एखादें शहर भरभराटीस येऊं लागलें तर त्या शहराच्या आसपास असणाऱ्या जमिनीसहि भरपूर किंमत येऊं लागते. ही जी जादा किंमत येते ती त्या जमीन-मालकांच्या कांहीं विशिष्ट श्रमामुंळें नव्हे; तर निव्वळ त्यांच्या नशिबाच्या जोरानें. हा जो लाभ तोहि आकस्मिक स्वरूपाचाच होय. मग अशा आकस्मिक स्वरूपाच्या लाभाचा फायदा सबंध समाजास न मिळतां एखाद्या व्यक्तीसच कां मिळावा ? सबंध समाजानें केलेल्या कांहीं विशिष्ट श्रमांमुळें त्या व्यक्तींच्या जमिनीस जादा किंमत आली. तेव्हां अशा जादा किंमतीवरचा बराचसा भाग कररूपानें सरकारी तिजोरींत जमा झाला तर तें न्याय्यच ठरेल.

**३. वारसाकर-(अ)नैतिक अधिष्ठान**—कांहींसें अशाच प्रकारचें उत्पन्न म्हणजे वारसा-हक्कानें येणारें उत्पन्न होय. हें उत्पन्न ज्यास मिळतें त्यानें व्यक्तिशः तें मिळविण्याकरितां कांहींहि श्रम केलेले नसतात. एखाद्या श्रीमंत बापाचा मुलगा होणें हा निव्वळ दैवयोग. पण या दैवी घटनेचे फार दूरगामी असे सामाजिक व आर्थिक परिणाम होतात. भौतिक क्षेत्रांत पैसा ही एक फार मोठी शक्ति असल्यानें जो जन्मतःच चांदीचा चमचा तोंडांत धरून जगांत आला, त्यास त्याच्यापेक्षां कमनशिबी असलेल्या बालकाशीं तुलना करितां अधिक प्रभावी साधनें उपलब्ध होतात. त्या साधनांच्या जोरावर तो, स्वतःस बुद्धि वा कर्तृत्व असो वा नसो, मनांत आणील तर कांहींहि हातपाय न हलवितां जन्मभर राजैश्वर्य भोगूं शकेल. :एवढेंच नव्हे तर, पैशाच्या जोरावर, त्याच्यापेक्षां कांकणभर अधिक बुद्धि व कर्तृत्व असलेल्या लोकांस आपल्या दावणींत बांधून त्यांच्यावर हुकमत गाजवूं शकेल. बरें, या सर्वांस कारण काय तर श्रीमंत कुळांत जन्म. भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत असें म्हटलें आहे कीं, जो समाजसेवक असतो (योगभ्रष्ट) तो पुन्हां सात्त्विक अशा श्रीमंत कुळांत जन्म घेऊन आपली समाजसेवा (योगाभ्यास) पुरा करून शेवटीं स्वर्गास जातो. (शुचीनां श्रीमतां

÷ लो. अ. ७

गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ।) हें योगभ्रष्टांच्या बाबतींत खरें असलें तरी सामान्य लोकांच्या बाबतींत याचा काय उपयोग! सामान्य मनुष्य पैशाचा उपयोग समाजकल्याणाकरितां न करतां, स्वतःची टीचभर खळगी यथास्थित कशी भरेल व तीच स्थिति आपल्या मुलांबाळांसहि कशी लाभेल एवढीच दक्षता घेतो. बरें, एका पिढींत पैसा मिळविला तर दुसऱ्या पिढींत तो संपेल असें थोडेंच आहे ? पिढ्यान्‌पिढ्या ती राहूं शकेल. तीन साडेतीन टक्के व्याज येणाऱ्या सरकारी कर्जरोख्यांत पैसा गुंतविला तर त्या व्याजावर जगूं शकेल एवढा पैसा मिळाला म्हणजे झालें. फार तर वाढत्या संततीस थोडा जास्त पैसा राहिला पाहिजे या दृष्टीनें थोडासा व्यापार उदीम करून जादा पैसा मिळविला पाहिजे; एवढी दक्षता घेतली म्हणजे झालें. गांधीजींनीं अशा श्रीमंत लोकांस, तुम्ही पैशाचे विश्वस्त (Trustee) आहांत, मालक नव्हेत, तेव्हां समाजकल्याणाकरितां त्या पैशाचा उपयोग करा असा उपदेश केला आहे. पण तो प्रत्यक्ष अमलांत आणणारे जमनालाल बजाजसारखे लोक विरळा.

यावरून हें दिसून येईल कीं, स्वतः प्रत्यक्ष कष्ट करून—मग ते कष्ट शारीरिक असोत वा बौद्धिक असोत—जो पैसा मिळविला जातो, त्यापेक्षां वारसाहक्कानें मिळालेल्या पैशाच्या योगानें सामाजिक विषमता वाढण्यास अधिक मदत होते. किंबहुना हेंच एक आर्थिक विषमता वाढविणारें व म्हणून त्याबरोबर सामाजिक विषमता वाढविणारें एकमेवाद्वितीय कारण आहे, असें म्हटलें तर तें अतिशयोक्तिपूर्ण बिलकुल ठरणार नाहीं. अशा विषमतेस नैतिक अधिष्ठानहि फारच कमी. लक्ष्मीपुत्र होणें ही ईश्वरदत्त देणगी आहे. तेव्हां अशा संपत्तीचा उपभोग घेणें हाहि त्याचा जन्मसिद्ध हक्क आहे, अशा तऱ्हेचा युक्तिवाद केला जातो. पण ईश्वराचें अस्तित्व मानलें, तरी ज्या ईश्वराचें वर्णन न्यायनिष्ठुर, सर्वव्यापी, सर्वसाक्षी, सच्चिदानंद असें केलें जातें, तो अशा सामाजिक विषमतेस उत्तेजन देईल, हें म्हणणें अयोग्य दिसतें. आर्थिक विषमता म्हटली कीं, ती सामाजिक असंतोषास कारणीभूत होते. त्यांतून तीस नैतिक अधिष्ठान नसेल तर आगींत तेल ओतल्यासारखें होतें. अशा तऱ्हेची विषमता नाहींशी करणें हें कोणत्याहि सरकारचें कर्तव्यच ठरतें; मग तें कम्युनिस्ट असो, समाजवादी असो वा भांडवलवादी असो. रशियांतील कम्युनिस्ट सरकारनें अधिकारावर आल्याबरोबर वारसाहक्कानें

जायदाद वारसास मिळण्याचें बंद केलें.[1] इंग्लंड, अमेरिकासारख्या अनुक्रमें समाजवादाचा व भांडवलवादाचा पुरस्कार करणाऱ्या राष्ट्रांतसुद्धां मृत्युकर ( death duties ) किंवा वारसाकर ( Inheritance tax ) असे कर आहेत.

( आ ) **वारसांवरील परिणाम इष्टच**—ह्या कराचा ज्यास वारशानें इस्टेट मिळणार असेल त्याचेवर कांहीं परिणाम होणार असेल तर तो इष्ट असाच होईल. वारसाहक्कानें आपणांस जी इस्टेट मिळणार आहे, तीवर आपलें उर्वरित आयुष्य आपण सुखानें काढूं, असें मनांत तो मांडे खात असेल, तर त्यास धक्का बसेल. पण त्यास एकदां समजून चुकलें कीं, ह्या इस्टेटीपैकीं मोठा भाग कररूपानें सरकारी तिजोरींत जमा होणार आहे, तर आपलें जीवन सुखी करण्याकरितां त्यास ह्या इस्टेटीवर अवलंबून न राहातां आपले हात, पाय व डोकें यांवरच अवलंबून राहाणें जरूर आहे हेंहि समजून चुकेल. मग तो त्या दृष्टीनें धडपड करूं लागेल. याचा अर्थ, अशा कराच्या योगानें व्यक्तींची काम करण्याची इच्छा मारली न जातां उलट त्या इच्छेस उत्तेजनच मिळेल. पण अशासारखा कर लादतांना ज्यास इस्टेट वारशानें मिळणार आहे, त्याचेवर या कराचा काय परिणाम होईल, या दृष्टीनेंच निव्वळ विचार करून चालत नाहीं, तर जो इस्टेट ठेवतो त्याचेवर काय परिणाम होईल, ह्याहि बाबीचा विचार करावा लागतो व तोच फार महत्त्वाचा आहे.

( इ ) **काम करण्याच्या व संचय करण्याच्या प्रवृत्तींवरील परिणाम**—सकृद्दर्शनीं असें वाटेल कीं, जो इस्टेट ठेवतो त्याचेवर या कराचा काय परिणाम होणार ? त्यानें बिचाऱ्यानें एकदां इस्टेट मिळविली व तो गतप्राण झाला, आतां त्याचा काय संबंध ? खरा परिणाम कोणावर होणार असेल तो ज्यास इस्टेट मिळणार त्याचेवरच होईल. एकदां मनुष्य मृत झाल्यावर त्याचेवर कांहीं परिणाम होणार नाहीं. हें खरें, पण तो जिवंत असेतों या कराचे भीतीनें तो जादा काम करून इस्टेट मिळविणार नाहीं व मिळविली तरी ती तो शिल्लक ठेवणार नाहीं, म्हणजे सारी खर्च करून टाकील.

1. Inheritance, whether by Law or will, is abolished. After the death of an owner, the property which belonged to him, whether movable or immovable, becomes the property of U. S. S. R. (Decree, Dated 27th April 1918.)

आतां जसा पैसा मिळाला तसा तो खर्च करून टाकला तर त्यांत सरकारचें किंवा राष्ट्राचे दृष्टीनें कांहीं नुकसान नाहीं. पैसा खर्च करणें म्हणजे तरी तो समाजाच्या निरनिराळ्या घटकांत विभागणें हेंच होय. असा पैसा विभागला गेला तर त्याचा उत्पादनावरदेखील इष्ट असाच परिणाम होतो, हें मागील प्रकरणांत आपण पाहिलेंच आहे. अशा खर्चावर सरकारास विक्रीकर किंवा तत्सम कर मिळतात; तेव्हां सरकारचेंहि तसें नुकसान नाहीं. वारसाकरानें फार तर मनुष्याची संचय करण्याची वृत्ति मारली जाईल; पण त्यायोगें राष्ट्रीय असें कांहीं नुकसान होत नाहीं, हें वरील विवेचनावरून सिद्ध होतें. पण याउलट शिल्लक ठेवावयास नको म्हणून जरूरीपेक्षां जास्त मिळविण्याचीहि धडपड नको, म्हणजे त्या प्रमाणांत काम कमी केलें तरी चालेल, अशी जर वृत्ति समाजांत बळावत चालली तर ती राष्ट्रीय आपत्तीच ठरेल.

रशियासारख्या देशांत सारी संपत्ति राष्ट्रीय मालकीची, जन्मभर कष्ट करून कांहीं संचय करून ठेवलें तर तेंहि राष्ट्रीय मालकीचें. तेव्हां तेथें संचय करण्याची प्रवृत्ति मारली गेली आहेच. पण अशी प्रवृत्ति मारली गेली तर ती कांहीं राष्ट्रीय आपत्ति ठरत नाहीं, हें आपण आतांच पाहिलें. परंतु याबरोबरच काम करण्याचीहि प्रवृत्ति मारली जाते, व तीच राष्ट्रीय हानि होय. यावर उपाय म्हणून तेथील सरकार अशा कामचुकार माणसांवर पाळत ठेवून त्यांची नोंद करून ठेवतें; व त्यांचेकडून सक्तीनें जादा काम करून घेतें, किंवा अशांस शिक्षा, तुरुंग, समाजभ्रष्टता अशांसारख्या सामाजिक आपत्तींस तोंड द्यावें लागतें. थोडक्यांत, तेथें प्रत्येकास आपल्यावर गुप्तपोलिसांची नजर तर नाहींना, या भीतीखालीं काम करावें लागतें व वावरावें लागतें. बरें, एकमेकांच्या हेवादाव्यानें कांहीं चांगल्या कर्तृत्ववान् माणसांसदेखील अशा आपत्ति भोगाव्या लागतील. अशी स्थिति सतत ठेवणें हें कोणत्याहि सरकारास भूषणावह नाहीं. सध्यां तरी अशी स्थिति रशियांत आहे, व ती केव्हां पालटेल हें कांहीं सांगवत नाहीं. किंबहुना ती पालटणार नाहीं, असें गृहीत धरणेंच योग्य ठरेल. कामचुकारपणा हा कांहीं प्रमाणांत प्रत्येकांत असतोच, हा मनुष्यस्वभावच आहे. कामचुकारपणा असला कीं, सक्तीनें काम करून घेण्याची पद्धत आली. ती पद्धति म्हणजेच पोलिसी जुलूम, व पोलिसी–जुलूम म्हणजे हुकूमशाही–राज्य. असें हें दुष्ट वर्तुळ आहे.

लोकशाही सरकारास अशा तिसऱ्या दर्जाच्या ( third degree methods ) पद्धतींचा अवलंब न करतां वारसा-कर लादूनहि काम करण्याच्या प्रवृत्तींची जोपासना करणें शक्य आहे कीं काय हें पाहूं.

या मुद्द्याचा विचार करितांना तो दोन दृष्टींनीं करणें जरूर आहे. एक नैतिक ( Moral & ethical ) व दुसरी व्यावहारिक ( Practical ). मानवी मनाच्या मूळ प्रेरणा या दोन्ही बाजूंनीं मिळतात. म्हणूनच अशा दृष्टीनें विचार प्रस्तुत ठरतो. आपण जेव्हां श्रीरामचंद्र, भगवान् श्रीकृष्ण, गौतमबुद्ध, झरतुष्ट्र, कन्फ्यूशियस, येशू ख्रिस्त, महंमद पैगंबर, शंकराचार्य, गांधीजी अशा एक ना अनेक व्यक्ति स्वतःचा कसलाहि स्वार्थ साधावयाचा नसतांना निव्वळ लोकहितैक-दृष्टीनें आमरण देह कष्टवीत असतात हें पाहतों, तेव्हां अचंबा वाटतो. जडवादी (Materialist) लोक, मनुष्य आर्थिक परिस्थितीचा गुलाम असतो असें म्हणतात, तें निदान अशा अलौकिक व्यक्तींचे बाबतींत तरी खोटें ठरतें हें निर्विवाद होय. रामदासस्वामी मनास, 'मना चंदनाचेपरी त्वां झिजावें' व 'सर्व लोकांस रे नीववावें' ( संतुष्ट करावें ) असा उपदेश करितात. सर्वसामान्य माणूस या उपदेशाप्रमाणें जरी वागत नसला, तरी असामान्य माणसें अशा दृष्टीनें वागतात, हें वरील उदाहरणांवरून स्पष्ट होतें. भगवान् श्रीकृष्ण गीतेंत अर्जुनास सांगतात, 'न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन......वर्त एवच कर्मणि' मला तिन्ही लोकांत कर्तव्यकर्म असें कांहींच नाहीं, तरीहि मी काम करीतच असतों. जडवादी विचारसरणी अंगीकृत केलेल्या रशियासारख्या देशांतदेखील लेनिन, ट्रॉट्स्की, स्टालिन हे कर्मयोगी कोणत्याहि देशास भूषणभूत होतील असेच आहेत. या लोकांना लोकांच्या कल्याणाशिवाय दुसरा कोणता व्यवहारी स्वार्थ साधावयाचा होता व आहे? बरें स्टालीन वगैरे लोक सत्तालोलुप कर्मयोगी आहेत असें जरी मानलें, तरी अर्थशास्त्राच्या दृष्टीनें अधिक कर लादले म्हणून या लोकांची काम करण्याची प्रवृत्ति मारली जाईल असें म्हणतां येणार नाहीं. इतकीं मोठीं उदाहरणें कशाला घ्या? जगांत पदोपदीं आपण अशीं माणसें बघतों कीं, त्यांना पैसा मिळो वा न मिळो, तो शिल्लक ठेवतां येवो वा न येवो; आपापल्या कुवतीप्रमाणें काम करीत रहावयाचें, हा त्यांचा स्वभावच असतो. नुसती शरीरयात्रा चालावी म्हणूनच नित्यव्यवहार करीत राहाणें, एवढ्यापुरतेंच आपलें कर्म मर्यादित न ठेवतां

आपापल्या कुवतीप्रमाणें बहुतेकजण काम करीत असतात. उदाहरण म्हणून द्यावयाचें झाल्यास कवि, लेखक, अध्यापक, तत्त्वज्ञ, शास्त्रज्ञ यांचा उल्लेख करितां येईल. कांहीं कांहीं साधीसुधीं व्यावहारिक माणसेंहि अशाच वृत्तीचीं असतात. सन १९१९ मध्यें एका वॅलेस् नांवाच्या इंग्लिश व्यापाऱ्यानें मृत्युपत्रानें २,५०,००० पौंड ब्रिटिश ट्रेझरीस दिले, व तसें करतांना 'माझ्या मुलाकरितां मीं जरूर तेवढा पैसा ठेवल्यानंतर ज्या समाजाच्या योगानें मी जादा पैसा मिळवूं शकलों, तो त्या समाजास मिळाला पाहिजे[1]' असें म्हटलें आहे. डाल्टनसाहेबांनीं आपल्या Inequality of Incomes या पुस्तकाच्या चौथ्या भागाच्या आठव्या प्रकरणांत अशीं पुष्कळ उदाहरणें दिलीं आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मनुष्यस्वभावांत अशा तऱ्हेची आर्थिक क्षेत्रांतदेखील नैतिक बाजू समाविष्ट असते. असें जरी असलें तरी 'अर्थस्य पुरुषो दासः' मनुष्य पैशाचा दास आहे, या व्यावहारिक सुभाषिताकडे दुर्लक्ष करून चालत नाहीं. किंबहुना याच बाबीचा अर्थशास्त्रज्ञांस प्रामुख्यानें विचार करावा लागतो.

प्रथमदर्शनींच हें मान्य करावें लागेल कीं, एखादा चार-पांच खोल्यांचा बंगला व थोडीशी जंगम मिळकत एवढ्यापुरताच वारसाहक्क मर्यादित केला तर यापेक्षां जास्त मिळविण्याचा सहसा कोणी प्रयत्न करणार नाहीं. बरें, केला तरी जादा उत्पन्न सारें खर्च केलें जाईल. खर्च जास्त केला गेला तर त्यायोगें सरकारचें किंवा समाजाचें कांहीं नुकसान होईल असें नाहीं. पण त्यासदेखील कांहीं मर्यादा आहे. माणूस खर्च करून करून किती करील? त्याच्या जास्तींत जास्त गरजा भागल्यावर, त्या खर्चासदेखील मर्यादा बसेल. तेव्हां अधिकांत अधिक काम करून, जादा पैसा मिळविण्याकरितां, त्यास कांहींतरी आमिष दाखविलें पाहिजे.

**( ई ) वाढत्या श्रेणीची पद्धति**—या दृष्टीनें प्राप्तिकराप्रमाणें वाढत्या इस्टेटीवर वाढता कर आकारला जाणें इष्ट ठरेल. ठराविक मर्यादेपर्यंतच्या इस्टेटीवर बिलकूल कर आकारला जाणार नाहीं. व त्यापुढें जी इस्टेट असेल,

---

1 'I hold the view that subject to the right to make adequate provision for his children, all possessions, great or small, if aquired by the testator through the people, as mine were, should return to the people.'

तीवर वाढत्या श्रेणीनें कर आकारला जाईल, असें प्राप्तिकर आकारण्याच्या पद्धतींतील तत्त्व येथेंहि अंगिकारिलें म्हणजे झालें. हिंदुस्थानांत असा कर अद्याप नाहीं, पण असा कर लवकरच लादला जाण्याचा संभव आहे. त्यावेळीं समजा ( रु. १००,००० ) एक लाखापर्यंतच्या इस्टेटीवर कर माफ केला गेला, तर पुढें पहिल्या लाखापर्यंत समजा शेंकडा २५ टक्के, पुढील लाखांवर शेंकडा ३०–३५ टक्के, पुढें शेंकडा ३५–४० असा वाढत्या श्रेणीनें आकारला जाईल. पण अशा साध्या पद्धतींत किती वारसांत ती इस्टेट वांटली जाईल याची दखल घेतली जात नाहीं. त्याकरितां त्याचा पर्याय म्हणून प्रत्येक वारसास किती इस्टेट मिळेल त्यावर वाढत्या श्रेणीनें कर आकारला जातो. या पद्धतीनें जो इस्टेट ठेवतो त्यास, असा कर गेल्यावर आपल्या मुलांबाळांस जास्त जायदाद राहावी म्हणून जादा काम करून पैसा मिळविण्याची व तो जास्त प्रमाणांत शिल्लक ठेवण्याची इच्छा होईल. वारसांसहि आपणांस ज्या प्रमाणांत इस्टेट मिळणार होती, त्यापेक्षां कर गेल्यावर इस्टेट कमीच होईल म्हणून जादा मिळकत हवी असेल तर निव्वळ स्वस्थ न बसतां जादा कष्ट केले पाहिजेत, अशी जाणीव होईल. यायोगें वारशानें इस्टेट मिळाल्यावर त्यावर पिढ्यानुपिढ्या बसून खाऊं, अशी प्रवृत्ति मारली जाईल, व त्या ठिकाणीं काम करण्याच्या प्रवृत्तीची जोपासना होईल.

( उ ) **रिग्नानो पद्धति**—पण यायोगें जसजशी इस्टेट वाढत जाईल, तसतशा कर जाऊनहि जादा इस्टेट वारसास मिळत राहील. त्यामुळें समाजांतील निरनिराळ्या थरांतील आर्थिक विषमता कमी करण्याचा करपद्धतीचा हेतु साध्य होणार नाहींच. तसेंच संचय करण्याची प्रवृत्ति मारल्यानें राष्ट्रीय नुकसान होत नाहीं असें आपण वर म्हटलें, तथापि संचयवृत्ति कमी झाल्यानें नवीन धंदे काढण्यास जादा भांडवलाचा पुरवठाहि ( Capital formation ) कमी प्रमाणांत होत राहील. पैशाचा व्यय सतत होत राहिल्यानें, त्याची विभागणी लवकर लवकर निरनिराळ्या व्यक्तींत होत राहील. ह्या व्यक्ती आपल्या गरजे-प्रमाणें तो पैसा पुन्हां खर्च करीत राहतील, पण ह्या व्यक्तींचे मुळांत उत्पन्न कमी असल्यानें, त्यांना ठेवूं म्हटलें तरी सधन इसमाइतका पैसा शिल्लक ठेवतां येणार नाहीं. या सर्व बाबींचा विचार करून मनुष्याच्या काम करण्याच्या प्रवृत्तीबरोबरच

संचय करण्याच्या प्रवृत्तीचीहि जोपासना व्हावी, या हेतूनें इटालियन प्रोफेसर रिग्नानो यांनीं एक वारसा-कराची इस्टेटीच्या वयावर कर आकारण्याची पद्धति सुचविली आहे. त्याअन्वयें ' अ 'ची इस्टेट जेव्हां त्याच्या वारसास, ' ब 'स मिळते तेव्हां त्यावर, समजा शेंकडा २५ टक्के कर आकारावा, पण तीच जेव्हां ' ब 'कडून ' क 'स मिळेल तेव्हां ' अ ' च्या राहिलेल्या म्हणजे ( १०० - २५ = ७५ ) रु. ७५ वर शेंकडा ५० टक्के कर आकारावा व ' ब 'कडून ' क 'स मिळणाऱ्या इस्टेटीवर पूर्वीप्रमाणें शेंकडा २५ टक्के कर आकारावा व अशा रीतीनें ' अ 'ची इस्टेट ३।४ पिढयांत सरकार जमा व्हावी. यायोगें स्वतः जेवढे जादा कष्ट करून, जेवढी जादा इस्टेट आपण आपल्या मुलांबाळांस ठेवूं, तेवढया जादा प्रमाणांत ती त्यांस मिळेल, ह्या जाणिवेनें प्रत्येकजण जादा काम व जादा संचय करण्याच्या पाठीमागें लागेल. स्वतःच्या कष्टाचा व संचयाचा आपल्या मुलांस जादा फायदा होतो, एवढी भावना वरील प्रवृत्तीची जोपासना करण्यास पुरेशी आहे. याबरोबरच जेवढी इस्टेट जुनी होत जाईल, तेवढी ती सरकारजमा होत गेल्यानें आर्थिक विषमता कमी होण्यासहि मदत होईल.

येथें समजा, ' ब 'नें आपल्या इस्टेटींतील जादा भाग कररूपानें जाणार, या जाणीवेनें जादा खर्च करून अगदीं कमी इस्टेट शिल्लक ठेवली असें धरून चाललें, तरी या पद्धतींत कमीपणा येत नाहीं. जादा खर्च हानिकारक नसतो हें आपण वेळोवेळीं पाहिलेलें आहे.

अशी पद्धति जर हिंदुस्थानांत एकदम अमलांत आणली तर मात्र प्रथम प्रथम बरेच घोटाळे उत्पन्न होतील. या पद्धतींत किती इस्टेट कोणत्या पिढीची हें ठरविणें हें मुख्य काम आहे. व असें ठरविणें सध्यांच्या स्थितींत फार कठीण आहे. अशी संकलित माहिती आपल्याजवळ उपलब्ध नाहीं. फार काय, अशी माहिती जगांत पुढारलेल्या इंग्लंड, अमेरिका या राष्ट्रांतदेखील उपलब्ध नाहीं; त्यामुळें तेथेंहि ही पद्धति अद्याप अमलांत आणली गेलेली नाहीं. वर वर्णिलेली वारसाकराची पद्धति प्रथम अमलांत आणून, इस्टेटीच्या वयाची माहिती गोळा करावी, व मग ५।१० वर्षांत रिग्नानो-वारसा-करपद्धति अमलांत आणावी. या ठिकाणीं एखादी विशिष्ट इस्टेट या पिढीची, ही दुसरी इस्टेट दुसऱ्या पिढीची, अशी नोंद करण्याची आवश्यकता नाहीं; इस्टेटीची ज्या त्या वेळेची किंमत नोंदली म्हणजे

झालें. किंमतींत नेहमीं फरक पडत जातो, त्याकरितां त्यावेळची किंमत व त्यावेळचा किंमत-सूचकांक ( Price-Index ) या दोन्हींची नोंद केली म्हणजे झालें.

( ऊ ) **वारसाकराचें स्वरूप**—वारसाकराच्या स्वरूपाचा थोडासा विचार केला पाहिजे. इतर कर हे दैनंदिन उत्पादनावर आकारलेले असतात. त्यामुळें ते सरकारच्या उत्पादनांत ( Revenue Income ) जमा करणें इष्ट ठरतें. अशा करांतून सरकार आपला नेहमींचा खर्च चालवतें. अलीकडे सरकारनें उत्पादनसाधनें-देखील आपल्या हातीं घ्यावींत, अशा प्रकाराची विचारधारा मूळ धरूं लागली आहे. अशीं साधनें हातीं घ्यावयाचीं म्हणजे भांडवल पाहिजे. वारसाचें उत्पन्न म्हणजे एखाद्या व्यक्तीनें आपल्या मुलांबाळांकरितां जमवून ठेवलेलें भांडवल होय. अशा भांडवलांतून जेव्हां सरकार कररूपानें कांहीं भाग आपल्याकडे आकर्षून घेतें, तेव्हां त्याचा उपयोग भांडवली कामाकडेच करणें योग्य होय. वारसाकराचें उत्पन्न हल्लींच्या तुटीच्या अंदाजपत्रकाच्या काळांत नेहमींच्या उत्पन्नांत जमा करण्याचा जबर मोह कोणत्याहि अर्थमंत्र्यास होणें साहाजिक आहे. तेव्हां हा कर लादतांना हें उत्पन्न भांडवल-फंड ( Capital Fund ) म्हणूनच जमा केलें पाहिजे, व त्याचा तसा उपयोग केला गेला पाहिजे, अशा तऱ्हेचें कायदेशीर बंधन ( Statutory restriction ) त्यावर असलें पाहिजे. एकंदर उत्पादन वाढविण्याच्या दृष्टीनें हा निर्बंध अगदीं योग्य असाच ठरेल.



# प्रकरण १२ वें

# राष्ट्रीय कर्ज

तिसऱ्या प्रकरणांत सरकारी उत्पन्नाच्या मार्गाचें विवेचन करतांना करांबरोबर सरकारी मालमत्ता ( जमिनी, जंगलें इ. ) व सरकारी मालकीचे उद्योगधंदे यांपासून सरकारला उत्पन्न मिळतें, असें आपण म्हटलें आहे. पुढें २१ व्या प्रकरणांत सरकारनें उद्योगधंद्यांत घातलेल्या भांडवलावर शें. ५ टक्के व्याज घ्यावें व समाज-हिताकरितां अफू, दारू वगैरेंसारख्या मादक पदार्थांवर त्यांच्या वाजवी किंमती-पेक्षांहि जादा किंमती लादून जादा उत्पन्न घ्यावें असें सूचित केलें आहे. यांशिवाय सरकारचा जमेचा मार्ग म्हणून 'कर्ज' याविषयीं थोडीशी चर्चा तिसऱ्या प्रकरणांत केली आहे. त्याविषयीं येथें सविस्तर विवेचन करण्याचें योजिलें आहे.

१. **कर्जाचें स्वरूप**—प्रथमच हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, कर किंवा सरकारी मालमत्ता यांपासून ज्या तऱ्हेनें सरकारला उत्पन्न मिळतें त्या तऱ्हेचा 'कर्ज' हा कांहीं उत्पन्नाचा मार्ग नव्हे. ज्याप्रमाणें अडीअडचणींत एखादी खाजगी व्यक्ति आपल्या वैयक्तिक किंवा स्थावर मिळकतीच्या तारणावर कर्ज काढते व दरम्यानच्या काळांत जादा श्रम करून किंवा कांहीं खर्च कमी करून या कर्जाची फेड करिते, त्याचप्रमाणें सरकार लढाई, भांडवली खर्च किंवा एखाद्या वेळेस दैनंदिन व्यवहारांतील तूट[1] भरून काढण्याकरितां कर्ज काढतें. अर्थात् हा कर्जाचा पैसा सरकारला आपल्या मिळकतीवरील उत्पन्नांत वाढ करून किंवा कर वाढवूनच परत करावा लागतो. मिळकतीवरील उत्पन्नांत वाढ करणें म्हणजे ती एक प्रकारची करवाढच होय. रेल्वेसारख्या राष्ट्रीय मालकीच्या धंद्यांतून जादा उत्पन्न मिळविण्याकरितां रेल्वेच्या दरांत मैली १ पै वाढविणें म्हणजे, एक मैल प्रवास करणाऱ्या नागरिकांवर तिकीट खरेदी करतांना १ पै कर लादणेंच होय. असें जर आहे तर, साहजिकच असा प्रश्न उत्पन्न होतो कीं,

---

1 Budget deficit.

सरकारला जेव्हां जेव्हां जादा पैशाची गरज उत्पन्न होते, तेव्हां तेव्हां जरूरीच्या प्रमाणांत जादा कर वाढवून सरकार जरूर तो पैसा उभा कां करीत नाहीं? कर्ज काढून हा बोजा व त्यावरील व्याजाचा बोजा असे बोजे पुढील पिढीवर तिच्या संमतीशिवाय कां लादतें? असें करण्यास तितकींच सयुक्तिक कारणें आहेत.

२. **कर्ज काढण्याची आवश्यकता**—प्रमुख कारण असें कीं, कोणतेंहि लोकशाही सरकार स्वभावतःच जादा कर लादण्यास भीत असतें. न जाणों अशानें पुढील निवडणुकीच्या वेळीं प्रतिपक्ष कर कमी करण्याच्या घोषणांवर अधिकारावर येईल व तेंहि राष्ट्रीय हिताच्या कोणत्याहि भरीव कारणांकरितां नसून, निव्वळ कराच्या ऐवजीं कर्ज काढण्यासारख्या तांत्रिक मुद्द्यावर. अशी भीति सरकारास नेहमीं भेडसावीत असते. कर देण्यापेक्षां कर्ज देणें कोणीहि प्रबुद्ध वा अप्रबुद्ध नागरिक पसंत करील. मुदलाची शाश्वती राहून त्याशिवाय व्याज मिळत असल्यावर मुद्दलच कर म्हणून बुडीत कोण देईल? केव्हां ना केव्हां तरी या कर्जाची परतफेड करण्याकरितां आपणांस किंवा आपल्या मुलांनातवांस जादा कर द्यावा लागणार आहे, हा दूरदर्शी विचार कर्ज देणाऱ्या नागरिकांच्या मनांत येत नाहीं. एवढेंच नव्हे तर लोकशाहीचे पुरस्कर्ते हें कर्ज म्हणजे 'आमच्या पूर्वजांनीं मारलेल्या लढायांची जागती स्मृति' अशी त्याची तरफदारी करून, सामान्य नागरिकांची कर व कर्ज यांविषयींच्या परिणामांबाबत दिशाभूल करितात. लढाईसारख्या आणीबाणीच्या प्रसंगीं लागणारा जरूर तो सर्व पैसा नागरिकांच्या स्वदेशभक्तीच्या भावनांस आवाहन करून जमवितां येईलच, अशी खात्री देतां येत नाहीं. कांहीं पुण्यात्मे अशा प्रचारानें आपल्याजवळचें सर्वस्व देतील, तर कांहीं धूर्त कांहीं ना कांहीं लपवाछपवीच्या प्रकारानें कांहींच देणार नाहींत. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं जनमनांत कर लादून क्षोभ निर्माण करण्यापेक्षां सरकार साहजिकच कर्ज उभारणें पसंत करतें.

दुसरें कारण असें कीं, कर वर्षांतून एकदांच वर्षारंभीं लादले जातात व त्यायोगें येणारा पैसा आस्ते आस्ते सरकारी तिजोरींत जमा होत असतो. त्यामुळें वर्षाच्या मध्येंच लढाई किंवा दुष्काळ अशा दैवी आपत्तीस तोंड देण्याचा प्रसंग आल्यास, ताबडतोब पैसा उभारण्यास कोणत्याहि सरकारास कर्जाशिवाय दुसरा मार्ग राहत नाहीं. अशासारख्या प्रसंगास तोंड देण्याकरितां सरकार एखादा 'आणीबाणीचा

तरतूद-फंड'[1] निर्माण करून त्यांत दरवर्षी ठराविक रक्कम टाकूं शकेल. तथापि एखाद्या वेळेस अपेक्षेपेक्षांहि जादा खर्च करण्याची पाळी येईल व अशा स्थितींत कमी मुदतीची कां होईना कर्जें काढण्याशिवाय गत्यंतर राहणार नाहीं.

तिसरें कारण असें कीं, कर लादून हवा तेवढा पैसा जमेलच अशी खात्री देतां येत नाहीं. त्यांतच मागें आपण ७ ते ११ या प्रकरणांत चर्चिल्याप्रमाणें, उत्पादन, प्राप्ति–विभाजन या व तत्सम गोष्टींवर कराचे दूरगामी परिणाम होतात. या सर्वांचा विचार करून आहे त्या करांत वाढ करणें किंवा नवीन एखादा कर बसविणें योग्य ठरेलच असें निश्चित सांगतां येणार नाहीं. याकरितांहि करापेक्षां कर्जाचा मार्गच लोकशाही सरकारें पसंत करतात.

याबरोबरच तात्त्विकदृष्ट्या विचार केला असतांहि कर्ज काढून पैसा उभा करणें सयुक्तिक ठरतें. हिंदसरकार दामोदर नदीवर धरण बांधीत आहे. समजा, त्याकरितां लागणारा सारा पैसा सरकार कर्जरूपानेंच जमा करीत आहे. त्या धरणाचा उपयोग भावी पिढीसहि होणार आहे. मग चालू पिढीनें आपल्या कांहीं योग्य गरजा कमी करूनहि जर सरकारला या कामाकरितां कर्ज दिलें तर निदान जी पुढची पिढी या धरणापासून होणाऱ्या फायद्याचा प्रत्यक्ष उपयोग घेईल, तिनें हा तरी बोजा पत्करूं नये काय? तेव्हां हा बोजा पुढील पिढीवर ढकलणें गैर नाहींच, उलट तें योग्यच आहे.

कर्जाचा आणखीहि एक फायदा म्हणून नोंदतां येईल. तो असा कीं, सध्यांच्या लोकशाही सरकारास जवळजवळ समाजांतील प्रत्येक थरापासून थोडेंबहुत कर्ज मिळत असतें. त्यामुळें असें सरकार टिकविण्यांत प्रत्येकाचा स्वार्थ असतो. अशानें लोकशाही सरकार बदलून त्या ठिकाणीं फॅसिस्ट किंवा कम्युनिस्ट हुकूमशाहीसारखीं सरकारें अधिकारावर येणें कठीण होतें. याचाच अर्थ कर्ज बहुसंख्य लोकांचीं माथीं भडकूं देत नाहीं. व त्यामुळें राज्यक्रांति अशक्य होते. अर्थात् क्रांतीस प्रतिबंधक असें हें अनेकांपैकीं एक कारण आहे. हेंच प्रमुख नव्हे हें दृष्टीआड करून चालणार नाहीं.

हीं झालीं देशांत अंतर्गत कर्जें उभारण्याविषयींचीं कारणें. पण परदेशीय कर्जें उभारण्यास तर याहूनहि सबळ कारणें आहेत. सध्यां आपल्या सरकारनें जागतिक

1 Emergency Fund.

बँक व अमेरिकन सरकार यांपासून घेतलेल्या कर्जाचेंच उदाहरण घेऊं. आपल्या देशांतील धान्य व वीज यांचें उत्पादन वाढविण्यासाठीं निरनिराळ्या नद्यांवर धरणें बांधण्याच्या योजना आपल्या सरकारनें हातीं घेतल्या आहेत. त्यांस लागणारी यंत्रसामुग्री तर आपलेजवळ नाहीं व रोख पैसा देऊन विकत घ्यावयाची म्हटलें तर त्याबदला येथून पाठविण्यास दुसरा पुरेसा माल नाहीं. अशा स्थितींत रोख पैसा नाहीं तर राष्ट्रोद्धारक योजना नाहींत, व त्या योजना नाहींत म्हणून रोख पैसा नाहीं अशी अगतिक स्थिति प्राप्त व्हावयाची. तसेंच गेल्या महायुद्धांत इंग्लंडनें सारी युद्धसामुग्री अमेरिकेकडून विकत घ्यावयाची म्हटलें असतें तर तें अशक्य होतें. यामुळें शांतताकाळांत तसेंच युद्धकाळांत परदेशीय व्यक्ति किंवा सरकार यापासून कर्जें काढणें अत्यावश्यकच असतें.

लोकशाही सरकारें अशा रीतीनें देशांत व विदेशांत खाजगी व्यक्तींकडून व विदेशीय सरकारकडून कर्जें आपल्या पतीवर उभारतात. याउलट फॅसिस्ट तऱ्हेच्या हुकुमशाही सरकारच्या अनियंत्रित हुकुमतीखालीं देशांतील सर्व उत्पादन-साधनें असल्यानें, असें सरकार खाजगी भांडवलदारांकडून सक्तीचीं कर्जें घेऊं शकतें. कम्युनिस्ट सरकारची तर देशांतील साऱ्या उत्पादनसाधनांवर प्रत्यक्ष मालकी असल्यानें, त्या सरकारास खाजगी व्यक्तींकडून कर्ज घेण्याची आवश्यकताच भासत नाहीं. तशांतच अशा समाजरचनेंत खाजगी व्यक्तीस कांहीं शिल्लक टाकतां येत नाहीं, व तशी गरजहि असत नाहीं. त्यांतून थोडी-फार शिल्लक राहिलीच तर ती इतकी अत्यल्प असेल कीं, त्याचा कर्ज म्हणून सरकारला विचारच करितां येणार नाहीं.

**३. अंदाजपत्रकी तूट व कर्ज**—प्रथमारंभींच आपण पाहिलें कीं, सरकार ' लढाई, भांडवली खर्च किंवा अंदाजपत्रकी तूट ' यांवरील खर्चाकरितां लागणारा उत्पन्नापेक्षां जादा पैसा कर्जरूपानें उभारतें. या तीन कारणांपैकीं ' अंदाजपत्रकी तूट ' भरून काढण्याकरितां कर्ज काढणें म्हणजे शुद्ध दिवाळखोरी होय, असें बऱ्याच अर्थशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. कारण उघडच आहे. आपला दैनंदिन व्यवहार चालविण्याकरितां सरकारला कांहीं उत्पन्नाचे मार्ग आहेत. त्यांतील प्रमुख म्हणजे कर व सरकारी मालमत्तेवरील व धंद्यांतील उत्पन्न हे होत. या उत्पन्नांतून सरकारन आपला दैनंदिन खर्च[1] चालवावा हें रास्तच आहे. कांहीं

1 Revenue expenditure.

कारणांनीं हा खर्च वाढला तर कर वाढवून तो भागवावा. कारण वाजवी खर्च भागविण्याकरितांच कर लादावयाचे असतात. हा युक्तिवाद सकृद्दर्शनीं खरा आहे. पण जेव्हां वस्तूंच्या किंमती खालीं जातात तेव्हां धंद्यांतील उत्पादन कमी होतें व याचा परिणाम म्हणून राष्ट्रांत सर्वत्रच आर्थिक मंदी फैलावते. अशा काळांत कितीहि कर लादले तरी, एकंदर वस्तूंचा खप कमी झाल्यानें वस्तूंवरील कर म्हणजे विक्रीकर, उत्पादनकर,[1] अशांसारख्या करांपासून येणारें उत्पन्न कमी होईल, त्याबरोबरच या वस्तू उत्पादन करणारे कारखानदार किंवा विभाजन करणारे व्यापारी यांची मिळकतहि कमी होईल; व त्यायोगें प्राप्तीवरील करांचें उत्पन्नहि कमी होईल. अशा रीतीनें करांचें उत्पन्न कमी झाल्यावर दैनंदिन खर्च चालविण्याकरितां तसेंच राष्ट्रांत पुन्हा आर्थिक चैतन्य निर्माण करण्याकरितां लोकांजवळील पैसा कर्ज म्हणून घेऊन त्याचा विनियोग नवीन धंदे काढण्यांत किंवा आपला खर्च वाढवून सामान्य लोकांच्या हातीं जादा पैसा देण्यांत करणें सरकारास भाग पडतें.

**४. कर्जाचे प्रकार उंत्पादक व अनुत्पादक**—शाळा, दवाखाने, पाटबंधारे, जंगलें, इमारती यांसारख्या गोष्टींवर होणारा भांडवली खर्च, सरकार बहुशः कर्ज काढूनच करतें. या गोष्टी केल्यावर, उदाहरणार्थ पाटबंधारे बांधल्यावर त्यांपासून उत्पन्न होणाऱ्या विजेवर व मिळणाऱ्या पाण्यावर जादा उत्पादन होतें. व अशा उत्पादनांतून कर्ज व त्यावरील व्याज क्रमाक्रमानें फेडतां येतें. शाळा, दवाखाने यांपासून प्रत्यक्ष असें जादा उत्पन्न होत नाहीं; पण शिक्षित व सशक्त नागरिक हा अशिक्षित व रोगट नागरिकापेक्षां अधिक व वरच्या दर्जाचें काम करील हें उघड आहे. ह्या अप्रत्यक्ष फायद्यानें राष्ट्राच्या एकंदर उत्पादनांत भरच पडेल हें वेगळें सांगणें नलगे. अशा कामाकरितां काढलेल्या कर्जास ‘ उत्पादक कर्ज ’[2] असें म्हटलें जातें.

याउलट लढाईसारख्या कारणांकरितां काढलेल्या कर्जास ‘ अनुत्पादक – कर्ज ’[3] असें म्हणण्याचा प्रघात आहे. पण कर्जाची अशी विभागणी करणें भ्रममूलक आहे. हें थोडा विचार केला असतां दिसून येईल.

---

1 Excise. 2 Productive debt.
3 Unproductive debt.

दुसऱ्या महायुद्धाचेंच उदाहरण घेऊं. जर्मनीशीं सामना देण्याकरितां इंग्लंड, अमेरिका येथील सरकारांस अगणित कर्ज झालें. या कर्जानें इंग्लंड-अमेरिकेंतील मृत सैनिकांच्या थडग्यांशिवाय प्रत्यक्ष असें दुसरें कांहीं बांधकाम केलें गेलें नाहीं, हेंहि खरें आहे. पण हीं थडगीं बांधून व त्यांकरितां अमाप पैसा खर्चून इंग्लंड अमेरिकेंतील लोकांना हवी असलेली लोकशाही राजवट व सांस्कृतिक परंपरा टिकवितां आली, हें केवढें प्रचंड कार्य करतां आलें! या दृष्टीनें विचार केला असतां चुन्यामातीच्या बंधाऱ्यांपेक्षां लोकांचीं प्रिय जीवनमूल्यें ज्या भक्कम पायावर उभारतां आलीं, त्यांकरितां खर्च झालेला पैसा हा उत्पादक नाहीं असें म्हणणें चुकीचें ठरेल. एवढें मात्र खरें कीं, जें राष्ट्र आक्रमक युद्धांत वारेमाप पैसा खर्च करून पराभव पावतें व त्याकरितां कर्ज उभारतें तें कर्ज अनुत्पादक होय. तसेंच युद्ध जिंकून जर हें राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रांस आपला दास करील व त्यायोगें आपण पुष्ट होईल, तर प्रत्यक्षांत झालेला खर्च सव्याज भरून निघण्याची शक्यता असूनहि तात्त्विकदृष्ट्या हा खर्च अनुत्पादक असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**५. कर्जे उभारण्याचे मार्ग (अ) तिजोरी बिलें**—सरकार खालील तऱ्हांनीं कर्जे उभारतें. जेव्हां सरकारास एक दोन महिन्यांपुरती रोख रकमेची गरज असते, तेव्हां सरकार 'तिजोरी बिलें'[1] बाजारांत विकून पैसा उभारतें. जसें, एखादा खाजगी व्यापारी २।३ महिन्यांत त्याचें येणें येणार आहे; अशा खात्रीनें आपल्या बँकांवर 'अल्पमुदतीच्या हुंड्या'[2] काढतो; तसेंच सरकारहि आपल्या बँकर (मध्यवर्ति बँक–रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया) मार्फत अल्प व्याजावर, अल्प मुदतीच्या हुंडया काढतें. तीन महिन्यांत हा पैसा देण्याचें बंधनच असतें. अशा कर्जावर सरकारास द. सा. द. शें. $\frac{1}{2}$ ते $\frac{3}{4}$ टक्का व्याज द्यावें लागतें; पैसा अल्प मुदतींत मोकळा होत असल्यानें व्याजाचा दर कमी असतो.

**(आ) तिजोरींतील ठेवीची पावती**—याशिवाय ५।६ महिन्यांपुरताच पैसा जरूर असेल तर वरीलसारख्याच दुसऱ्या एका प्रकारचा सरकार अवलंब करतें व तो म्हणजे 'तिजोरींतील ठेवीची पावती'[3] हा होय. यायोगें खाजगी व्यक्तींची मध्यवर्ति बँकेंत जी ठेव असेल ती सरकार आपल्याकडे ठेवून घेतें व

1 Treasury Bills. 2 Bills of Exchange.
3 Treasury Deposit Receipts.

त्याबद्दल बँकेस पावती देतें. हेंहि कर्ज अल्पमुदतीचेंच म्हणजे जास्तींत जास्त सहा महिन्यांपुरतें असल्यानें यावरील व्याजाचा दर वर निर्देशलेल्या हुंडयांपेक्षां कळत नकळत जास्त द्यावा लागतो. हा प्रकार गेल्या महायुद्धांत इंग्लंडनें प्रथमच सुरू केला.

( ३ ) **लांब मुदतीचीं कर्जें**—कर्ज उभारण्याचा तिसरा प्रकार म्हणजे, खुल्या बाजारांत चालू असलेल्या दरानें लांब मुदतीचीं कर्जें उभारणें. खाजगी भांडवलदार जेव्हां एखादा नवीन धंदा काढतो किंवा जुन्या धंद्यास जादा भांडवलाची जरूर पडल्यास तो जसा 'रौप्य बाजारांत' ( नाणेंबाजारांत )[१] जाऊन कर्जरोखे[२] लिहून देऊन, आपल्या कारखान्याच्या तारणावर पैसा जमवितो; तसेंच सरकारहि त्याच बाजारांत आपल्या कर्जरोख्यांवर, जरूर तो पैसा कर्ज म्हणून घेतें. खाजगी भांडवलदारापेक्षां सरकारची पत केव्हांहि मोठी, कर्ज व ठरलेलें व्याज निश्चित मिळेल अशी ठेवीदारांस वाटत असलेली खात्री; यांमुळें सरकारास आपल्या एखाद्या मालमत्तेचें तारण द्यावें लागत नाहीं व खाजगी भांडवलदारापेक्षां व्याजाचा दरहि कमी पडतो. सरकारची सारी मिळकत व करांचें उत्पन्न हेंच अशा कर्जास अप्रत्यक्ष तारण असतें. बाजारांत पैशाची चणचण भासत असल्यास सरकार आपल्या एखाद्या विशिष्ट कराची माफी देणें, शंभर रुपये दराच्या रोख्यांची दर्शनी किंमत कमी ठेवणें, किंवा प्रत्यक्ष व्याजाचा दर पूर्वीपेक्षां जादा ठेवणें, अशा मार्गांनीं ठेवीदारांस सरकारी कर्जरोख्यांत पैसा गुंतविण्यास उद्युक्त करतें. पण हा सारा व्यवहार सरकारास फायदेशीर ठरेलच असें नाहीं. यापेक्षां बाजारांत जो व्याजाचा दर चालू असेल त्या व्याजाच्या दरानें कर्ज काढणें हा जास्त हितकारक मार्ग. वरील तऱ्हेनें बाजारी दरापेक्षांहि जास्त दर दिला जाण्याचा संभव असतो. कमी दरानें कर्ज मिळविण्याकरितां कांहीं कांहीं सरकारें 'बक्षिसाचे कर्जरोखे'[३] काढतात. लॉटरीप्रमाणें ज्या नंबरचे कर्जरोखे पहिल्या दहा नंबरांत येतील, त्यांना ठराविक बक्षिस, असें जाहीर केलें जातें. पण यायोगें सरकार स्वतांच नागरिकांत जुगारी वृत्ति निर्माण होण्यास उत्तेजन देतें असें ठरेल. ज्या सरकारचे कायदे जुगारी वृत्ति दडपण्याकरितां असतात व असले

---

1 Money market. 2 Securities.
3 Prize bonds.

पाहिजेत त्याच सरकारनें असा समाजहितविरोधी कार्यक्रम स्वतःच आंखला तर मग कुंपणानेंच शेत खाल्ल्यावर विचारावयाचें तरी कोणाला अशांतली गत व्हावयाची. हिंदुस्थानांत लढाईच्या काळांत अशा तऱ्हेचे बॉंडस् सन १९४४ सालीं काढले होते. सुधारलेल्या देशांत विशेषतः इंग्लंड, अमेरिकेंत मात्र असा प्रकार दिसून येत नाहीं. आपलें हल्लींचें सरकारहि असा प्रकार चालूं देणार नाहीं. जर्मनी, ऑस्ट्रिया, फ्रान्स, इटली या देशांत अशा प्रकारांनीं कर्जें पूर्वीपासून उभारलीं जातात.

सरकार आपल्या देशांत जसें रौप्यबाजारांत आपल्या नागरिकांकडून कर्ज उभारतें, तसेंच तें इतर देशांच्या रौप्यबाजारांत त्या देशांतील नागरिकांकडूनहि कर्ज उभारूं शकतें. अर्थात् या नागरिकांना परदेशीय सरकारांस कर्ज देणें निर्धोक वाटावें म्हणून तद्देशीय सरकार नैतिक किंवा कांहीं वेळेस कायदेशीर हमीहि देतें. व्याजाचा दर व इतर अटी ज्या त्या वेळच्या रौप्यबाजारांतील घडामोडींवर अवलंबून असतात. अशा रीतीनें परदेशीय नागरिकांनीं विकत घेतलेले कर्जरोखे ते नागरिक पुन्हां शेअरबाजारांत आपल्या देशांतील नागरिकांस विकूं शकतात; व असे सर्वच कर्जरोखे तेथील नागरिकांनीं घेतल्यास तें पुन्हां अंतर्गत कर्ज होतें.

या तिसऱ्या तऱ्हेच्या कर्जास लांब मुदतीचें किंवा निधिसम[1] कर्ज असेंहि म्हणतात. याउलट पहिल्या दोन प्रकारच्या कर्जास 'प्रवाही' कर्ज (चालू)[2] असें म्हणतात. हें प्रवाही कर्ज कमी मुदतीचें व अल्प व्याजाच्या दराचें असल्यानें सरकारची असें कर्ज काढण्याकडे फार प्रवृत्ति होते. यायोगें मुदत भरल्यावर परत करण्याचे वेळेस सरकारची त्रेधा उडण्याचा संभव निर्माण होतो. इतका पैसा हातीं येईल या अपेक्षेपेक्षां जर जास्त प्रवाही कर्ज काढलें तर तें सारें परत देतां येणेंच अशक्य, मग हें कर्ज सरकार लांब मुदतीच्या कर्जांत बदलून घेतें. पण अशानें सरकारच्या पतीस धक्का बसतो; व याचाच परिणाम म्हणून लांबमुदतीचीं कर्जें बाजारांत मिळणें दुरापास्त होतें. तात्पुरती गरज भागविण्या-करितां हवीं तेवढीं प्रवाही कर्जें काढण्याचा मोह सरकारी फडणविसांस होण्याचा संभव असतो, पण पुढील धोका लक्षांत घेऊन तो आवरण्याचा प्रयत्न करणें अत्यावश्यक आहे.

---

1 Funded. 2 Floating.

( ई ) **वर्षासनपद्धतीचीं कर्जें**—कांहीं कांहीं वेळेस वर्षासनपद्धतीचीं कर्जें उभारलीं जातात. समजा, श्री. ' अ ' सरकारास या पद्धतीनें १००० रु. कर्जाऊ देतो. सरकार त्यास सांगतें कीं, आम्ही तुम्हांस वर्षास १२५ रु. प्रमाणें दहा वर्षें देत जाऊं व दहाव्या वर्षाअखेर तुमचें कर्ज फिटलें असें समजावयाचें. चालू व्याजाचा दर लक्षांत घेऊनच ही वर्षासनाची रक्कम ठरविली जाते. ही पद्धति सावकारास पसंत पडेल, पण सरकारास दरवर्षी ही ठराविक रक्कम उभारण्याची विवंचना पडते. त्यामुळें सरकारी अर्थसचिवांच्या दृष्टींत ही पद्धति सहसा भरत नाहीं.

( उ ) **चलनवाढ**—कर्ज आणि तेंहि बिनव्याजी उभारण्याच्या वर दिग्दर्शित केलेल्या सर्व प्रकारांपेक्षां एक सोपा व गमतीदार प्रकार आहे. पैशाच्या अडचणींत सांपडलेलीं सरकारें या मार्गाचा अधूनमधून अवलंब करतात, पण त्यांस धरबंद न राहिल्यानें दिवाळखोर बनतात. पण तींच सुज्ञ सरकारें सुवर्णाचीं अंडीं घालणाऱ्या हंसीप्रमाणें या प्रकाराचा उपयोग करून घेतात. हा प्रकार म्हणजे जरूरीप्रमाणें सरकारी टांकसाळींत नोटा छापून घेणें हा होय.

सरकारची मध्यवर्ति बँक-हिंदमध्यें तिला रिझर्व बँक म्हणतात-मध्यवर्ति संसदेनें केलेल्या कायद्यान्वयें सोन्याच्या तारणावर तितक्याच किंमतीच्या नोटा व यांशिवाय ठराविक अधिक नोटा छापते व त्या वापरांत ठेवते. जेव्हां पैशाची जादा गरज लागते व जेव्हां कर व कर्ज या राजमान्य मार्गांचा असा पैसा उभारण्याकरितां या ना त्या कारणामुळें अवलंब केला जात नाहीं; तेव्हां सरकार आपल्या सावकारांचें देणें देण्याकरितां मध्यवर्ति बँकेकडे वचनचिठ्ठया[1] ठेवून या तारणावर तिच्या मार्फत जादा नोटा छापतें. यायोगें व्यवहारांतील चलन फुगतें व त्याबरोबर पदार्थांच्या किंमती वाढतात व त्याचाच परिणाम म्हणून पगारी नौकर व मजूर यांना त्यांच्या हातांतील पैशावर पूर्वीसारख्या गरजा भागवितां येत नाहींत. त्यांच्यांत असंतोष माजतो. बहुसंख्य लोकांत असंतोष माजला व तो वाढत चालला कीं, राज्यक्रांति होते. या सर्व कारणांकरितां या मार्गाचा उपयोग फारच जपून करावा लागतो. लोकांच्या विशिष्ट मनोभूमिकेमुळें लोक सोन्यांत आपला पैसा गुंतवूं लागले, किंवा काळ्या बाजारांतील पैसा कर्ज म्हणून सरकारास

1 Securities.

देण्यास लोक धजावत नाहींत असें दिसून आलें, तर या मार्गाचा अवलंब करणें सरकारला अपरिहार्य होतें. पण त्याबरोबरच सतत प्रचारानें लोकमत अनुकूल करून पुरोगामी करवाढीनें अत्यावश्यक वस्तूंच्या किंमतीवर नियंत्रण व त्यांचें ठराविक प्रमाणांत वांटप करून जादा छापला गेलेला पैसा परत सरकारी तिजोरींत खेंचला गेला, तर मग अशा चलनवाढीचा परिणाम लोकांस जाणवणार नाहीं. अशा स्थितींत हें बिनव्याजी कर्ज न ठरतां त्यास जादा पैसा निर्माण करून जादा कर गोळा करण्याचा एक प्रकार असें म्हणावें लागेल. या कारणाकरितां व वस्तुतः हा जादा निर्माण केलेला पैसा कोणाला कर्जाची फेड म्हणून परत द्यावयाचा नसतो या दुसऱ्या कारणाकरितां, तांत्रिक भाषेंत या पैसा उभारण्याच्या प्रकाराला ' कर्ज ' अशी संज्ञा देत नाहींत. पण प्रत्यक्ष करवाढीनें हा जादा पैसा सरकारच्या तिजोरींत येत नसल्यानें व चलनवाढीचा दुष्परिणाम टाळावयाचा झाल्यास जी जादा करवाढ केली जाते ती या जादा चलनाचें एक प्रकारचें तारण असल्यानें आपण या प्रकाराची राष्ट्रीय कर्जाच्या प्रकरणांत चर्चा केली आहे, एवढेंच.

( ऊ ) **कायमचें कर्ज**—इंग्लंड, फ्रान्स या देशांस पूर्वीच्या लढायांमुळें बरेंच मोठें कर्ज झालें आहे. इ. सन १८१७ मध्यें इंग्लंडला ८५० दशलक्ष पौंड कर्ज किंवा अदमासें १२०० कोट रुपये कर्ज होतें. हें सर्व कायम स्वरूपाचें[1] असें समजलें जातें. हा लांब मुदतीच्या कर्जाचाच एक प्रकार आहे.



1 Perpetual.

# प्रकरण १३ वें

# कर्जांची परतफेड

**१. कर्जाचा एकंदर बोजा व त्याचा परिणाम**—कर्ज हें राष्ट्राच्या तिजोरीवरील एक मोठाच बोजा आहे. हा बोजा पुढें केव्हांतरी १०–२० वर्षांत द्यावयाचा आहे, म्हणून उद्यांची काळजी करून, आजचीं सारीं सुखस्वप्नें धुळीस मिळवून आजच्या आनंदात कां विरजण घालावयाचें, असें म्हणूनहि चालत नाहीं. कर्जाचा बोजा हा बरेच दिवसांपासून चालत आलेला आहे, व ठरलेल्या वेळीं परतफेड होत नसल्यानें व नवीन नवीन कर्जें काढलीं जात असल्यानें तो उत्तरोत्तर वाढत जातो आहे. इ. स. १७९२ पासून आपल्या सरकारकडे कर्जाचा वारसा चालत आलेला आहे. त्यावेळीं हिंदसरकारला ७ दशलक्ष पौंड किंवा अदमासें १० कोट रुपये कर्ज होतें. पण त्यावेळीं सर्व हिंदुस्थानभर एक सरकार नव्हतें, व निरनिराळ्या सरकारांचीं वेगवेगळीं कर्जें एकत्र केलीं तर हा बोजा बराच मोठा होईल असें गृहीत धरावें लागेल. त्यामुळें या वर्षाऐवजीं इ. स. १८५८ हें वर्ष मूळ वर्ष[1] असें धरलें, तर त्या वर्षी ६९½ दशलक्ष पौंड किंवा अदमासें १०० कोट रुपये कर्ज होतें. तेंच आज १९५१ सालीं विभागलेल्या हिंदसरकारचें कर्ज २५७८ कोट रुपये आहे. तशांतच गेल्या महायुद्धांत इंग्लंडचें हिंदुस्थानला असलेलें जवळजवळ ६०० कोट रुपयांचें कर्ज (हा आंकडा सन १९३१ सालीं ५१७ कोट रुपये होता) फिटून, उलट अविभाज्य हिंदचेंच इंग्लंडला लढाईच्या शेवटीं १७३६ कोट रुपये कर्ज होतें, ही गोष्ट लक्षांत घेतली तर हा कर्जाचा आंकडा किती फुगला आहे याची कल्पना येईल. अशा या वाढलेल्या कर्जावरील व्याज सालोसाल द्यावयाचें म्हणजे कर भरणाऱ्या नागरिकांवर तो एक खरोखरच मोठा बोजा आहे यांत संदेह नाहीं. या व्याजावरील

---

1 Basic year.

उत्पन्नावर द्यावा लागणारा प्राप्तिकर, व्याजाचा एकंदर बोजा थोडा कमी करतो, हीच काय ती त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट.

बरें, एवढयावरच ही कथा संपत नाहीं. कर्जावर अव्याहतपणें व्याज मिळत असल्यानें, ज्या कांहीं लोकांच्या बापजाद्यांनीं कधींकाळीं सरकारी कर्जरोखे विकत घेतले असतील, अशीं घराणीं पिढयानुपिढया इकडची काडी तिकडे न करतां, आपला योगक्षेम सुखेनैव चालवीत असतात. याचाच अर्थ कर्जाच्या योगें कांहीं लोकांची काम करण्याची व संचय करण्याची वृत्ति मारली जाते. कारण त्यांना असें कांहीं करण्याची गरजच नसते. मागें करकसोट्यांविषयींचें विवेचन करतांना आपण पाहिलें कीं, लोकांच्या काम करण्याच्या व संचय करण्याच्या वृत्तींस मारक अशी करपद्धति नसावी. याचाच अर्थ असा कीं, सरकारचें आर्थिक धोरण वरील वृत्तींस पोषक असावें. कर्जाच्या योगानें तर अशी गोष्ट घडत नाहीं. एवढेंच नव्हे तर, या योगें समाजाच्या निरनिराळ्या थरांतील असलेली आर्थिक विषमता भूमितिश्रेणीनें वाढतच जाते.

असें जरी आहे तरी कर्जच काढूं नये असें मात्र म्हणतां येत नाहीं हें आपण मागील प्रकरणांत पाहिलेंच आहे. यावरून कर्ज काढावयाचेंच तर तें शक्य तितक्या लवकर फेडलें पाहिजे हें सिद्ध होतें. कर्जफेडीचा विचार करण्यापूर्वी आणखी एकदोन बाबींचा विचार अवश्य आहे.

२. **कर्ज फेडावें लागतें का?**—असा एक विचार मांडला जातो कीं, कर्जाचा इतिहास पाहूं गेलें असतां, आजपावेतों कोणत्या राजानें आपलें सारें कर्ज फेडलें आहे? तो राजा आपल्या हयातींत शक्य तेवढें कर्ज काढीत असे व त्याच्यामागून येणारा राजा, तें कर्ज फेडणें हें आपलें कायदेशीर किंवा नैतिक कर्तव्य आहे, असें क्वचितच समजत असे.

राज्यक्रांतींत तर बदललेल्या राजवटीवर पूर्वीच्या राजवटींत झालेलें कर्ज फेडण्याचें कायदेशीर बंधन थोडेंसें आहे असें मानलें, तरी नैतिक बंधन मुळींच नसे. प्रत्यक्ष व्यवहारांत बदललेल्या राजवटीनें राज्यक्रांतीनंतर मागील कर्ज एक तर दिलेलें नाहीं, किंवा देण्यांत अळंटळं तरी केलेली आहे.

हुकुमशाही सरकारांची रीत पाहिली तर त्यांनीं जरूर तेव्हां कर्जाची फेड करण्याचें साफ नाकारलें आहे. आतां लोकशाही राजवटींतदेखील पूर्वीच्या

जादा दराच्या कर्जांचें नवीन कमी दराच्या कर्जांत रूपांतर करून, ( असें रूपांतर जगांतील जवळ जवळ साऱ्या राष्ट्रांत १९३२ सालीं केलें गेलें. इंग्लंडनें आपला व्याजाचा दर ५ वरून ३½ वर आणून व्याजाच्या रकमेंत दरसाल ३० दशलक्ष पौंडांची बचत केली ) किंवा चलनाचें अवमूल्यन करून कर्जाचा वास्तविक बोजा कमी केला जातोच कीं नाहीं ! आतां एवढें मात्र खरें कीं, अद्याप कोणत्याहि लोकशाही सरकारनें कर्जच देत नाहीं, म्हणून खाका वर केल्या नाहींत. पण प्रत्यक्षांत आपल्यावरील कर्जाचा बोजा कोणींच कमी केला नाहीं. तो दिवसें-दिवस वाढतोच आहे. हल्लीं तर प्रत्येक सरकारनें जनता-कल्याणाचें कंकण बांधलें असल्यानें, हा बोजा नजिकच्या भविष्यकाळांतच कमी होण्याची शक्यता तर नाहींच, किंबहुना तो फार झपाटयानें वाढेल अशी शक्यता उत्पन्न झाली आहे. अशा परिस्थितींत कर्ज परत फेडण्याची भाषा बोलण्याऐवजीं कर्जावरील व्याजांत कर्ज वापरावें, व मुदलाची परतफेड करण्याचें किंवा अजिबात कर्ज नाकारण्याचें कार्य पुढील पिढीवर सोंपवावें, हा सर्वांत सोपा मार्ग ठरला आहे.

ह्या विचारसरणींत एका मूलभूत मुद्दयाचा विसर पडलेला दिसतो. एवींतेवीं सरकारवरील कर्ज म्हणजे आम जनतेवरील कर्ज. मग अशा उत्तरोत्तर वाढणाऱ्या कर्जावरील वाढणारा व्याजाचा बोजा लोकांवर लादून समाजांतील कांहीं लोकांस आळशी व बेजबाबदार बनविण्यापेक्षां, तो जबर कर लादून कमी करणेंच इष्ट नाहीं का ? नुसत्या व्याजांत कर्ज वापरतां येत असेल, तर एखादे वेळीं तें वावगें वाटणार नाहीं. पण त्यायोगें आर्थिक विषमता वाढत जाते. तेव्हां ज्या लोकांस व्याज द्यावयाचें, त्यांच्यावरच कर-कसोटयांस उतरेल असा जबर कर लादून, त्यांना द्यावें लागणारें व्याजहि न देणें हें केव्हांहि श्रेयस्कर नव्हे काय ?

**३. कर्जविमोचनाचे मार्ग**—कर्जाची परतफेडच करावयाची म्हटलें तर ती दोन मार्गांनीं करतां येईल. पहिला राजमान्य मार्ग म्हणजे तें सव्याज परत करणें व दुसरा म्हणजे तें अजिबात बुडविणें. या दुसऱ्या मार्गाचा प्रथम विचार करूं.

**( अ ) कर्ज अजिबात बुडविणें**—कर्ज बुडविणें हा विचारच मुळीं प्रथमदर्शनीं तरी कसासाच वाटतो. लोकांनीं कष्ट करावेत, पोटाला चिमटा ध्यावा व पुढें सुखांत दिवस काढूं, या मोठया आशेनें सरकारसारख्या सर्वमान्य

कर्जदारास जवळची पुंजी कर्जाऊ द्यावी, व त्यानेंच देत नाहीं असें म्हणावें हा कसला न्याय ? हा जंगली कायदा झाला. मग राज्यव्यवस्था तरी कशास हवी ? हम करेसो कायदा, किंवा बळी तो कान पिळी, ह्या जंगलांतील न्यायाचा मनुष्य-व्यवहारांत देखील उपयोग सर्रास करावा काय ? थोडा विचार केला असतां ही विचारसरणी अत्यंत एकांतिक आहे हें दिसून येईल.

कर्जे कोण देऊं शकतो ? ज्याच्या त्याच्या कल्पनेप्रमाणें स्वतांच्या सर्व गरजा भागल्यानंतर, जी त्याच्याजवळ शिल्लक राहील ती तो कर्जाऊ म्हणून देऊं शकेल. मोठमोठे पगारी नौकर, वर्षाकांठीं हजारों रुपये मिळविणारे व्यापारी व लाखोंनीं कमाविणारे उद्योगपति, आपल्या हव्या त्या गरजा भागविल्यानंतर, बरीच मोठी रक्कम शिल्लक ठेवूं शकतात. त्यांनीं कर्जाऊ म्हणून ज्या रकमा सरकारकडे ठेवलेल्या असतात, त्या एकदम नाकारल्या तर त्यांना आपलें राहणीचें मान मात्र कमी करावें लागेल व मुळांत कल्पना नसल्यामुळें आर्थिकदृष्ट्या थोडासा त्रास सोसावा लागेल. पण जे लोक वर्षाकांठीं शें-दोनशें रुपये जेमतेम शिल्लक ठेवून आपल्या आपत्कालाची तरतूद करतात, त्यांनीं सरकारला दिलेलीं कर्जे जर नाकारलीं तर मात्र अशा लोकांना आकाशांतून कुऱ्हाड कोसळल्यासारखें होईल. बरें, अशा रीतीनें कर्जे जप्त करणाऱ्या सरकारनें त्यांच्या आपत्कालाच्या चिंता दूर करण्याची व्यवस्था केली तर त्यांना कर्जे नाकारल्याचेंहि कांहीं वाटणार नाहीं. परंतु सध्यांच्या भांडवलदारी समाजव्यवस्थेंत तशा तऱ्हेचे अद्याप तरी फारसे प्रयत्न झालेले दिसत नाहींत. यावरून फार तर एवढें म्हणतां येईल कीं, खालच्या मध्यमवर्गाच्या कर्जाचा पैसा अजिबात जप्त करूं नये व बाकीच्या वर्गांचा शेंकडा ५-१० टक्के भाग त्यांना नवीन परिस्थितीशीं समरस होण्याकरितां थोडी मदत म्हणून ठेवून बाकीचा जप्त करावा. असें करण्यांत प्रत्येकानें वेगवेगळ्या वेळीं कर्जे काढलीं असल्यानें कोणाचें किती कर्ज हें ठरविण्यांत कारभारविषयक बऱ्याच अडचणी निर्माण होतील. पण असें केलें, तरी सरकारनें अशा रीतीनें स्वतःच आपल्यावर असलेलीं कायदेशीर व नैतिक बंधनें झुगारून द्यावींत कीं काय, या प्रश्नाचा विचार पूर्ण होत नाहीं.

एक तर ह्या तऱ्हेची इस्टेट असलेल्या लोकांविरुद्धच निव्वळ अशा तऱ्हेचें शस्त्र उगारून चालणार नाहीं. असलें शस्त्रच उगारावयाचें तर इतर तऱ्हेनें उपभोगीत

असलेल्या सर्वच जंगम व स्थावर इस्टेट धारण करणारांविरुद्ध तें उपसावें लागेल. याचा अर्थ आपण समाजक्रांतीस तयार झालों आहोंत असा होईल. लोकशाहीच्या अर्थव्यवस्थेचा विचार करणारांस तो मुद्दा प्रस्तुत नाहीं. आतां असा मुद्दा उपस्थित केला जातो कीं, सध्यांच्या विशिष्ट समाजरचनेमुळें समाजांतील इस्टेटवाले लोक जास्त श्रीमंत होतात व बिगरइस्टेटवाले गरीब, गरीबच होत जातात. तेव्हां ज्या इस्टेटवाल्यांनीं सर्व समाजाच्या जिवावरच आपल्या इस्टेटी केल्या, त्यांस त्या समाजावर आपल्या कर्जाचा व त्यावरील व्याजाचा बोजा अमर्याद कालपर्यंत टाकण्याचा नैतिक अधिकार नाहीं. ज्या लोकांचीं सरकारकडे २० वर्षांहून अधिक कालपर्यंत कर्जे आहेत, त्यांचीं कर्जे जप्त करावींत. असें करण्यास दुसरींहि सबळ कारणें आहेत. कर्जे देणारा हा बहुधा वयातीत माणूस असतो, त्याच्या कर्जाचा त्याला फारसा उपभोग मिळत नाहीं, पण तो बोजा मात्र दुसऱ्या तरुण नागरिकांवर ठेवून जातो. कर्ज किंवा त्यावरील व्याज तरुणांच्या परिश्रमानें फिटूं शकेल, एरव्हीं नाहीं. तसेंच कर्जाचा बोजा ऐतखाऊ लोकांपेक्षां कामकऱ्यांवरच अधिक पडतो, कारण त्यांच्याच श्रमानें तो दिला जाणें शक्य आहे. या व अशा कारणांवरून कर्जे कांहीं काळानंतर तरी जप्त करावींत असें म्हटलें जातें.

या कारणांवरूनहि कर्जे जप्त करावयाचीं म्हटल्यास तें समाजक्रांतीनंतरच शक्य आहे. हल्लींचीं लोकशाही सरकारें कर वाढविण्यास भितात तर मग कर्जे जप्त करण्याइतकें मनोधैर्य तीं दाखवितील असें मानणें हें खुळेपणाचें लक्षण होय.

याशिवाय कर्जे जप्त न करण्याबाबत एक व्यावहारिक मुद्दा मांडला जातो. एकदां सरकारनें कर्ज जप्त केल्यावर पुन्हां सरकारला कर्ज मिळणार नाहीं; त्यामुळें कर्जे जप्त करणें म्हणजे आपल्या हातानें, आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखें आहे. पण यांतहि फारसें तथ्य दिसत नाहीं. मध्यकाळांत राजेलोक कर्जे काढीत व त्यांचेनंतर येणारा तीं बुडवी. तथापि त्याला पुन्हां कर्जे मिळतच. लोकशाही सरकारनेंदेखील एकदां कर्ज बुडविलें, पण पुन्हां योग्य प्रचारानें व कृतीनें आपली पत वाढविली तर त्या सरकारासदेखील परत कर्ज मिळूं शकेल. सरकारमधील फडणीस व इतर मंत्रि सारखे बदलत असतात, त्यामुळें जनतेच्या विश्वासांतील दुसरें सरकार अस्तित्वांत आलें तर, त्यास हमखास कर्ज मिळेल.

तसेंच खाजगी व्यक्तीदेखील एकदां कर्ज बुडविल्यावर पुन्हां तें मिळवूं शकतात हा आपला व्यवहारांतील अनुभव आहेच. थोडा वेळ लागतो एवढेंच. तशांतच मनुष्यस्वभाव विसराळू असतो व समाजमन तर फारच विसरभोळें असतें. त्यामुळेंहि अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. आतां परकीयांचें कर्ज बुडविलें तर त्या देशांतील सरकार धाकदपटशा, आर्थिक कोंडी, वेळप्रसंगीं लष्करी कारवाई, या प्रकारांनीं एतद्देशीय सरकारास जेरीस आणूं शकेल. पण त्याबाबतहि येथलि सरकारनें मनाची खंबिरी दाखविल्यावर फारसें कांहीं होऊं शकत नाहीं, असा अनुभव आहे. रशियानें सन १९२० सालीं परकीयांचें कर्ज नाकारलें. त्याविरुद्ध परकीयांनीं आर्थिक धाकदपटशा वगैरे प्रयोग करून पाहिले. तथापि रशियन सरकार नमलें नाहीं. कांहीं अर्थशास्त्रज्ञ आर्थिक कोंडीनें रशियाचें, कर्ज देण्यापेक्षां जास्त नुकसान झालें असें प्रतिपादतात. पण तो वादग्रस्त मुद्दा आहे.

असें जरी असलें तरी सरकारनें कर्ज नाकारण्याचा जनमनावर फारच विपरीत परिणाम होण्याचा संभव असतो. राज्यक्रांतीनंतरदेखील असे प्रकार लोकांस अप्रिय वाटतात, मग शांततकाळांत असे प्रकार जनता सुखामुखीं सहन करणें शक्य नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर तयार केलेल्या घटनेंत पूर्वींचीं सारीं कर्जें प्रमाण मानून तीं दिलीं पाहिजेत असें कलम ग्रथित केलेलें आहे.

तसेंच कर्जावर व्याज मिळण्याच्या आशेनें लोकांत पैसे शिल्लक ठेवण्याची प्रवृत्ति जोपासली जाते, तिला या प्रकारानें आळा बसेल.

कांहीं झालें तरी लोकांत सामाजिक व त्याबरोबरच आर्थिक स्थैर्याची परिस्थिति निर्माण करणें हा कोणत्याहि राजवटीचा हेतु असतो. तेव्हां एकदम कर्ज नाकारण्यानें लोकांना जीवनांत कशाविषयींच शाश्वती वाटणार नाहीं.

एकंदरींत कर्ज नाकारणें हें कांहीं हितावह आहे असें दिसत नाहीं. हा शब्दप्रयोगच मुळीं अत्यंत अप्रिय आहे. परकीय सरकारचें कर्ज देणें अशक्य झाल्यास ' हप्ते स्थगित ' केले आहेत, ' योग्य काळीं देऊं ', अशांसारखे शब्दप्रयोग वापरतात. पहिल्या महायुद्धांत झालेलें अमेरिकेचें कर्ज इंग्लंडनें अशाच पद्धतीनें नाकारलें. तशाच पद्धतीनें देण्याची भाषा बोलत बोलत, कर्ज नाकारणें बरें. तेव्हां अशा किंवा तत्सम पद्धतीनें कर्ज कसें फेडतां येईल याचा विचार करूं.

**( आ ) निधि निर्माण करणें**—कर्जफेडीकरितां एक निधि[1] निर्माण करण्याची पद्धति आहे. दरवर्षी अंदाजपत्रकाच्या वेळीं त्यांत कांहीं ठराविक रक्कम टाकली जाते. व या रकमेचा उपयोग कर्ज फेडण्याकडे करावयाचा असें ठरविण्यांत येतें. सन १९२८ सालीं अमेरिकेनें या पद्धतीनें २० वर्षांत व इंग्लंडनें ५० वर्षांत आपलें राष्ट्रीय कर्ज फेडण्याचें ठरविलें होतें. पण सन १९२९ पासून जागतिक आर्थिक मंदीस सुरवात झाली, त्यामुळें हा प्रश्न पुन्हां थंडकुपींत[2] टाकण्यांत आला. त्यानंतर १९३९–४५ चें महायुद्ध व तदनंतरचें शीतयुद्ध व सध्यां जागतिक अर्थव्यवहारांत येणारी अनवस्था, यांमुळें हा प्रश्न पुन्हां बरेच दिवस हातीं घेतला जाईल, असें चिन्ह सध्यां तरी दिसत नाहीं. दरम्यान कर्जाचा बोजा मात्र उत्तरोत्तर फुगत आहे.

हा निधि प्रत्येक वर्षी वाढत्या प्रमाणांत जमवावयाचा, ठराविक प्रमाणांत सांठवावयाचा किंवा कमी कमी प्रमाणांत जमवावयाचा, तसेंच थोड्या मुदतीच्या, लांब मुदतीच्या किंवा कायम स्वरूपाच्या कर्जांत कोणत्या प्रमाणांत हा जमाविलेला निधि वांटावयाचा, अशा निरनिराळ्या दृष्टींनीं हा विचार करितात. पण हे प्रश्न देशकालपरिस्थितीनुरूप हाताळले जातात. त्यांत तात्त्विकदृष्ट्या विवेचन करण्यासारखें कांहीं नाहीं.

हा निधि जमावेला तरी तो कर्जफेडीकरितां निश्चित वापरलाच जाईल याची खात्री देतां येत नाहीं. अडचणींत सांपडलेले अर्थसचिव यावर केव्हां हल्ला करतील याचा नेम नाहीं. म्हणून ही पद्धति कर्जफेडीस फारशी योग्य आहे असें म्हणवत नाहीं.

**( इ ) भांडवलपट्टी लादणें**—१९२० ते ३० च्या दशकांत अर्थज्ञ, मुत्सद्दी व जनता यांत वादाचा विषय बनलेली भांडवली कराची[3] एक पद्धति आहे. या पद्धती–अन्वयें कर्जफेडीकरितां म्हणून भांडवलदारावर पुरोगामी पद्धतीनें एक कर आकारावयाचा, व त्याचा उपयोग निव्वळ कर्ज फेडण्याकरितां करावयाचा असें उद्दिष्ट असतें. पण यावर कारभारविषयक गुंतागुंत फार निर्माण होते, असा एक आक्षेप घेतला जातो. प्रत्येकाच्या भांडवलाची मोजदाद कशी

---

1 Sinking Fund. 2 Cold Storage.
3 Capital levy.

करावयाची, व केली तर समजा, एखाद्याजवळ रोख रक्कम देण्यास नसेल तर त्याची इस्टेट सरकारनें घेऊन काय करावयाचें? अशा वेळीं भांडवलदार व बँका आर्थिक अराजकाचें रान उठवून सरकारच्या मार्गांत नाना विघ्नें आणण्यास कमी करणार नाहींत, अशीहि दुसरी भीति बाळगली जाते. अशा स्थितींत लोकांच्या हलाखींत आणखी भर पडण्याचा संभव निर्माण होतो. करायला जावयाचें एक व व्हावयाचें भलतेंच.

या कारभारविषयक अडचणींशिवाय दुसरीहि एक अडचण असते. ज्यावेळीं लोकांजवळ खूप पैसा खेळता असतो अशा काळांत ही पद्धति यशस्वी होण्याचा बराच संभव असतो. या हातानें आलेला पैसा दुसऱ्या हातानें द्यायला कांहीं वाटत नाहीं. सन १९२० सालीं किंवा सन १९४५ सालीं म्हणजे महायुद्धें संपण्याच्या वेळीं जेव्हां लोकांच्या हातांत बराच पैसा होता त्यावेळीं अशा तऱ्हेची लेव्ही यशस्वी होऊं शकली असती, पण आर्थिक मंदीच्या काळांत ही पद्धति असलेल्या अडचणींत आणखी भर घालते. या कारणांनीं या पद्धतीचा अवलंब करण्यास अद्याप कोणी अर्थसचिव धजला नाहीं.

( ई ) **चलनवाढ**—याशिवाय कर्जफेड करण्याची आणखीहि एक पद्धति आहे. जरूर तीं चलनवाढ[1] करून सरकारनें आपल्या खांद्यावरचा कर्जाचा बोजा सर्व जनतेवर टाकावयाचा व आपण त्यांतून मुक्त व्हावयाचें. मागील प्रकरणांत चलनवाढ म्हणजे एक प्रकारचें बिनव्याजी कर्ज किंवा एक विशिष्ट कर होय, असें आपण म्हटलें आहे. एवींतेवीं लोकांकडून कसल्या ना कसल्या तरी रीतीनें कर वसूल करून कर्ज द्यावयाचें तर हा सर्वांत सोपा मार्ग बरा, असें साहजिकच कोणासहि वाटेल. पण चलनवाढीनें ठराविक प्राप्तीच्या लोकांवर, विशेषतः मध्यमवर्गावरच, या तऱ्हेच्या कराचा बोजा पडतो. वस्तुतः अशा वर्गावर कमी कर असणें इष्ट, असें असतांना हाच वर्ग मारला जातो. हा वर्ग संचय करण्याच्या वृत्तीचा असल्यानें, धंद्यास लागणारें भांडवलहि मिळूं शकणार नाहीं, अशा तऱ्हेची या पद्धतीवर टीका केली जाते, व ती रास्तहि आहे. चलनवाढ झाली म्हणजे वस्तूंचे भाव वाढले जातात, व त्यायोगें अशा वर्गाची वास्तविक प्राप्ति[2] कमी होते.

---

1 Inflation. 2 Real Income.

चलनवाढीचे हे दुष्परिणाम जर आपण टाळूं शकलों नाहीं, तर मात्र श्रीमंतांना अधिक श्रीमंत व गरिबांना अधिक गरीब करणारी ही पद्धति घातुक होय यांत शंका नाहीं. पण तेच हे दुष्परिणाम टाळतां आले तर मात्र लोकशाही सरकारास हा एक वर ठरेल.

आमच्या मतें हे दुष्परिणाम टाळतां येणें शक्य आहे. मध्यम व कनिष्ठ वर्गाच्या दैनंदिन खर्चांत अन्न, कापड व जागाभाडें ह्या खर्चाच्या तीन मुख्य बाबी आहेत. ह्यांच्या किंमतींत या नवीन चलनवाढीनें जर वाढ झाली नाहीं तर मग ह्या पद्धतीविरुद्ध कुरकूर करण्यास वाव राहणार नाहीं. ह्या तीन बाबींच्या किंमतींवर पूर्ण नियंत्रण ठेवलें व त्यांची वांटणी न्याय्य पद्धतीनें केली तर हा प्रश्न त्रासदायक होणार नाहीं. चलनवाढीनें सर्वच वस्तूंच्या किंमतींत वाढ होत असल्यानें, अन्नधान्य व कापडाच्या उत्पादनखर्चांतहि वाढ होईल. तथापि मक्तेदारी पद्धतीनें सरकारनें या जिनसांची खरेदी करून खरेदी व नियंत्रित विक्री यांतील फरक सरकारनें स्वतां सोसावा, किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे हल्लीं जसें सरकार आयात धान्याच्या किंमती महाग पडत असल्यानें, तें नियंत्रित दरांत विकतां यावें म्हणून हा फरक स्वतां सोसतें, तसेंच वरील प्रसंगीं करावें लागेल. ह्या प्रकारच्या खर्चास सध्यां मदत[1] असें म्हटलें जातें. जागाभाड्याच्या बाबतदेखील ठराविक प्राप्तीच्या नौकरवर्गास जागाभाड्याच्या निर्देशांकावर ठराविक जागाभाडें म्हणून देत जावें. मध्यवर्ति व प्रांतिक सरकारें हल्लींहि अशा रीतीनें जागाभाडें आपल्या नौकरांस देतात. याबरोबरच श्रीमंत लोकांच्या हातांत जाणारा जादा पैसा, जादा करवाढीनें कमी करावा. पैशाचा मुबलक पुरवठा असल्यावर भूमितिश्रेणीनें कर आकारला असतां फारशी कुरकूर होण्याचेंहि कारण नाहीं. याबाबत कर्जरोख्यांची किंमत परत देतांनाच ती प्राप्तिकर भरल्याचा दाखला दिल्यानंतरच दिली जावी, अशी व्यवस्था करतां येणें शक्य आहे. यामुळें चलनांतहि एकदम वाढ होणार नाहीं. याच्या जोडीला आयातीवर व परदेशी चलनांत पैशाचें रूपांतर करण्याच्या व्यवहारावर पूर्ण नियंत्रण घातलें, तर या चलनवाढीनें अनिष्ट परिणाम होण्याचें कारण दिसत नाहीं.

---

1 Subsidy.

थोडक्यांत म्हणजे चलनास आपला मालक बनूं देण्यापेक्षां त्यास आपला एकनिष्ठ चाकर बनविला पाहिजे. या प्रकारास चलनवाढ[1] हें अनिष्ट गुणांनीं युक्त असें लोकविश्रुत झालेलें नांव न देतां, नियंत्रित-चलन[2] असें नांव देणें जास्ती श्रेयस्कर. या प्रकारानें सरकारी खर्चांत वाढ होईल व त्याबरोबरच कर्जावरील व्याज बंद झाल्यानें प्राप्तिकर व इतर करांचें उत्पन्न कमी होऊन, सरकारी उत्पन्नांत घट होईल, हें खरें. पण व्याजाचा बोजा व कर्जाचा बोजा हे दोन्ही कमी होतील व कर्जाचा पैसा परत आल्यावर तो पुन्हां गुंतविण्यानें नवीन धंदे वाढून त्यापासून कराच्या उत्पन्नांत वाढ होईल. हे फायदे वर उल्लेखिलेल्या तोटयास पुरून उरणारे आहेत.

चलनवाढीस नाकें मुरडणारे अर्थशास्त्रज्ञ चलनवाढ हें लोकशाही सरकारचें अगदीं जुळें भावंड आहे, हें सोईस्कर रीत्या विसरतात. नाहींतर सन १९१० पूर्वीं १० रुपये पगारावर नौकरी करणारा शाळामास्तर ५।६ माणसांचें कुटुंब, बसायला एखादें घोडें बाळगून व्यवस्थित चालवीत असे, तोच सध्यां ८० रुपये मिळवूनहि दोन वेळेला भरपूर खाऊं शकत नाहीं, याची सुसंगति कशी लावणार? अर्थात् लोकसंख्येची वाढ, वापरांत येणाऱ्या जिनसांच्या संख्येंतील वाढ, यामुळें त्यावेळेपेक्षां सध्यां चलनाची जरुरी जास्त. म्हणून थोडी चलनवाढ अपरिहार्य, हें कबूल करूनहि त्यावेळेपेक्षां प्रमाणाबाहेर सध्यां चलनवाढ झालेली आहे, हें नाकबूल करितां येणार नाहीं. यावरून बोध एवढाच घ्यावयाचा कीं, मागचा पुढचा विचार न करितां बेजबाबदारपणें चलनवाढ करणें वेगळें व विचारपूर्वक योग्य नियंत्रणांनीं जखडून चलनवाढ करणें वेगळें.

बँकेचा व्याजाचा दर वाढल्यानें किंवा आर्थिक मंदीनें कर्जरोख्यांच्या ऐन किंमतींत घट आल्यास त्याचा फायदा घेऊन सरकारनें चलनवाढ करून कर्जरोखे विकत घेतल्यास सरकारवरील कर्जाचा बोजाहि हलका होईल व बाजारांतील मंदीस बाजारांतील पैशाच्या पुरवठ्यांत वाढ झाल्यानें आळाहि बसेल.

**४. परकीय-कर्ज-विमोचन**—परकीय देशांतील नागरिकांचें कर्ज मात्र वरीलपैकीं कोणत्याहि उपायांनीं फेडतां येत नाहीं. तें सारें आपल्या

1 Inflation.
2 Managed Currency.

देशांतील नागरिकांनीं खरेदी केलें असेल तर तें एतद्देशीयच होतें. पण असें खरेदी करतांना जी रक्कम द्यावी लागते, ती आपल्या देशांतील चलनास मिळणाऱ्या परकीय हुंडणावळींत म्हणजे परकीय चलनांत द्यावी लागते. हुंडणावळीचे दर ज्या त्या देशांतील आर्थिक सुस्थितीवर अवलंबून असतात. त्यामुळें आपण आपल्या चलनाचें अवमूलन केलें तर त्याबरोबर परकीय चलनाचें अवमूलन होईलच किंवा झालें तरी तें आपल्या चलनाच्या अवमूलनाच्या प्रमाणांत होईल असें सांगतां येत नाहीं. आपल्या चलनाचें अवमूलन झालें व परकीय देशांतील चलनाचें झालें नाहीं तर पूर्वीपेक्षां आपल्या चलनास तें बाहेरील चलन कमी मिळेल.

याचाच अर्थ परकीय नागरिकांचें कर्ज देतांना आपणांस पूर्वीपेक्षां आपलें चलन जास्त मोजावें लागेल. उदाहरणार्थ, अमेरिकन नागरिकांनीं सन १९४८ सालीं १०० डॉलर कर्ज आपणांस दिलें. त्यावेळीं त्याची आपल्या रुपयांत किंमत अदमासें ३५० होती. आतां तेंच कर्ज द्यावयाचें झाल्यास ३५० रु. चे ऐवजीं अदमासें ५५० रु. द्यावे लागतील. दोन्ही देशांतील हुंडणावळीच्या दरांत बदल झाला नाहीं तर कर्जाच्या दरांतहि बदल होणार नाहीं. पण परकीय चलनाचें अवमूल्यन झालें व आपल्या चलनाचें झालें नाहीं तर मात्र आपल्या देशांतील चलन कमी द्यावें लागेल. हुंडणावळींच्या दरांत बदल झाल्यानें कर्जाच्या वास्तविक बोजांत मात्र क्वचितच बदल होतो. पैसा हें प्रत्यक्ष वस्तूंच्या मोजमापाचें साधन आहे. तेव्हां आपल्या देशाचें चलनावमूल्यन झाल्यानें पूर्वीपेक्षां आपणांस अमेरिकेस तिच्या १०० डॉलरमागें २०० रुपये जादा द्यावे लागले, तरी आपण पूर्वीपेक्षां अमेरिकेस २०० रुपयांचा माल जास्त पाठवूं लागलों असा याचा अर्थ समजावयाचा नाहीं. याचा अर्थ अमेरिकेच्या १०० डॉलरला हिंदमधील जेवढा माल पूर्वी मिळे, तेवढाच माल विकत घेण्यास हिंदचे ५५० रुपये हल्लीं लागतात, पूर्वी ते ३५० रु. लागत. अवमूलनानें देशांतल्या देशांत किंमतींत फारसा फरक दिसून येत नाहीं, कारण अवमूलनाचा संबंध परदेशी चलनाशीं असतो, स्वदेशांत त्याचा फारसा परिणाम दिसून येण्याचें कारण नाहीं. अवमूलन झाल्यावर आपल्या सरकारनें निर्यातकर वाढविले, याचाच अर्थ अवमूलनापूर्वीच्या व नंतरच्या चलनांमधील किंमतीची तफावत मालाची परदेशांतील किंमत वाढवून भरून काढली.

परकीयांची कर्जफेड परकीय चलनाच्या मोबदल्यांत आपला माल पाठवून किंवा अन्य कामगिरी करून[1] करावी लागते. स्वदेशासारखी परकीय नागरिकांवर कर लादून किंवा अन्य दुसऱ्या उपायांनीं करतां येणार नाहीं, हें उघड आहे.

ही झाली देशांतील व परदेशांतील खाजगी सावकारांच्या कर्जाच्या परतफेडीची कथा. पण निरनिराळ्या देशांतील सरकारासरकारांमधील कर्जाचा विचार केल्याशिवाय हें कर्जपुराण संपत नाहीं.

**५. सरकारासरकारांमधील कर्जफेड**—सरकारासरकारांमधील कर्जें बहुशः युद्धमूलक असतात. पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस इंग्लंड–फ्रान्ससारखीं विजेतीं राष्ट्रेंदेखील, युद्ध चालविण्यास लागणारा अगणित माल अमेरिकेकडून खरेदिल्यानें अमेरिकेचीं ऋणको राष्ट्रें बनलीं. मग जर्मनीसारख्या जित राष्ट्राची गोष्टच बोलावयास नको. अशा राष्ट्रानें जेत्यांना खंडणी द्यावयाची असते. अर्थात् ही सारी खंडणी अमेरिकेस इंग्लंड फ्रान्सचे ऋणविमोचनार्थ द्यावी लागावयाची. दुसऱ्या महायुद्धानें तर या कर्जांत कल्पनातीत भरच पडलेली आहे.

या कर्जाच्या परतफेडीचें विवेचन हें निव्वळ तात्त्विक ठरूं पहात आहे. पहिल्या महायुद्धाच्या कर्जाचें इंग्लंड फ्रान्सनें २ । ३ वर्षांचें व्याजहि दिलें नाहीं. जर्मनीनें-देखील खंडणीवरील ४ । ५ वर्षांच्या व्याजापेक्षां जादा कांहीं दिलें नाहीं. १९३२ च्या लॉसेनच्या करारानंतर तर कर्ज व त्यावरील व्याज देण्याचें बेमुदत स्थगित केलें गेलें आहे.

दुसरें महायुद्ध संपून आतां सहा वर्षें झालीं. परंतु या काळांतदेखील आंतर-राष्ट्रीय कर्जविमोचनाचा इतिहास परतफेडीच्या भाषेंत सांगतां येणार नाहीं. देऊं, दिलें, देतां येईल या भाषेंतच अद्याप तरी तो लिहिला जात आहे. नाहीं म्हणावयाला जर्मनी व जपानमधील बरीचशी यंत्रसामुग्री १९४८–४९ पर्यंत विजेत्यांनीं आपल्या राष्ट्रांत खंडणीपायीं उखडून नेली. पण त्यानंतर रशिया–अमेरिकेंतील शीतयुद्धांत थोडासा गरमपणा येऊं लागल्यानंतर या विजेत्यांनींच ‘युरोपची पुनर्घटना’[2] या नांवाखालीं जर्मनीचें पुनरुत्थापन चालविलें आहे. जपानच्या

1 Goods & Services.
2 European Recovery Programme.

कायाकल्पाकरितां अमेरिका अमाप कर्ज देत आहे. इंग्लंड-फ्रान्ससारख्या ऋणको राष्ट्रांस अमेरिका फुकट मदत[१] देत आहे. एकट्या इंग्लंडला मार्शलमदत योजने-अन्वयें २०० कोटी पौंड म्हणजे जवळ जवळ ३००० कोट रुपये बक्षिस दिले, तरी त्या राष्ट्राची क्षयाची प्रथमावस्था अद्याप संपत नाहीं. अशा स्थितींत इंग्लंड पूर्वीचें कर्ज परत करील, असें म्हणणें म्हणजे शुद्ध वेंधळेपणा ठरेल.

आंतरराष्ट्रीय युद्धकर्जाबाबत ऋणको राष्ट्रांत ती नाकारण्याइतकी मनोभूमिका तयार झाली आहे. इंग्लंड-फ्रान्समध्यें 'जागतिक शांततेकरितां व लोकशाहीचे रक्षणार्थ आम्हीं रक्त सांडलें व त्याबरोबर गरीबहि झालों. अशा स्थितींत जणूं हा रक्तयज्ञ कमीच झाला असें समजून, ज्या अमेरिकनांना याकरितां कांहींहि झीज सोसावी लागली नाहीं, त्यांना कर्जफेडरूपानें परत खंडणी देण्याचें आमच्या कपाळीं यावें, यापेक्षां दैवदुर्विलास तो कोणता? बस्स, आमच्या पुढल्या निष्पाप पिढीवर पुढील अमेरिकन पिढी पोसण्याचा बोजा टाकण्याचा आम्हास अधिकार नाहीं' अशा तऱ्हेची विचारसरणी १९३० च्या सुमारास उघडउघड व्यक्त केली जात होती.[२]

यावरून युद्धकाळांतील कर्जे परत फेडण्याची शक्यता कमी दिसते. हिंदचें इंग्लंडला अद्याप रु. ८३५ ( सन १९५१ सालीं ) कोटींचें कर्ज आहे. इंग्लंडहि वरील प्रकारच्या भूमिकेवरून तें नाकारण्याचा संभव आहे. प्रत्यक्षांत जरी नाकारलें नाहीं, तरी तें देतांना 'घे शंखोबा, दे शंखोबा' हा न्याय इंग्लंड अंमलांत आणण्याचा संभव आहे. हिंदचा इंग्लंडशीं गेलीं दोन शतकें जो संबंध आला व त्या काळांत इंग्लंडनें हिंदची जी आर्थिक पिळवणूक केली, त्या सर्वांचा इतिहास

---

1 Marshall Aid.

2. For the United States the war ( of 1914 ) must appear in retrospect as a beautiful idyll of thrift, a gigantic process of profitable foreign investment, the creation of a sure source of income from Europe, which will continue to flow across the Atlantic till the present century is almost at an end. Unborn Americans will wax fat on the labour of unborn Englishmen, Germans, Frenchmen & Italians. ( Towards Peace of Nations P. P. 64–66 by Dalton ).

पाहातां हिंदुस्थानचें हें इंग्लंडकडे असलेलें कर्ज युद्धकर्ज म्हणतां येणार नाहीं. बरें, हें हिंदुस्थाननें आपखुषीनें इंग्लंडला दिलेलें नाहीं. इंग्लंडचा हिंदुस्थानवर ताबा असल्यानेंच इंग्लंडला भरमसाट माल हिंदुस्थानांतून नेतां आला. हिंदी कॉंग्रेसनें १९३१ सालीं इंग्लंडनें हिंदुस्थानचें ७२९ कोट रुपये देणें आहे, असा हिशोब काढला होता. त्या काळीं सरकारदप्तरीं याउलट इंग्लंडचेंच हिंदुस्थानास ५१७ कोट रुपये कर्ज आहे हा हिशोब मांडला होता. सध्यांचें हिंदचें इंग्लंडला असलेलें ८३५ कोट रुपये कर्ज वरील सर्व देणें फिटल्यावरचें आहे. यावरूनहि हें कर्ज युद्धकर्जापेक्षां अधिक न्याय्य भूमिकेवरील आहे हें दिसून येईल. सध्यां चलनाचें अवमूल्यन झालें असल्यानें ज्या काळांत माल नेला (सन १९४० ते ४४) त्यापेक्षां निम्माहि माल आतां या ८३५ कोट रुपयांस येणार नाहीं. कसेंहि असो, सध्यां इंग्लंड अडचणींत आहे. धनकोनें हुषारीनें आपला वळचणीखालचा हात काढून घेतलेला बरा.

युद्धकर्जाव्यतिरिक्त इतर व्यवहारांतील आंतरराष्ट्रीय कर्जाच्या परतफेडीचा इतिहास हा दोन सभ्य गृहस्थांमधील व्यवहारासारखा आहे. रशियानें १९२० सालीं कोणाचें कसलेंहि कर्ज देण्याचें नाकारलें; किंवा १९४९ सालीं स्थापन झालेलें नव चीनसरकार अमेरिकेचें पूर्वीच्या सरकारकडे असलेलें कर्ज नाकारणार यांतहि संदेह नाहीं. तथापि असे प्रकार एकंदरींत राज्यक्रांतीनंतरचे असल्यानें ते अपवादात्मकच मानले पाहिजेत. सभ्य गृहस्थ आपल्याकडील कर्ज ठरलेल्या व्याजासह ठराविक वेळीं देतो. त्यांत एखाद्या वेळीं व्याजांत सूट किंवा मुदलांत सूट मिळते. पण तें सर्व एकमेकांच्या राजीखुषीनें व अक्कलहुशारीनें घडतें.

**६. कर्जफेडीचे परिणामांबाबतींतील गमतीचे संभाव्य प्रकार**— ही झाली आंतरराष्ट्रीय कर्जविमोचनाची वस्तुस्थिति. पण तें प्रत्यक्षांत फेडण्याचें ठरविल्यास कांहीं गमतीदार प्रकार होतात असें कांहीं अर्थशास्त्रज्ञांचे मत आहे. त्याचा थोडासा विचार करूं.

कर्जफेड केल्यानें ऋणको राष्ट्र भरभराटीस येतें व धनको राष्ट्रांतील जीवन विस्कळित होतें. असें कांहीं अर्थशास्त्रज्ञ प्रतिपादतात. हें ऐकल्यावर सामान्य माणसाची तर हंसून हंसून मुरकुंडी वळेल. त्याला वाटेल, विद्याधनासारखें दिल्यानें

वाढणारें हें बरें परराष्ट्रीय कर्ज आहे. तशांतून खरोखरच परराष्ट्रीय कर्जाचा जर हा गुण असेल तर कोणतेंहि राष्ट्र दिलेलें कर्ज परत मागणार नाहीं, एवढेंच नव्हे तर आणखी घ्या हो म्हणून पाठीमागें लागेल. आणि अशी परिस्थिति आली तर काय बहार होईल ! हिंदसारख्या मागासलेल्या राष्ट्राचा आर्थिक प्रश्न चुटकी-सरसा सुटेल. पण जेव्हां तो सभोंवार पाहातो तेव्हां त्याची निराशा होते. वस्तुस्थिति तर कांहीं तशी दिसत नाहीं. मग तो मनाशीं म्हणेल, ही पंडितांची कांहींतरी शाब्दिक कसरत असेल, आणि तें खरेंच आहे. कसें तें पहा.

या पंडितांच्या मतें ऋणको राष्ट्राकडून कर्जाच्या मोबदल्यांत जो माल येईल, त्यायोगें धनको राष्ट्रांतील त्या मालाचा धंदा बसेल व त्याचा साहजिकच परिणाम म्हणून त्या धंद्यांतील मजूर बेकार होतील. उलट ऋणको राष्ट्राची निर्यात वाढल्यानें त्या देशांतील धंदे भरभराटीस येतील व त्यायोगें बेकारी कमी होईल. सकृद्दर्शनीं हें बरोबर दिसतें खरें, पण मालाच्या मोबदल्यांत ऋणकोस कांहींच मिळत नसल्यानें काम जास्त करूनहि चलनी नोटांशिवाय प्रत्यक्ष उपभोग्य वस्तूंच्या पुरवठ्यांत वाढ होणार नाहीं. त्याचा परिणाम घाम गळेतों काम करूनहि दारिद्र्यांत वाढ होईल. उलट धनको राष्ट्रांत उपभोग्य वस्तूंची चंगळ होईल. बेकार लोकांना, राष्ट्रीय सुखांत भर घालणाऱ्या उपवनें, शिक्षण, आरोग्य, प्रवास, सार्वजनिक बांधकाम, घरें या व तत्सम धंद्यांत गुंतवून त्यांची बेकारीहि कमी करतां येईल. कर्जाची परतफेड झाल्यानंतर कर्जाच्या मोबदल्यांत जी उपभोग्य वस्तूंची आयात होईल ती नंतरहि चालू ठेवण्याकरितां कांहीं निर्यात करण्याचा प्रसंग येईल व मग बंद पडलेल्या धंद्यांची जमवाजमव करण्याच्या संधिकाळांत लोकांवर हाल सोसण्याची पाळी येण्याचा संभव निर्माण होईल. पण या बाबतींत सरकारनें जागरूकता दाखविल्यास असें कांहीं होण्याची शक्यता नाहीं.

जेव्हां दोन्ही राष्ट्रें सर्वच तऱ्हेचा माल भरपूर निर्माण करतात, तेव्हां वरील-प्रमाणें धनको राष्ट्र वागूं शकेल. पण प्रत्यक्षांत नेहमींच असें घडतें असें नाहीं. हिंद व इंग्लंड यांचेंच उदाहरण घ्या. हिंदुस्थानास यंत्रसामुग्रीची अत्यंत जरूरी, पण ती भरपूर प्रमाणांत येथें निर्माण होत नाहीं. अशा स्थितींत आपल्या कर्जापायीं इंग्लंडनें जर यंत्रसामुग्री पाठविली तर आपल्याकडचा धंदा बसण्याची कांहींच भीति नाहीं. उलट त्यामुळें धंदेवाढीस चालना मिळेल.

सध्यां आंतरराष्ट्रीय व्यवहार मोठ्या प्रमाणांत चालत असल्यानें एकदोनच राष्ट्रें एकमेकांत अदलाबदलीचा व्यवहार[1] करीत असण्याची शक्यता कमी. त्यामुळें दोन राष्ट्रांत एकाच तऱ्हेचा माल उत्पादन होत असल्यानें त्या एकमेकांना जरी त्या वस्तूची गरज नसली तरी दुसऱ्या एखाद्यास त्याची गरज असते. अशा स्थितींत धनको राष्ट्र अशा राष्ट्रांस आपणांस नको असलेला माल पाठविण्यास ऋणको राष्ट्रांस सांगूं शकेल व त्या मोबदल्यांत आपणांस हवा तो माल त्या दुसऱ्या राष्ट्रांकडून घेऊं शकेल. हिंदच्या सांगण्यावरून इंग्लंड फ्रान्सला कोळसा पाठवील, त्या मोबदल्यांत फ्रान्स स्वित्सलँडला गहूं पाठवील व स्वित्सलँड घड्याळें व लहान लहान यंत्रसामुग्री हिंदकडे पाठवील. या सर्व व्यवहारांत हिंदला मात्र कोणास कांहीं पाठवावें लागणार नाहीं, पण हिंदचें इंग्लंडकडील कर्ज मात्र कमी होईल. असें सांगण्यानें इंग्लंड फ्रान्सला कोळसा पाठवील असा शब्दशः अर्थ घ्यावयाचा नाहीं. आंतरराष्ट्रीय व्यवहारच अशा तऱ्हेनें चालतो. जगांतील सर्व राष्ट्रें एकमेकांमधील देण्याचा एकमेकांवर हवाला टाकून ऋणमुक्त होतात व जेव्हां शेवटीं प्रत्यक्ष सोनें देण्याचा प्रसंग येईल, त्या वेळेसच ज्या देशांतून आयातीपेक्षां निर्यात जास्त झाली असेल त्या देशास जादा आयात केलेला देश प्रत्यक्ष सोनें पाठवितो. अशा रीतीनें ऋणको राष्ट्रानें प्रत्यक्ष धनको राष्ट्रास कांहीं माल न पाठवितांहि, कर्जफेड होऊं शकते. कांहीं कांहीं वेळेस ऋणको राष्ट्रांतून पूर्वापार येणारा माल धनको राष्ट्रांतील तत्सम धंद्यांची वाढ होण्याकरितां जबर आयातकरानें आयात करण्याचें बंद केलें जातें. अशा स्थितींतहि ऋणको राष्ट्रें दुसऱ्या बाजारपेठांकडे वळतील व आपली एकंदर निर्यात वाढवून व धनको राष्ट्रांची एकंदर निर्यात कमी होऊन ऋणको कर्जमुक्त होऊं शकेल, हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. आंतरराष्ट्रीय व्यवहार असा एकमेकांवर अवलंबून व गुंतागुंतीचा असल्यानें वर सांगितलेल्या पंडित लोकांच्या शंकेचा प्रत्यक्ष व्यवहाराशीं कधीं काळीं संबंध येईल असें वाटत नाहीं.



---

1 Barter.

# प्रकरण १४ वें

# राष्ट्रीय विनियोग

आतांपावेतों आपण सरकारी उत्पन्नाच्या मार्गांचें साधकबाधक दृष्ट्या स्थूल विवेचन केलें. तिजोरींत जमा झालेल्या उत्पन्नाचा विनियोग कसा करावा याचें विवरण आतां प्रस्तुत आहे. सरकारी उत्पन्नाच्या मार्गांचें विवेचन करतांना आपण वेळोवेळीं असें म्हटलें आहे कीं, सरकारी कर्तव्याच्या मर्यादांत वाढ झाल्यानें हल्लीं सरकारी खर्च अतोनात वाढला आहे. त्या कर्तव्याच्या मूळच्या मर्यादा कोणत्या, हल्लीं त्या बाबतच्या लोकांच्या कल्पनांत कोणता बदल झाला आहे याचा सविस्तर विचार आतां करूं.

**१. खाजगी व सरकारी विनियोग**—प्रथमतःच हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, खाजगी खर्चाप्रमाणें राष्ट्रीय खर्च उत्पन्नांतूनच केला पाहिजे अशी मर्यादा त्यावर असूं शकत नाहीं. खाजगी व्यक्ति आपल्या उत्पन्नापेक्षां जास्त खर्च करूंच शकत नाहीं, व तिच्या उत्पन्नास तर मर्यादा असतात. कर्जें काढून उत्पन्नापेक्षां केव्हां केव्हां खाजगी व्यक्तीदेखील जादा खर्च करूं शकतात. पण त्यांना कर्ज फेडण्याकरितां पुढील खर्च कमी करावा लागतो. तसें सरकारचें नाहीं. राष्ट्रीय संपत्तीस असणाऱ्या मर्यादेपेक्षां दुसरी कोणतीहि मर्यादा सरकारी खर्चास असूं शकत नाहीं. आणि राष्ट्रीय संपत्ति म्हणजे त्या राष्ट्रांतील कामकरी लोक-यांत श्रमिक व बुद्धिजीवी या दोघांचाहि समावेश होतो-व नैसर्गिक संपत्ति. असल्या ढोबळ मर्यादा या एकंदर मानवी जीवनावरीलच मर्यादा असल्यानें व त्या कोणत्याहि परिस्थितींत उल्लंघन करितां येत नसल्यानें आपणास ह्या मर्यादांचा विचार करण्याचें कारण नाहीं. एकंदर राष्ट्रीय उत्पन्नापैकीं ज्या त्या काळच्या लोकांच्या कल्पनेप्रमाणें कांहीं भाग लोकांच्या खाजगी खर्चास ठेवून बाकी उत्पन्न सरकार आपल्या खर्चास घेऊं शकतें. या नैसर्गिक मर्यादेपेक्षां सरकारी उत्पन्नावर मर्यादा नसल्यानें सरकारी विनियोगावरहि मर्यादा असूं शकत नाहीं. तात्पर्य,

सरकारी खर्च प्रायः सरकारी उत्पन्नानें मर्यादित नसून सरकारी खर्चावर सरकारी उत्पन्न अवलंबून आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

सरकारी खर्च वाढल्याबरोबर उत्पन्न वाढविण्याकरितां लोकांवरील कर वाढविले पाहिजेत. याचा अर्थ खासगी व्यक्तींचें उत्पन्न त्या प्रमाणांत कमी होईल, व याचाच पर्याय म्हणून खाजगी खर्चावर त्या प्रमाणांत बंधन येईल. खाजगी खर्च कमी झाला याचा अर्थच सरकारनें जादा खर्च करण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली असा होतो. हल्लीं सरकारी कर वाढल्यानें धनिक लोकांना दानधर्म करितां येत नाहीं, त्यामुळें धर्मशाळा, दवाखाने, शाळा, छात्रालयें वगैरे बांधतां येत नाहींत. तेवढ्या प्रमाणांत सामान्य लोकांना उपलब्ध होणाऱ्या सुखसोयी कमी झाल्या, अशी ओरड कांहीं कांहीं पुराणमतवादी लोकांत ऐकूं येते. पण या महाभागांच्या हें लक्षांत येत नाहीं कीं, या धनिकांच्या जवळ जादा पैसा ठेवा कशाला व मग त्यांच्या लहरीवर अशा सार्वजनिक सोयी अवलंबून ठेवा कशाला ? सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे या लोकांजवळील जादा पैसा कररूपानें सरकारी तिजोरींत खेचून सर्वजनप्रतिनिधिभूत अशा आधिभौतिक सत्तेनें म्हणजे सरकारनें तो सर्व लोकहिताकरितां खर्च करावा हा होय.

**२. सरकारी कर्तव्यें**—सरकारनें खर्च किती करावा हें ज्या त्या राष्ट्रांतील सरकारी कर्तव्याविषयींच्या विशिष्ट काळांतील लोकांच्या विशिष्ट कल्पनांवर अवलंबून आहे. राजाच्या कर्तव्याविषयीं आपल्या प्राचीन धर्मशास्त्रावरील ग्रंथांत बरेंच विवरण आलें आहे. मनुस्मृति, शुक्रनीति या ग्रंथांतून राजानें प्रजेवर राज्य करितांना कोणतीं न्याय्य तत्त्वें डोळ्यासमोर नित्य ठेवावींत, याविषयीं जागोजागीं उल्लेख आहेत. पण या बाबतींत कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत सविस्तर विवेचन आहे.

अर्थशास्त्रमहोदधींतून नीतिशास्त्र–( Science of Politics ) रूपी अमृत घुसळून काढणारा श्रीमान् विष्णुगुप्त ( कौटिल्य ) राजेलोकांना ' नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितम् ॥ तस्मान्नित्योत्थितो राजा कुर्यादर्थानुशासनम् ॥' स्वतःच्या सुखांत रममाण होणें राजेलोकांस हितकर नसून, प्रजासुखांत राजाचें हित आहे, याकरितां राजानें स्वतः नेहमीं उद्योगशील बनून राज्यकारभार करावा; असा सामान्य उपदेश करूनच तो थांबला नाहीं तर राज्यकारभार कसा करावा याविषयींच्या विवेचनाकरितांच त्यानें आपली ग्रंथरचना केली.

'कौटिल्येन नरेन्द्रार्थे शासनस्य विधिः कृतः ।' असें त्यानें स्वतःच आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे.

त्याच्या मतें जगांत चार विद्या आहेत. ( १ ) आन्वीक्षिकी–तत्त्वज्ञानशास्त्र-कीं जी सर्व गोष्टींतील मूलभूत गुणधर्मांचा विचार करते, ( २ ) त्रयीवेदज्ञान, ( ३ ) वार्ता–कृषि–पशुसंरक्षण–व्यापारशास्त्र व ( ४ ) दण्डनीति–राज्यकारभार-शास्त्र, ह्या चार विद्या होत. त्यांत चौथी सर्वांत श्रेष्ठ होय. कारण त्यायोगें बाकीच्या विद्यांची वाढ होते. 'आन्वीक्षिकीत्रयीवार्तानां योगक्षेमसाधनो दण्डः ।' याकरितां राजानें समाजकंटकांना ज्यांच्या त्यांच्या अपराधाप्रमाणें शासन ( यथार्हदण्डः ) करून व प्रजाजनांचें परचक्रापासून संरक्षण करून सर्व लोकांत सुख व शांतीचें साम्राज्य निर्माण करावें.[1]

पूर्वी सरकारी कर्तव्य तीन प्रकारचें आहे असें त्या काळच्या राजनीतिज्ञांचें मत होतें, असें यावरून दिसून येतें. ( १ ) अंतस्थ व परस्थ शत्रूंपासून प्रजा-जनांचें संरक्षण, ( २ ) कृषिव्यापारास उत्तेजन व ( ३ ) ऐहिकपारलौकिक सुख-वृद्धिकारक विद्यादान, अशीं तीं तीन कर्तव्यें होतीं. यांपैकीं पहिल्याची जबाबदारी सरकारच्या शिरावर प्रत्यक्ष असे. त्याकरितां सरकार अंतर्गत शांतता. सुव्यवस्थे-करितां पोलीस व परचक्रापासून संरक्षणाकरितां लष्कर ठेवीत असे. लोकांस आपापसांतील तंट्यांत योग्य न्याय मिळण्याकरितां न्यायाधिशाची नेमणूक केली जात असे.

शेतीस उत्तेजन देण्याकरितां सरकारवर पाटबंधारे बांधून जमिनीस पाणी पुरविण्याची व शेतकऱ्यांस जरूर तो सल्ला देण्यांची जबाबदारी असे. तसेंच व्यापारी संस्था स्थापून व त्यांचेवर देखरेख ठेवून, चांगला माल जनतेस योग्य किंमतीस मिळतो कीं नाहीं, हें पाहण्याची सरकार खबरदारी घेत असे. लोकांत आरोग्य भरपूर नांदावें म्हणून नागरिककर्तव्याची जाणीव सर्वांना दिली जाई. त्या कर्तव्यापासून च्युत होणारास दंड केला जाई. तसेंच आजारांत योग्य उपचार करण्याची व्यवस्था होण्याकरितां वैद्यकीय तज्ज्ञ तयार केले जात. लोकांस

---

१ विद्याविनीतो राजा हि प्रजानां विनये रतः । अनन्यां पृथिवीं भुङ्क्ते सर्वभूतहिते रतः ॥

ऐहिक व पारलौकिक शिक्षण ब्राह्मणांकडून मिळे. त्यांच्या योगक्षेमाची जबाबदारी सरकार वाहत असे. या सर्व बाबींबाबत विस्तृत सूचना कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रांत केल्या आहेत.

त्या काळीं राजेशाही राजवट असल्यानें व चारी वर्णास आपापलीं कामें नेमून दिलीं गेलीं असल्यानें तीं सर्व कामें नागरिक आपापली जबाबदारी ओळखून करतात कीं नाहीं हें पाहण्याची अंतिम जबाबदारी राजावर असे.[1]

सरकारी कर्तव्याच्या वरील यादीवरून त्या काळींहि हिंदुस्थानांत लोकहित-वृद्धिकारी सरकार ( Welfare state ) असावें अशी लोकांत स्थूल मानानें कल्पना होती असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. हल्लींदेखील सरकारच्या कोणत्याहि वार्षिक अंदाजपत्रकांतील खर्चाच्या बाबींवरून नजर फिरविल्यास सरकार आपल्या एकंदर खर्चाचा कांहीं अंश तरी जनहिताच्या बाबींवर खर्च करतें हें दिसून येईल.

हल्लींचें सरकार ( १ ) लष्कर, पोलीस, सामान्य राज्यकारभार, न्यायव्यवहार, परराष्ट्रीय वकिलाती ( २ ) शेती, व्यापार, पोस्ट व तारखातें व रेल्वे ( ३ ) शिक्षण, सार्वजनिक आरोग्य, म्हातारपणचें पेन्शन, कामगारविमा, बेकारीचें पेन्शन या व इतर तत्सम बाबींवर खर्च करतें. हे जे खर्चाचे तीन विभाग केले आहेत ते कौटिल्याच्या तीन विभागांशीं जुळते आहेत. स्थूलमानानें विचार केला असतां कौटिल्यानें जे सरकारी कर्तव्याचे विभाग कल्पिले आहेत त्यांत व हल्लींच्या वेल्फेअर स्टेटच्या कल्पनेचें कंकण हातीं बांधलेल्या सरकारी कर्तव्याच्या कल्पनेवरूनहि विचार केला असतां फारसा फरक नाहीं, हे लक्षांत येईल. यापेक्षांहि स्थूल विभाग पाडावयाचे झाल्यास ते ( १ ) अंतर्गत व परस्थ शत्रूंपासून समाजाचें संरक्षण व (२) समाजाच्या ऐहिक सुखांत वाढ असे दोन भाग कल्पितां येतील. प्रत्यक्षांत आपल्या कर्तव्याचे असे विभाग कल्पून, सरकार आपला खर्च करतें, असा मात्र याचा अर्थ नव्हे. सरकार आपल्या कार्याच्या व्यापाचे खातेवार विभाग पाडतें. प्रत्येक विभागांत पोटविभाग असतात व असा खातेवार जमाखर्च ठेवून सरकार आपलीं कर्तव्यें पार पाडतें.

---

१ तस्मात् स्वधर्मं भूतानां राजा न व्यभिचारयेत् । ...चातुर्वर्ण्याश्रमोलोको राजा दण्डेन पालितः । स्वधर्मकर्माभिरतो वर्तते स्वेषु वेश्मसु ।

**३. सरकारी खर्चाच्या तऱ्हा—मोबदला व मदत**—आपलीं हीं कर्तव्यें पार पाडण्याकरितां सरकार दोन तऱ्हेनें खर्च करतें. (१) पगार किंवा मोबदल्याचे तत्त्वावर व (२) मदतीच्या स्वरूपांत. सैनिक, शिपाई, सरकारी अधिकारी, कारकून, शिक्षक या सर्व लोकांस त्यांनीं केलेल्या सरकारी कामाबद्दल पगार दिला जातो. याउलट म्हातारपणाचें पेन्शन व बेकारांस मदत, कामगारविमा वगैरेवरील खर्च मदतीच्या स्वरूपाचा ठरतो. कारण, या मदतीच्या मोबदल्यांत ती व्यक्ति सरकारचें कांहींहि काम करीत नसते. अर्थात् हे दोन्ही प्रकार अगदीं परस्परविरोधी आहेत असें मानण्याचें कारण नाहीं. सैनिक शिपाई अधिकाऱ्याला दिलेल्या पगारावर सरकार लोकांस शांततासुव्यवस्थेचें दान करतें. तर म्हातारपणचें पेन्शन, बेकारांस मदत या केलेल्या दानानें त्यांचा असंतोष विकत घेऊन समाजांतील शांति ढळूं देत नाहीं. अशा प्रकारचें दान म्हणजे शांत राहाण्याकरितां बेकारव म्हाताऱ्यांस दिलेला पगारच होय. तसेंच राष्ट्रीय कर्जावरील व्याज म्हणजे एखाद्या व्यक्तीनें सरकारला दिलेल्या पैशाबद्दल मोबदला म्हणतां येईल. पण तेंच पिढ्यानुपिढ्या त्याच कर्जाबद्दल व्याज देत राहणें म्हणजे व्याज घेणारास ती मदतच होते. कारण त्या व्याजाबद्दल घेणारानें सरकारचें प्रत्यक्ष असें कांहीं काम केलेलें नसतें.

या कारणाकरितां वरील विभागाऐवजीं सरकारी खर्चाचे (१) अत्यावश्यक व (२) ऐच्छिक असे दोन भाग पाडतात. लष्कर, पोलीस, न्यायदान, सामान्य राज्यकारभार यांवरील खर्च हा अत्यावश्यक; कारण यांशिवाय समाजधारणाच होऊं शकत नाहीं. व शिक्षण, सार्वजनिक उद्यानें, दवाखाने यांवरील खर्च हा ऐच्छिक. कारण हा खर्च न केल्यानेंहि समाजजीवन चालूं शकतें. पण असा भेद करणें ही अगदींच मागासलेपणाची कल्पना होय. सुधारलेल्या समाजांत शिक्षण, आरोग्य कीं ज्याच्या अभावानें ऐहिक जीवन नीरस ठरतें, अशा बाबींवर खर्च न करणें म्हणजे सरकार स्वकर्तव्यास चुकलें असें होईल. निव्वळ लष्कर, पोलीस यांवरील खर्चावर सरकारनें समाधान मानणें म्हणजे राष्ट्र हा एक तुरुंग व सरकार म्हणजे एक तुरुंगाधिकारी, अशा कल्पनेनेंच राज्य करणें होय. यावरून हेहि विभाग योग्य नव्हत हें दिसून येतें.

कोणी कोणी (१) वास्तविक (real) किंवा प्रत्यक्ष व (२) तबदिली

स्वरूपाचा ( Transferred ) किंवा अप्रत्यक्ष असे सरकारी खर्चाचे विभाग पाडतात. प्रत्यक्षांत सरकार स्वतः खर्च करून लोकांस हितकारक अशीं कामें करतें. यांत लष्कर, पोलीस, शिक्षण, आरोग्य यांवर होणाऱ्या खर्चाचा समावेश केला जातो. अप्रत्यक्षांत पेन्शनें, विमा व धंद्यास मदत ( Subsidy ) अशा लोकांकरवीं ज्यांच्या त्यांच्या सुखांत भर पाडणाऱ्या बाबींवर होणाऱ्या खर्चाचा समावेश केला जातो. पण सरकारी विनियोगाच्या परिणामाचा विचार कर्तव्य असतां वरील प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष खर्चाचा वेगवेगळा असा परिणाम दिसून येत नाहीं.

याकारितां कौटिल्यानें दिलेल्या सरकारी कर्तव्यानुसार सरकारी खर्चाचें विभाजन हें जास्त शास्त्रीय ठरेल. ( १ ) समाजसंरक्षक, ( २ ) प्रत्यक्ष समाजसंवर्धक, (३) अप्रत्यक्ष समाज-संवर्धक. ही खर्चाची विभाजना खर्चाच्या परिणामाच्या दृष्टीनें जरी योग्य नसली, तरी ती कर्तव्यानुसार ठरविली असल्यानें पायाशुद्ध ठरते. समाजकंटक व अंतस्थ शत्रूपासून व तसेंच परचक्रापासून समाजाचें संरक्षण करण्याकरितां लष्कर, पोलीस, सामान्यराज्यकारभार, न्यायदान वगैरेंवरील खर्च हा समाजसंरक्षक; शेती, व्यापार, पोस्ट, रेल्वे, यांवरलि खर्च कीं ज्यायोगें समाजाच्या प्रत्यक्ष अन्नपाण्याच्या व इतर दैनंदिन गरजा भागल्या जातात हा प्रत्यक्ष समाज-संवर्धक; व शिक्षण, सार्वजनिक उद्यानें, आरोग्य यांवरील खर्च, हा समाजमनाची पातळी उंचावून सशक्त शरीरसंपत्तीबरोबर सशक्त मनाची प्राप्ति करून देत असतो व एकमेकां साहाय्य करूं अवघे धरूं सुपंथ, अशा संवेदना समाज-मनांत लहरावतो, व स्वर्ग हा कीं तो असा पृथ्वीविषयीं संभ्रम जनमनांत उत्पन्न करून एकंदर समाजजीवन अशा अप्रत्यक्षरीत्या सुसह्य व सुखी करतो, म्हणून हा अप्रत्यक्ष समाजसंवर्धक खर्च. अशी खर्चाची विभागणी ही जास्त युक्तियुक्त ठरते. अर्थात् येथेंहि हे तीन विभाग परस्परावलंबी आहेत हें लक्षांत घेतलेंच पाहिजे. सुसज्ज लष्कर व कार्यक्षम राज्यकारभार यायोगें लष्कर–पोलिसाच्या नुसत्या वचकानें त्यांचा प्रत्यक्ष उपयोग करण्याची पाळी आली नाहीं, तर त्यावरील खर्च हा अप्रत्यक्ष समाजसंवर्धक ठरेल. त्याउलट लोककल्पनांत शिक्षण व आरोग्य यांवरील खर्चाच्या उपयुक्ततेनें त्यास अढळ स्थान मिळाल्यास हा खर्च लोकांस प्रत्यक्ष समाजसंवर्धक वाटेल. म्हणून या तिन्ही खर्चांस समप्राधान्य दिलें

पाहिजे. तिन्हींच्या योग्य समन्वयानेंच सर्व समाजजीवन सुखी होईल, एरवीं नाहीं.

**४. खर्च जास्त या म्हणण्यांतील अशास्त्रीयता**—समाजजीवन सुखी करण्याची ज्याअर्थी सरकारवर जबाबदारी आहे, त्याअर्थी त्याकरितां लागणारा सारा खर्च करणेंहि सरकारचें कर्तव्य ठरतें. या प्रकरणाच्या प्रथमारंभींच आपण पाहिलें कीं, समाजसुखवृद्धिकारक खर्च हा कांहीं मूठभर लोकांच्या लहरीवर अवलंबून ठेवतां येत नाहीं. तेव्हां सरकारनें जरूर तेवढा खर्च करावा, हा आतां वादाचा मुद्दा आहे असें मानण्याचें वास्तविक कारण नाहीं. पण १९५१ सालींहि जेव्हां प्रतिष्ठित म्हणविणारे नागरिकहि सरकारी खर्च फार वाढला, फार वाढला, म्हणून ओरडतात, परंतु तो खर्च योग्य मार्गानें होत नाहीं, असें पूर्ण विचारांतीं येणारे उद्गार त्यांचे तोंडून निघत नाहींत; तेव्हां त्यांची कींव करण्यापेक्षां आपण दुसरें काय करणार ! अर्थशास्त्रज्ञ सरकारी खर्च समाजाचें आर्थिकदृष्ट्या जास्तींत जास्त हित होईल, ( Maximum economic and social gain ) या दृष्टीनें करावा व तसा तो होत नसेल तर तो अयोग्य, एवढेंच म्हणणार. खर्च कितीहि वाढला तरी त्याचें त्यास कांहीं वाटणार नाहीं. सुजाण नागरिकहि या दृष्टीनें विचार करण्यास यापुढें तरी शिकेल अशी आशा बाळगूं या.

**५. खर्च वायफळ मात्र नसावा**—सध्यां राष्ट्रीय बचतयोजनेवर सरकार वर्षास प्रचार व नौकरांचा पगार याकरितां २५ लाख रुपये खर्च करतें, शिवाय ४½ दरानें व्याज देतें. एवढें करून वर्षास ३५।३६ कोटींच्यावर[1] रक्कम जमत नाहीं. बरें, हीं सारी रक्कम सोनें किंवा चांदी या रूपांत शिल्लक ठेवण्याशिवाय दुसरा प्रकार माहीत नसलेल्या शेतकऱ्यांकडून वसूल होत असेल तर हा नवीन बचतीचा प्रकार लोकांस शिकविण्याकरितां ही रक्कम खर्च होते असा अर्थ होईल, व तो एक मोठा आर्थिक फायदा होईल. पण वस्तुस्थिति काय आहे ? या खात्यांत काम करीत असलेला नौकरवर्ग आपण कांहींतरी काम करीत आहों, हें दाखविण्याकरितां शहरांत जे लोक पोस्टांत किंवा बँकांत पैसे शिल्लक ठेवतात त्यांना या प्रकारच्या रोख्यांत ठेवण्यास ते प्रवृत्त करितात. म्हणजे जो वर्ग पूर्वीपासूनच या रूपांत पैसे शिल्लक ठेवतो, त्याच वर्गाकडून अशा जादा व्याजाच्या

---

१. १९५१–५२ सालीं अशा रीतीनें ३५·६४ कोटी रुपये जमले.

दरांत कर्ज घेणें हें सुज्ञपणाचें आहे असें कोण म्हणेल? अशा रीतीनें बेहिशेबी ( Wasteful ) खर्च करणें हें मात्र अयोग्य होय, हें सांगणें नलगे. तेव्हां हें खातें ठेवावयाचें झाल्यास हा पैसा खेड्यांतील लहानसहान शेतकऱ्यांकडूनच घेतला पाहिजे, व त्यांच्यांत तसा प्रचार केला पाहिजे, असा निर्बंध असणें अवश्य आहे. सध्यांच्या सरकारचा खर्च ह्या निकषावर तपासून पाहतां त्यांतील कांहीं बेहिशेबी आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. याचें आणखी उदाहरण म्हणून 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेचें देतां येईल. नुसती 'बोलाचीच कढी व बोलाचाचि भात' यानें कोणाचें कांहीं पोट भरत नाहीं. त्याबरोबर प्रत्यक्ष फायदा कांहींतरी दिसला पाहिजे. मुंबई सरकार वार्षिक १ कोट रुपये या प्रचारावर खर्च करतें. त्याच पैशांत लहानलहान तळीं बांधून शेतीस पाणी पुरवठा करावयाचा असें ठरविलें असतें तर निश्चित अधिक धान्य पिकलें असतें. एखादी नवीन योजना अमलांत आणतांना तिचा साधकबाधक विचार करावा लागतो तो एवढयाचकरितां. शेतीविषयक व शास्त्रिय संशोधन, नवीन समाजोपयोगी धंद्यास मदत, गरिबांस मोफत वैद्यकीय व शैक्षणिक मदत, जीवनावश्यक अन्नधान्य कापड वगैरे खरेदीकिंमतीपेक्षां कमी दरांत विकणें, हे व यांसारखे सरकारी खर्च प्रथमदर्शनीं अकारण वाटतात. पण वर उल्लेखिलेल्या समाजहिताच्या निकषावर तेच योग्य ठरतात.

याच निकषावर आणीबाणीच्या प्रसंगीं राष्ट्रास अत्यंत जरूर असे किंवा गॅस इलेक्ट्रिसिटीसारखे मक्तेदारी पद्धतीनें चालवावे लागणारे उद्योगधंदे राष्ट्रीय मालकीचे केलेले असतात. रस्ते, पोस्ट व तारखातें, रेडियो, रेल्वे वगैरे धंदे व्यापारविषयक असल्यानें खाजगी मालकीचे असल्यास हरकत नाहीं. पण ज्या राष्ट्रांत धंदे राष्ट्रीय मालकीचे करण्याची प्रवृत्ति नसते, अशा राष्ट्रांतदेखील वरील उद्योगधंदे बहुधा राष्ट्रीय मालकीचे असतात. अमेरिकेंत पोस्ट, रस्ते सोडून बाकीचे या प्रकारचे धंदे अद्याप राष्ट्रीय मालकीचे नाहींत. हें अपवादात्मक उदाहरण आहे. तथापि तेथेंहि या धंद्यांवर पूर्ण राष्ट्रीय नियंत्रण आहे.

या राष्ट्रीय विनियोगाच्या हेतूचें वरीलप्रमाणें सामान्य विवेचन केल्यानंतर त्याचा एकंदर राष्ट्रीय आर्थिक व्यवहारावर काय परिणाम होतो हें पहाणें अत्यंत जरूर आहे. पुढील प्रकरणांत तें विवेचन करूं.

# प्रकरण १५ वें

# राष्ट्रीय विनियोगाचे परिणाम

मागील प्रकरणांत सांगितलेल्या सर्वसामान्य तत्त्वानुसार राष्ट्रीय खर्च करावयाचा झाल्यास त्याचा प्रत्यक्ष व्यवहारांत काय परिणाम होतो, तें आतां पाहूं. याकरितां प्रथम व्यक्तींची, मंडळ्यांची, संस्थांची किंवा सरकारची प्राप्ति व खर्च यांविषयीं आपणांस स्पष्ट कल्पना असली पाहिजे.

**१. विनियोगाचा हेतु**—एका व्यक्तीला त्यानें केलेल्या कामाबद्दल त्यास समजा १०० रु. पगार मिळाला. अर्थात् ती झाली त्याची प्राप्ति. या मिळकतींतून तो आपल्या घरमालकास घरभाडें रु. १०, दूधवाल्यास रु. १५, आपल्या दुकानदारास रु. २५ देऊन बाकी कांहीं किरकोळ खर्च करतो. हा त्याचा खर्च म्हणजेच इतरांची प्राप्ति होय. जसें व्यक्तीचें तसेंच इतर मंडळ्या, संस्था किंवा सरकार यांचें. एकाचा खर्च ती दुसऱ्याची प्राप्ति. एवढ्याच दृष्टीनें विचार केला असतां सरकार ज्या रकमांचा विनियोग करतें, त्यांचा शेवटीं कांहीं ना कांहीं वस्तूंचें उत्पादन करण्यांत परिणाम होतो असें ठरतें. पण या मोठ्या दृष्टिकोनांतून सरकारी खर्चाचा एकंदर राष्ट्रीय जीवनावर काय परिणाम होतो, असा विचार केल्यानें त्या खर्चाच्या आर्थिक परिणामांचा आपणांस कांहींच बोध होत नाहीं. या खर्चाचा राष्ट्रीय आर्थिक व्यवहारावर काय परिणाम होतो याचा विचार कर्तव्य असतां, सरकारी धोरणानें राष्ट्रीय उत्पादनांत वाढ होते का व त्याचे विभाजनांत न्याय्यता येते का, या दृष्टीनें तो विचार केला पाहिजे.

**२. समाजसंरक्षक बाबींवरील विनियोगाचा परिणाम**—समाजसंरक्षक अशा बाबींवर म्हणजे लष्कर, पोलीस, न्यायव्यवहार, तुरुंग व सामान्य राज्यकारभार, यांवर होणारा खर्च हा राष्ट्रीय उत्पादनांत प्रत्यक्ष भर घालीत नाहीं. व सुखवृद्धिकारी सरकारची ( Welfare state ) कल्पना मूळ धरीपावेतों ह्या बाबींवरच तर मुख्यतः सरकारचा सारा खर्च होई. यावरून

सरकारी खर्च हा राष्ट्रीय उत्पादनांत भर घालूं शकतो अशी कल्पनादेखील बऱ्याच लोकांना दुःसह वाटे. पण थोडा विचार केला असतां ही कल्पना अपुऱ्या विचारांचें द्योतक आहे हें दिसून येईल. समाजसंरक्षक बाबींवरील खर्च हा देखील परिणामीं उत्पादकच ठरतो. समाजांत स्थैर्य प्राप्त होण्यास सरकारची जरूरी आहे. सरकारची भीति लोकांना जर नसेल तर मत्स्यन्यायान्वयें बलिष्ठ दुर्बळांस ग्रासून टाकील व मग समाजच राहूं शकणार नाहीं, तर उत्पादन वगैरे बाकीच्या बाबींची गोष्टच बोलावयास नको. तेव्हां समाजसंरक्षक बाबींवरील खर्चा-वरच समाजाची पुढील उत्पादकशक्ति अवलंबून असल्यानें, तो एकंदरींत उत्पादन-वाढीस पोषकच समजावा लागतो.

याबरोबरच हेंहि खरें आहे कीं, जेव्हां देशांतील अंतर्गत स्थिति सुस्थिर असते, लोक उद्योगी व शिस्तप्रिय असतात, समाजकंटकांचें प्रमाण कमी असतें व तसेंच आंतरराष्ट्रीय सहकार्य जसजसें वाढतें व राष्ट्राराष्ट्रांतील वैमनस्य, एकमेकांविषयींचा अविश्वास जसजसा कमी होतो, तसतसा या बाबींवरील खर्च आपोआपच कमी होऊं शकेल व त्याचा उपयोग इतर उत्पादन वाढविण्याकडे करितां येईल. जागतिक शांततावाद्यांचे व मुत्सद्द्यांचे त्या दिशेनें प्रयत्न चालू आहेत. तथापि सध्यां तरी ती बाब दृष्टीच्या टप्प्याच्या बाहेर आहे. जेव्हां ती शक्य कोटींतील होईल तो सुदिन, अशी सदिच्छा प्रगट करण्याशिवाय आपण या मुद्द्यावर आपली कृति अवलंबून ठेवूं शकत नाहीं.

**३. समाजसंवर्धक बाबींवरील खर्च प्रत्यक्ष उत्पादनांत भर घालतो**—याउलट समाजसंवर्धक बाबींवरील खर्च एकंदर राष्ट्रीय उत्पादनांत प्रत्यक्ष भर घालूं शकतो. लोकांना मोफत शिक्षण, मोफत वैद्यकीय मदत दिल्यानें त्यांची कार्यक्षमता वाढते. तेव्हां सकृद्दर्शनीं जरी हा खर्च उत्पादक दिसत नाहीं, तरी त्याच्या परिणामाच्या दृष्टीनें हा अगदीं अत्यावश्यक खर्च आहे, यांत शंकाच नाहीं. पण याबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, कोणाच्याहि प्राप्तीचा विचार न करितां सर्वांनाच मोफत शिक्षण व मोफत वैद्यकीय मदत, आजारीपणाचें किंवा म्हातारपणाचें पेन्शन द्यावयाचें असें ठरविलें तर कोणालाच आपल्या मिळकतींतून कांहीं शिल्लक ठेविली पाहिजे असें वाटणार नाहीं. सरकारी खर्चानें समाजांत अशी उधळी प्रवृत्ति मूळ धरूं लागली तर ती एक अनिष्ट गोष्ट ठरेल. याकरितां

व्यक्तीच्या उत्पन्नावर त्या मदतीचें प्रमाण अवलंबून ठेवावें लागतें. जसजशी प्राप्ति वाढत जाते, तसतसें अशा मदतीचें प्रमाण कमीकमी होत जातें. सध्यां सरकार आयात धान्य त्याच्या वास्तविक किंमतीपेक्षां कमी किंमतीस विकतें. त्याचें कारण एवढेंच कीं, एतद्देशीय अन्नधान्याच्या किंमतीपेक्षां आयात धान्याची किंमत ज्यास्त पडते, व अशी किंमत जर लोकांकडून घेतली तर त्याचा परिणाम लोकांच्या राहणीच्या खर्चांत वाढ होण्यांत होईल. पण या बाबतींत वर उल्लेखिलेल्या तत्त्वांचा अवलंब केल्यास तें जास्त युक्तियुक्त ठरेल. उदा० ठराविक प्राप्तीच्या समजा, महिना रु. ५०० च्या पुढें प्राप्ति असणाऱ्या लोकांस ही सवलत द्यावयाची नाहीं.

सरकारी खर्चाच्या अशा धोरणानें समाजांतील आर्थिक विषमताहि कमी करण्यास मदत होईल. याविषयीं सोळाव्या प्रकरणांत आपण थोडें विस्तृत विवेचन केलेंच आहे. त्याची पुनरुक्ति येथें करण्याची जरूरी नाहीं.

सर्व लोकांच्या सामान्य सुखसोयीकरितां म्हणून रस्ते, रेडिओस्टेशनें, वाचनालयें, उद्यानें, मंदिरें, सभागृहें वगैरे बांधलीं तर त्याचा व्यक्तिगत उत्पादनशक्तीवर किंवा त्याच्या प्राप्तीवर काय परिणाम होतो हें निश्चित स्वरूपांत सांगणें कठीण असतें. पण या सर्व गोष्टींचा त्याच्या एकंदर मानसिक व शारीरिक शक्तींवर अनुकूल परिणाम होत असल्यानें त्याच्या उत्पादनशक्तिवर इष्ट असाच परिणाम होतो असें मानण्यास हरकत नाहीं आणि ह्याच दृष्टिकोनांतून सरकारच्या पूर्वीच्या व आतांच्या कर्तव्यांतील मूलभूत बदल जन्मास आला आहे. पूर्वी समाजांत शांतता व सुव्यवस्था नांदली कीं सरकार स्वतःस कृतकृत्य मानीत असे. कौटिल्याचा समाजसंवर्धक बाबींवरदेखील सरकारनें लक्ष दिलें पाहिजे असा कटाक्ष असे. यावरून वरील विधान एकांगी वाटतें. पण त्या काळच्यापेक्षां हल्लीं त्या बाबींवर जास्त भर दिला जातो, एवढयाच अर्थानें तें विधान केलेलें आहे. त्या काळीं ज्या त्या राजाच्या लहरीवर समाजसंवर्धक खर्च अवलंबून असे. तशांतच शेजारच्या राजांशीं लढाया व स्वतः राजाचें अंतर्गत शत्रूंपासून संरक्षण या बाबींवर लक्ष देण्यांतच राजेलोकांचा वेळ, श्रम व पैसा खर्च होत असल्यानें, या बाबींवर खर्च करण्यास त्यांना फुरसतच मिळत नसे. लोकशाही राज्याच्या वाढीबरोबर समाजसंवर्धक बाबींवर सरकारनें खर्च केलाच पाहिजे. या कल्पनेचा उदय झाला व ती बाब आतां सरकारी खर्चाची एक आवश्यक अंग होऊन बसली आहे.

**४. फॅसिस्ट, कम्युनिस्ट व लोकशाहीच्या खर्च करण्याच्या मर्यादा**—हिटलर, मुसोलिनी यांनीं निर्माण केलेल्या फॅसिस्ट हुकूमशाहींत तिच्या एकंदर स्वरूपानेंच बाह्य व अंतर्गत शत्रु फार निर्माण होतात व तिचीहि स्थिति प्राचीन राजेशाहीसारखीच असते. या हुकूमशहांचा सारा वेळ व पैसा आपल्या शत्रूंचा बंदोबस्त करण्यांतच खर्च होत असल्यानें त्यांना समाजसंवर्धक बाबींकडे लक्ष देण्यास उसंतच कशी ती मिळत नाहीं. प्राचीन किंवा मध्ययुगीन काळांत चंद्रगुप्त, अशोक, हर्ष, हरिहर ( विजयनगरचा ), अकबर, शिवाजी हीं नांवें जशीं समाजसुधारणेबाबत अपवादात्मक म्हणून गणलीं जातात, तसाच कांहींसा प्रकार वरीलसारख्या हुकूमशहांबाबत होणें शक्य आहे. पण सध्यां रूढि व आनुवंशिकता या दोन्ही कल्पनांचें राजप्रमुखाच्या निवडीबाबत समूळ उच्चाटन झालें असल्यानें व हुकूमशहाचें सारें आयुष्य स्वतःचें स्थान टिकविण्याच्या खटपटी-लटपटींत खर्च होण्याचा संभव असल्यानें, वरील राजेलोकांनीं जेवढया समाज-सुधारणा केल्या, तेवढया तरी हुकूमशाही राजवटींत होतील कीं नाहीं याची वानवा आहे. सध्यां शास्त्रीय शोधांमुळें कोणतीहि गोष्ट मोठया प्रमाणांत एकदम होऊं शकते, त्यायोगें हुकूमशहानें एखादी जरी गोष्ट केली तरी ती पूर्वीच्या राजे-लोकांनीं केलेल्या सुधारणेशीं तुलनात्मक दृष्टया पाहतां एकदम उठून दिसेल. पण या काळांतील सुधारणा सद्यःकाळांतील निकषावरच तोलून पाहिल्या पाहिजेत. या कसोटीवर फॅसिस्ट हुकूमशहांच्या सुधारणा लोकशाही सरकारच्या सुधारणांच्या पासंगालाहि पुरणार नाहींत.

रशियासारखी कम्युनिस्ट हुकूमशाही मात्र या बाबतींत फॅसिस्ट हुकूमशाही किंवा लोकशाहीपेक्षां सरस ठरते. कम्युनिस्ट राजवटींत एकंदर समाजाचें जास्तींत जास्त हित हाच साऱ्या सरकारी व्यापाचा मध्यबिंदु असल्यानें, त्या सरकारला लोकशाही सरकाराप्रमाणें पैशाकरितां जनमतावर अवलंबून रहावें लागत नाहीं. समाजांतील सारीं उत्पादनसाधनें अशा सरकारच्या पूर्ण मालकीचीं असल्यानें समाजहिताच्या निकषावर, कांहीं विशिष्ट खर्चाची जरूरी भासल्याबरोबर, तें सरकार ताबडतोब लोकांना त्या कामावर नियुक्त करूं शकतें. समाजांतील भांडवलावर सरकारची पूर्ण मालकी असते. त्या भांडवलाचा लोकहिताच्या दृष्टीनें तें सरकार हवा तो उपयोग करूं शकतें. लोकशाही सरकारच्या भांडवल उभें करण्याच्या

शक्तीवर मर्यादा असतात. समाजांतील बरींचशीं उत्पादनसाधनें खाजगी मालकीचीं असल्यानें कर किंवा कर्ज या दोन उपायांपेक्षां बाकीच्या उपायांनीं फारसा पैसा सरकार उभा करूं शकत नाहीं. कर वाढविणाऱ्या सरकारला जनमताचा पाठिंबा मिळविणें कठीण जातें; व कर्ज उभारण्यावरदेखील नैसर्गिक मर्यादा येतातच. जादा व्याजानें सरकारनें कर्ज काढावें तर सरकारी उत्पन्नाचा बराचसा भाग कर्जा-वरील व्याजांतच खर्च व्हावयाचा. अशा रीतीनें पैसा उभारण्याच्या लोकशाही सरकारच्या कुवतीवरच मर्यादा असल्यानें लोकोपयोगी कार्यावर खर्च करण्यावर आपोआपच बंधन येतें.

अशा बंधनानें लोकशाही जादा काम करूं शकत नाहीं असें मानलें तर, लोकशाही समाजहिताच्या दृष्टीनें कुचकामी असें म्हणावें लागेल. तसें मानलें तर कम्युनिस्ट हुकूमशाही श्रेष्ठ आहे असें ठरेल. याकरितां सध्यांचीं लोकशाही सरकारें वरील बंधनें अपरिहार्य म्हणून मानायला तयार नाहींत. तीं भांडवल निर्माण करूं शकतात. योग्य चलनवाढीच्या धोरणानें व उद्योगधंद्यांचें वाढत्या प्रमाणांत राष्ट्रीयीकरण करण्याच्या निश्चयानें लोकशाही सरकार समाजांतील भांडवलावर आपला ताबा बसवूं शकतें. याकरितां विमाकंपन्या, बँका व इतर उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण—कीं ज्यायोगें समाजहिताच्या दृष्टीनें हवें तेवढें भांडवल उभें करणें सोपें जातें—यांसारख्या बाबींवर पैसा खर्च करणें समाजहिताचें ठरतें.

अशा धोरणानें सरकारी कर्ज फेडण्याच्या ज्या योजना आपण तेराव्या प्रकरणांत सुचविल्या आहेत, त्यायोगें पुन्हां समाजाच्या हातांत जादा पैसा खेळेल व त्याचा उपयोग जादा उत्पादनवाढीकडे करतां येईल. बेकारीनिवारणास देखील सार्वजनिक बांधकामावरील योजनाबद्ध खर्च व चलनविषयक योग्य धोरण उपयोगी पडतें हें सतराव्या प्रकरणांत आपण पाहिलेंच आहे.

वरील विवेचनावरून अप्रत्यक्ष समाजसंवर्धक म्हणजे शिक्षण, आरोग्य यांसारख्या बाबींवरील खर्चास प्राधान्य देणें इष्ट आहे हें दिसून येईल. ज्या लोकांच्या श्रमानें राष्ट्रीय उत्पादन वाढवावयाचें असतें, ते स्वतःच मानसिक व शारीरिकदृष्ट्या कार्यक्षम नसतील तर एकंदर उत्पादन वाढूं शकणार नाहीं. मन व हात कणखर बनविण्यास लागणारा सारा खर्च हा सरकारी तिजोरीवरील पहिला बोजा असला पाहिजे, यांत शंका नाहीं.

**५. प्रत्यक्ष समाजसंवर्धक बाबींवरील खर्चांतील तरतमभाव**–प्रत्यक्ष समाजसंवर्धक बाबींवरील खर्चांतदेखील भांडवली खर्चास, कीं ज्यायोगें एकंदर राष्ट्रीय उत्पादनांत थोडया काळांत वाढ होईल, अशा पाटबंधारे, वीज-उत्पादन, घरें वगैरेंवरील खर्चास प्राधान्य व अन्नधान्योत्पादन, कापड सोडून इतर उपभोग्य वस्तूंवरील खर्चास दुय्यम स्थान असा तरतमभाव वापरावा लागतो. त्या दृष्टीनें पहिल्या तऱ्हेचें उत्पादन वाढविण्याकरितां जरूर तर प्रत्यक्ष आर्थिक मदत व दुसऱ्या तऱ्हेच्या उत्पादनास फारसें उत्तेजन मिळूं नये म्हणून त्यावर उत्पादनकर यांसारखे कर लादणें इष्ट असतें.

**६. देहाती बँका शेतकऱ्यांतील संचयप्रवृत्ति जोपासतील व ग्रामसुधारणांचें केंद्र बनतील**—उपभोग्य वस्तूंवरील खर्च कमी होऊन संचय करण्याच्या प्रवृत्तीस उत्तेजन मिळणें, हें मागासलेल्या देशांत भांडवली पुरवठा होण्याच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचें आहे. अशा तऱ्हेच्या वृत्तीस पोषक असें सरकारी खर्चाचें धोरण आंखणें झाल्यास, तसा प्रचार करणारें खातें व जरूर तो व्याजाचा दर यांची जरूरी आहे. आपल्या देशांत राष्ट्रीय बचत खातें आहे; व त्याचा उद्देश आतांपर्यंत समाजांतील जे वर्ग बचत करीत नाहींत, त्यांच्यांत तशी प्रवृत्ति निर्माण करण्याचा आहे. पण प्रत्यक्षांत तसें होत नाहीं, हें मागील प्रकरणांत आपण पाहिलें. सध्यां अन्नधान्याचे भाव बरे असल्यानें व येथून पुढेंहि सरकारच्या चलनविषयक धोरणानें, ते भाव टिकून राहतील एवढेंच नव्हे तर त्यांत वाढ होण्याचा संभव असल्यानें, शेतकऱ्याजवळ पूर्वीपेक्षां जादा पैसा येणें शक्य आहे. त्याचा शेतीचें उत्पादन आणखी वाढविण्यांत किंवा शिल्लक ठेवण्यांत विनियोग झाला तरच तें इष्ट आहे. आपला शेतकरी अद्याप अडाणी आहे व तो ह्या दोन्ही गोष्टी करण्यापेक्षां नाचरंग, तमाशा, दारू यांतच हा जादा पैसा खर्च करण्याचा संभव अधिक आहे. तेव्हां शेती–उत्पादन वाढवावयाचें झाल्यास त्याला कळेल अशा रीतीनें सांगणारे अधिकारी व प्रयोगशाळा पाहिजेत. व संचय करण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत वाढवावयाची झाल्यास त्यांच्यांत जाऊन योग्य तो प्रचार व ताबडतोब त्यांचेजवळून पैसा घेण्याची सोय झाली पाहिजे. याकरितां सध्यांचे बचतखात्याचें देहाती बँकांत ( Rural credit organization ) रूपांतर करणें जरूर आहे.

अशा बँका प्रत्येक चारपांच खेड्यांच्या गटाकरितां मध्यवर्ती ठिकाणीं स्थापून, त्यांना शेतकऱ्यांचा पैसा सुरक्षित ठेवण्याचें व त्यांना जरूर तेव्हां पैसा कर्जाऊ देण्याचें केंद्र बनविलें पाहिजे. शेतकरी ४।५ टक्क्यांवर कर्ज देण्यास प्रवृत्त होऊं शकत नाहीं व त्याला अद्यापहि ९।१० टक्क्यांच्या खालच्या दरानें कर्जहि मिळत नाहीं. यांकरितां त्याचेकडून ६।७ टक्क्यानें बँकेनें ठेवी घेऊन, त्याला जरूर तेव्हां ९।१० टक्क्यानें कर्ज द्यावें. याबरोबर त्यांच्यांत अशा बँकांचे फायदे व बचत करण्याची इष्टता, याबाबत सतत प्रचार ठेवला, तर ह्या कार्यांत अल्प काळांत यश येण्याची शक्यता आहे. ही बँक व्यापारी तत्त्वावर चालवितां येणें प्रथम प्रथम तरी अशक्य आहे. तेव्हां सरकारनेंच त्या चालविल्या पाहिजेत व होईल तो तोटा सोसला पाहिजे. पण हा तोटा निरर्थक जाणार नाहीं. यायोगें शेतकऱ्यांत बचतीची प्रवृत्ति जोपासली जाईल.

नुसतें कर्ज देण्याघेण्याचेंच हें केंद्र करून चालणार नाहीं; तर यामार्फत शेतकऱ्यांच्या मालाची खरेदीविक्रीदेखील केली पाहिजे. यायोगें बँकेचें कर्ज वसूल होईल व शेतकऱ्यांसहि त्यांच्या मालास योग्य किंमत मिळेल.

सध्यां विविधकार्यकारी ( Multipurpose ) पतपेढ्या ठिकठिकाणीं स्थापन होत आहेत. शेतकऱ्यांस योग्य दरांत कर्ज मिळणें, त्यांच्या मालाची खरेदी-विक्री करणें, त्यांना अल्प भाड्यानें शेतीचीं अवजारें वापरण्यास मिळणें, असे त्यांचे उद्देश आहेत. पण ह्या गांवोगांवच्या लोकांमार्फत चालविल्या जात असल्यानें व्यक्तिगत वैमनस्यें, चालविणाऱ्या व्यक्तींचा स्वार्थ, तज्ज्ञपणाचा अभाव, यांमुळें त्या जेवढ्या प्रमाणांत यशस्वी व्हावयास पाहिजेत तेवढ्या झालेल्या दिसत नाहींत. त्यांचेऐवजीं वरीलसारखी संघटना निर्माण करून तिचेमार्फत शेतकऱ्यांत बचतीच्या प्रवृत्तीची जोपासना, त्यांना योग्य दरांत कर्ज मिळण्याची व्यवस्था, शेतीचीं अवजारें अल्पभाड्यानें मिळणेची सोय, त्यांच्या मालाची योग्य दरांत खरेदी-विक्री, त्यांना शेतीविषयक तज्ज्ञाचा सल्ला, ह्या व इतर तत्सम गोष्टी करून घेतल्या, तर ह्या बँका म्हणजे एक ग्रामसुधारणेचें केंद्र ठरून हां हां म्हणतां देश प्रगति-पथावर मार्ग आक्रमूं शकेल. गांवोगांवीं या बँकेस कर्ज देण्याघेण्याबाबत सल्ला देणाऱ्या कमिट्या फार तर नेमाव्यात, पण बँकेवर त्या सल्ल्याचें बंधन असूं नये व इतरहि दृष्टीनें बँकेच्या कामांत कोणाहि गांवकऱ्याचा हस्तक्षेप होऊं नये अशी

दक्षता घ्यावी लागेल. गांवकऱ्यांस लोकशाही शिक्षण ग्रामपंचायतीमार्फत मिळेल. या बँका त्या कामीं वापरूं नयेत. सरकारी खर्चाचा ओघ ह्या बँकांकडे वळविणें इष्ट आहे, हें वरील विवेचनावरून दिसून येईल.

सबंध देशांत समाजहिताच्या दृष्टीनें सार्वजनिक कामें शक्य तितक्या कार्यक्षमतेनें चालावींत म्हणून मध्यवर्ती सरकार त्यांतील कांहीं प्रांतिक सरकारांकडे सोपवितें. प्रांतिक सरकार सोयीच्या दृष्टीनें त्यांपैकीं कांहीं नगरपालिका, स्थानिक मंडळें ( लोकलबोर्डें ) यांकडे सोपवितें. आपापल्या कक्षेंतील कामें व्यवस्थित रीतीनें पार पाडतां यावींत म्हणून ज्या त्या घटकांना ( प्रांतिक सरकारें, नगरपालिका व स्थानिक मंडळें ) वेगवेगळे उत्पन्नाचे मार्गहि आंखून दिलेले असतात. त्यांचें विवेचन पुढें बाविसाव्या प्रकरणांत करूं.

तात्पर्य, सरकारी खर्चाचा ओघ शिथिल आर्थिक व्यवहारांत चैतन्य निर्माण करण्याकडे, कमी प्रातीच्या समाजघटकांस आश्रय देण्याकडे, घटकाघटकांमधील आर्थिक विषमता कमी करण्याकडे वळवून, एकंदर समाजास शांतता व सौख्याचा लाभ मिळवून देईल व प्रत्येकास आर्थिक स्थैर्य लाभेल; अशा रीतीनें तो करण्याचा प्रत्येक लोकशाहीचा प्रधान हेतु असला पाहिजे.



# प्रकरण १६ वें

# आर्थिक विषमता

या अर्थव्यवहाराच्या विवेचनामध्यें आपण वेळोवेळीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, कर-पद्धतीचा उपयोग समाजांतील घटकाघटकांमधील आर्थिक विषमता कमी करण्याकडे करण्यांत आला पाहिजे. अर्थात् हें गृहीत-कृत्य म्हणून अलीकडे अलीकडेच मानलें जाऊं लागलें आहे; व त्या दृष्टीनें हल्लीं सरकारें प्रयत्न करीत आहेत. याकरितां गेल्या शतकापासून सतत प्रचारानें अर्थशास्त्रज्ञ, समाजवादी व कम्युनिस्टांनीं जनमत तयार करीत आणलें आहे.

**१. रिकार्डोचें मत–वारसाकरानें भांडवल कमी होतें.**—इ. स. १८१७ त प्रसिद्ध इंग्लिश अर्थशास्त्रज्ञ रिकार्डोचें सार्वजनिक अर्थव्यवस्थेचीं मूलतत्त्वें ( Principles of Political Economy & Taxation ) हें पुस्तक प्रसिद्ध झालें. त्यांत त्यानें वारसा-कराविषयीं 'असा कर लादणें म्हणजे देशांतील भांडवल कमी करणें होय'[1] असें प्रतिपादन केलें आहे. या काळापर्यंत अर्थशास्त्रज्ञ व इतर विचारवेत्ते हे देखील समाजांत दिसणारी आर्थिक विषमता ही एक अपरिहार्य व इष्ट अशी गोष्ट आहे, असें मानीत. त्यांच्या मतें समाजांतील कांहीं व्यक्तींजवळच पैसा असणें ही एक अत्यावश्यक गोष्ट आहे. त्यायोगें देशांतील धंदे वाढवितां येणें शक्य होतें. कलेस उत्तेजन मिळतें व समाजोपयोगी शाळा, देवळें अशीं साधनें सहजासहजीं निर्माण करतां येतात. समाजामध्यें दातृत्व या गुणाची वाढ होते, या तऱ्हेचे विचार मांडले जात. आपल्याकडील संस्थानिक, जहागिरदार व सरंजामदार या वर्गाचें अस्तित्वहि वरील कारणांस्तव जरूर आहे, अशा तऱ्हेचें प्रतिपादन परवांपरवांपर्यंत केलें जाई. या लोकांच्या डोक्यांत असें यावयाचें नाहीं कीं, एखाद्या व्यक्तीच्या लहरीवर अशा समाज-

---

1. All taxes affecting the transference of property from the dead to the living, diminish thereby the capital of the Country.

सुखवृद्धिकारक गोष्टी अवलंबून ठेवण्यापेक्षां राजसत्तेच्या कर्तव्यांपैकींच एक आवश्यक असा भाग म्हणून वरील गोष्टींची गणना कां न करावी ?

**२. मिलचा वारसापद्धतीवरील हल्ला**—पाश्चात्य अर्थशास्त्रज्ञांत जॉन स्टुअर्ट मिलनें समाजांत आर्थिक विषमता असणें अयोग्य, अतएव ती सरकारनें कर-पद्धतीनें बदलून कमी करण्याचा प्रयत्न करावा, असें औद्योगिक क्रांतीनंतर प्रथम प्रतिपादिलें. औद्योगिक क्रांतीपूर्वी उत्पादनाचीं साधनें प्रायः मानवी दोन हात हींच असल्यानें आर्थिक विषमता त्याकाळीं तुलनात्मक दृष्टीनें पहातां फारच कमी होती. या प्रश्नास तीव्रतर स्वरूप नंतरच आलें. मिल इ. स. १८४८ सालीं प्रसिद्ध केलेल्या अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें ( Principles of Political Economy ) या आपल्या ग्रंथांत म्हणतो, ' आपल्या मुलांस समाजाचा एक योग्य घटक बनण्याकरतां जेवढें शिक्षण जरूर तेवढें व नंतर आयुष्यास सुरुवात करण्याकरतां जेवढी जायदाद जरूर असेल तेवढी बापानें जरूर द्यावी; पण यापेक्षां जादा कां द्यावी हें मला समजत नाहीं.'[१]

**३. मार्क्सचें आर्थिक विषमतेविरुद्ध प्रभावी विवेचन**—यानंतर मार्क्सनें आपल्या भांडवल ( Capital ) या ग्रंथाचा पहिला भाग इ. स. १८७१ त प्रसिद्ध केला. त्यांत शास्त्रीय दृष्टीचा अभाव असून मजूर व गरीब यांची हलाखीची स्थिति मात्र प्रभावी रीतीनें रंगविली आहे, असें बऱ्याच माननीय अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. पण त्यांतील समाजाच्या खालच्या दर्जाविषयींचा जिव्हाळा, व ती मांडण्याची आकर्षक पद्धति यायोगें मात्र लखपति व क्रोडोपति हा वर्ग ऐतखाऊ असून समाजोपयोगी असें कोणतेंहि कार्य तो

---

* 1 The parent owes to society to endevour to make the child a good & valuable member of it and owes to his children to provide, so far as depends on them, such education, and such appliances & means, as will enable them to start with a fair chance of achieving by their own exertions a successful life. To this every child has a claim; & I cannot admit that, as a child he has a claim to more... The surplus, if any, I hold that the state may rightly appropriate to the general purposes of the community.

करीत नाहीं; अतएव तो नष्ट केला पाहिजे; ही विचारसरणी बळावत चालली व तीस त्याचेनंतरच्या अर्थशास्त्रज्ञांनींहि पुष्टि दिली. या सर्वांचा परिणाम म्हणजे हल्लीं करानेंदेखील आर्थिक विषमता कमी करावी हें प्रमाण मानलें गेलेलें करपद्धतीचें तत्त्व हें होय.

**४. करपद्धतींत वाढत्या श्रेणीचें तत्त्व पूर्णपणें अंमलांत आणण्याबाबतींतील अडचणी**—या दृष्टीनेंच कर-कसोट्यांचें विवेचन करतांना वाढत्या उत्पन्नावर वाढता कर असणारी, चढत्या कराची ( Progressive ) पद्धति असावी, असें आपण म्हटलें आहे. हल्लीं प्राप्तिकर आकारतांना हें तत्त्व लागू केलें गेलें आहे. पण दुसऱ्या करांच्या बाबतींत मात्र असा प्रकार फारसा दिसून येत नाहीं. त्याचें मुख्य कारण म्हणजे प्रत्यक्ष अंमलबजावणींत येणाऱ्या अडचणी. एखाद्यावर पुष्कळ माणसें अवलंबून असल्यास, त्यास त्या मानानें खर्चहि जास्त करावा लागेल. अशा इसमास त्याच्या एकंदर उत्पन्नाच्या मानानें विक्रीकरासारखा कर जादा द्यावा लागेल. पण अशा इसमास त्याच्यावर अवलंबून असणाऱ्या माणसांची मोजदाद करून त्यास त्या प्रमाणांत कर परत द्यावयाचा म्हटल्यास, कोण गुंतागुंत निर्माण होईल. प्रत्येकास आपला खर्च किती, कुटुंबांत एकंदर माणसें किती, विक्रीकर भरला किती असा हिशेब ठेवावा लागेल. तो विक्रीकर तपासून बरोबर आहे, अशी अधिकाऱ्यास खात्री करून घ्यावी लागेल, व नंतर तो परत दिला जाईल. पण अशानें प्रत्येकास हिशेब ठेवण्याचा त्रास होणार. बरें, ठेवला तर तो तपासण्यास नौकरवर्ग किती लागेल याची कल्पनाच केलेली बरी. एकट्या पुणें शहरांत जवळजवळ एक लाख कुटुंबें असावींत. रोज १० कुटुंबांचे हिशेब याप्रमाणें एक महिन्यास ( २५×१० ) २५० व वर्षास ३००० याप्रमाणें जरी एक अधिकारी तपासूं शकला तरी, एकट्या पुणें शहरास ३३ अधिकारी लागतील. अर्थात् असें करण्यांत सरकारला एकंदर खर्च बराच करावा लागेल. व तो खर्च करवसुलीच्या मानानें योग्य ठरणार नाहीं. विक्रीकराच्या बाबतींतदेखील चैनीच्या समजल्या जाणाऱ्या व मौल्यवान् अशा गोष्टींवर जादा दरानें कर आकारून, व गरिबांसह सर्वांस आवश्यक अशा अन्नधान्यें व जाडेंभरडें कापड या वस्तूंवर हा कर माफ करून त्यांत गतिमानता ( Progressive ) आणली आहे. आयात-कर, उत्पादन-कर हेदेखील

श्रीमंतांवर जादा व गरिबांवर त्या मानानें कमी अशा पद्धतीनें आकारतां येत नाहींत. पण सरकार आपल्या उत्पन्नांतून खर्च करतांना, तो गरिबांस जास्त फायदेशीर व श्रीमंतांस कमी फायदेशीर या दृष्टीनें खर्चाबाबत धोरण आंखून शक्यतों आर्थिक विषमता कमी करण्याचा प्रयत्न करतें.

इतकें सारें करून जेव्हां आर्थिक विषमता कमी होऊं शकत नाहीं, हें जेव्हां सरकारच्या नजरेस आलें तेव्हां वारसा-करासारखे कर लादून ती कमी करण्याचा प्रयत्न हल्लीं होत आहे. त्याबाबतचें विवेचन अकराव्या प्रकरणांत आलेलेंच आहे.

**५. पगारांतील तफावत कमी करणें**—आर्थिक विषमता कमी करण्याचा उपाय म्हणून निरनिराळ्या दर्जाच्या कामगारांच्या मासिक उत्पन्नांतील तफावत कायद्यानेंच कमी करावी, असेंहि पुष्कळ वेळां सुचविलें जातें. अशा विचार-सरणीच्या लोकांचें म्हणणें असें कीं, भंगी, शिपाई, हमाल व मजूर, हे लोक प्रोफेसर, अधिकारी, यंत्रतज्ज्ञ व मंत्री यांच्याप्रमाणेंच समाजाचें एक महत्त्वाचें काम करीत असतात. श्रमविभागणीच्या तत्त्वावरच कामाची वांटणी झालेली असते. तेव्हां पहिल्या प्रकारच्या लोकांना दुसऱ्या प्रकारच्या लोकांपेक्षां जादा पगार असूं नये. पण या बाबतींत दुसऱ्या प्रकारचे लोक पहिल्या प्रकारच्या लोकांचें काम करूं शकतील, पण याउलट काम-विभागणी होऊं शकणार नाहीं; हा मुद्दा दृष्टिआड केला जातो. यावर उपाय म्हणून हे विचारवंत असें प्रतिपादन करूं लागतात कीं, ठीक आहे, दुसऱ्या प्रकारच्या लोकांना आपण जादा पगार देऊं, पण त्यामध्यें सध्यांसारखी भयंकर तफावत नको. शिपायास रु. ६० पगार, त्याचेवरील मुख्यास रु. ६००० पगार एवढा फरक कां? ह्या मुद्द्यांत मात्र बरेंच तथ्य आहे. या दोन टोंकांतील अंतर जेवढें कमी करतां येईल तेवढें करणें अवश्य आहे. आर्थिक विषमता वाईट हें शास्त्रशुद्ध विवेचनानें व तशा सतत प्रचारानें जनमतास पटवून द्यावें, म्हणजे आपोआपच कमी कमी पगार घेण्यांतील बोंचकपणा जाणवणार नाहीं. समजा, या प्रकारानेंहि पगारांतील तफावत जेवढ्या प्रमाणांत कमी व्हावयाला हवी तेवढी झाली नाहीं तरी फारसें बिघडत नाहीं. वाढत्या कराची पद्धति व वारसा-कर या दोन्ही तऱ्हेच्या करपद्धतीनें आपण ती परिणामकारकरीत्या कमी करूं शकतों हें आपण वर पाहिलेंच आहे.

हल्लीं सरकारी नोकरांना दिल्या जात असलेल्या पगारश्रेणींतील तफावत बरीच कमी केलेली आहे. नवीन श्रेणीप्रमाणें कारकुनास रु. १०० पगार मिळतो तर सरकारच्या मुख्य चिटणिसास रु. २२५० मिळतो. पूर्वी हाच पगार अनुक्रमें रु. ३० व ४००० असे. हल्लीं महागाईचें प्रमाण ४०० टक्क्यानें वाढलेलें आहे. याचा विचार करतां जास्तींत जास्त पगार रु. २२५० असणें म्हणजे फारशी मिळकत नव्हे. पूर्वीच्या भाषेंत हा पगार रु. ५००-५५० पेक्षां जास्त असूं शकणार नाहीं. यामध्यें फरकच करावयाचा तर कमींत कमी मिळणारा पगार रु. १२५-१५० पर्यंत वाढवून करतां येईल.

**६. आर्थिक विषमता व हुकूमशाहीचें नातें**—आर्थिक विषमता कमी करण्याच्या सोज्ज्वल नांवाखालीं लोकशाही सरकारांमध्येंदेखील, कोणत्याहि गोष्टी कायद्यानें करण्याची घिसाडघाई वृत्ति मधूनमधून डोकावूं लागलेली दिसते. योग्य प्रकारानें लोकांची मनोभूमिका तयार न करतां अशा घाईंत जे कायदे केले जातात, त्यांत पूर्ण व सारासार विचारांचा अभाव दिसतो. त्यामुळें ते प्रत्यक्ष अंमलबजावणींत जाचक ठरतात. यायोगें लोकांत असंतोष माजतो. आम्ही जें करतों तें योग्यच, अशा विचारानें सरकार का एकदां भारलें कीं, जनमनांत दिसून येणारा असंतोष कांहीं उपद्व्यापी लोकांचा उद्योग आहे अशी सरकार आपली खुळी समजूत करून घेतें, व त्यामुळें तें दडपशाही करण्यास प्रवृत्त होतें, व त्याचेच पुढें हुकूमशाहींत रूपांतर होतें. म्हणजे करायला गेलें एक व झालें भलतेंच असा प्रकार होतो. ' विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरम् ' अशांतली गत होते.

युरोपमध्यें इटली, जर्मनी या देशांत पहिल्या महायुद्धानंतर जो हुकूमशाहीचा प्रादुर्भाव दिसून आला, तो वरील प्रवृत्तीमुळेंच. जास्तींत जास्त लोकांना सुख देण्याच्या नांवाखालीं व्यक्तिस्वातंत्र्यावर प्रथम गदा घातली, व साऱ्या उद्योग-धंद्यांवर सरकारी नियंत्रण पक्कें केलें. सारे उद्योगधंदे सरकारी नियंत्रणाखालीं गेल्यावर सरकारच्या इच्छेप्रमाणें व गरजेप्रमाणें उत्पादन होऊं लागलें. त्यांत लोकांच्या गरजेचा विचार न करतां सरकारला ज्या गोष्टी आवश्यक वाटत, त्यांचेच उत्पादनास प्राधान्य दिलें गेलें. सरकारनें आपली अशी समजूत करून घेतली कीं, आपल्या राष्ट्रास जर कशाची अत्यंत जरूर असेल तर ती आपल्याच

राष्ट्रांतील ज्यू वगैरे अन्यवंशीय जमातींना हांकलून देण्याची व शेजारचीं राष्ट्रें व आफ्रिकेंतील अबिसीनियासारखीं लष्करी तयारीच्या दृष्टीनें मागासलेलीं राष्ट्र आपल्या कह्यांत आणण्याची. असें केल्यानें आपल्या राष्ट्रांतील लोक सुखी होतील. थोडा वेळ असें जरी धरून चाललें कीं, अशानें जर्मन व इटालियन लोक सुखी झाले, तरी शेजारच्या ऑस्ट्रियन, फ्रेंच किंवा आफ्रिकेंतील अबिसीनियन लोकांच्या सुखाचें काय? अर्थात् संकुचित राष्ट्रवादानें भारलेल्या जर्मन व इटालियन हुकूमशहांच्या डोक्यांत हा विचार कोठून शिरायला! शेवटीं काय झालें हा इतिहास अगदींच ताजा आहे. त्याची पुनरुक्ति करण्याचें कारणहि नाहीं, व तें आपलें कामहि नव्हे. एथें विचार एवढाच प्रस्तुत आहे कीं, गेले आर्थिक विषमता कमी करायला, व प्रत्यक्षांत दुसरें महायुद्ध ओढवून घेऊन आपल्या राष्ट्रास व त्याबरोबरच जगास त्यांनीं अनर्थपरंपरेच्या गर्तेत नेऊन सोडलें.

रशियांतहि तेथील साऱ्या चळवळींचा मूळ उद्देश आर्थिक विषमता कमी करण्याचा. पण प्रत्यक्षांत आर्थिक विषमता कमी करण्याबरोबर स्टालीनच्या पोलादी हुकूमशाहीचा अवतार झाला. त्याउलट इंग्लंडमध्यें लोकजागृति सतत प्रचारानें व युक्तिवादानें करून आर्थिक विषमता कमी करण्याचा लोकशाही प्रयत्न चालू आहे, व त्यास बरेंच मूर्त स्वरूप आलेलें दिसत आहे. हिंदुस्थानांतहि पंडित नेहरू या महान् तत्त्ववादी नेत्याच्या मार्गदर्शनाखालीं तसा प्रयत्न चालू आहे. कांहीं कांहीं प्रांतिक सरकारांनीं पूर्ण व सारासार विचार न करितां गरीब लोकांचे-जवळ जादा पैसा रहावा या चांगल्या उद्देशानें दारूबंदीसारखे कायदे पास करून घेतले आहेत. पण प्रत्यक्षांत दारू पिण्याचें प्रमाण वाढलेलें आहे. बेकायदा राहिलेल्या दारूची किंमत कमी असल्यानें कदाचित् कांहीं कांहीं दारुड्यांस कमी पैसा खर्च करावा लागत असेल, पण दारू पिणारांमध्यें स्वस्ताईमुळें जादा लोकांचा समावेश झाल्यानें एकंदर समाजाचा पैसा दारूवर कमी खर्च होत असेल असें म्हणवत नाहीं. वास्तविक सरकारनें दारूवरील कर योग्य प्रमाणांत वाढवून आलेल्या पैशाचा उपयोग पद्धतशीर खर्चानें आर्थिक विषमता सुसह्य करण्याकडे केला असता तर बरें झालें असतें. अर्थात् अशा घिसाडघाईनें कायदे करण्याच्या प्रवृत्तीची, पं. नेहरूंसारख्यांकडे नेतृत्व असेतों, हुकूमशाहींत रूपांतर होण्याची शक्यता दिसत नाहीं.

**७. कूळकायदा–त्याचा हेतु व परिणाम**—पूर्ण विचार न करितां मुंबईसरकारनें चांगल्या हेतूनें केलेल्या कूळकायद्याविषयीं थोडेंसें विवेचन येथें करूं. कूळकायद्याचा हेतु काय, तर पुष्कळसे जमीनदार आपल्या जमिनी स्वतः न कसतां कुळांकरवीं कसून जेवढा जास्त खंड घेतां येईल तेवढा घेत. एवढेंच नव्हे तर, जमिनीची दुरुस्ती, बांध–बांधणी, मेहनत–मशागत, खत–पाणी यांकडेहि बिलकूल लक्ष देत नसत. असें दिसून आल्यानें जमिनीच्या मेहनत–मशागतीकडे लक्ष देण्यास कुळांस आपुलकी वाटावी व खंडहि वाजवीपेक्षां फाजील घेण्याची जमीनदारांतील प्रवृत्ति कमी होऊन कुळांस त्यांच्या श्रमाच्या बदलांत योग्य मोबदला मिळावा व त्यांस कायद्यानें तसें संरक्षण मिळावें या हेतूनें हा कायदा केला. पण प्रत्यक्ष काय वस्तुस्थिति आहे तें पहा. या कायद्यानें जमीनदारांस आपल्या हक्कांवर गदा येत आहे असें वाटल्यानें ते पूर्वी जें कांहीं थोडें लक्ष जमिनीकडे देत होते, तेंहि देईनासे झाले. कुळाजवळ पैसा व मेहनत–मशागत कशी करावी याच्या ज्ञानाचा अभाव असल्यानें, त्यांनाहि या कायद्याचा फायदा घेतां येईना. या सर्वांचा परिणाम काय झाला तर जमिनीचा पूर्वींपेक्षांहि मगदूर कमी झाला व त्याबरोबरच आपोआप उत्पादनहि कमी झालें. यापेक्षां आर्थिक विषमता कमी करणें हा मूळ हेतु मनांत धरून, समजा, ५० एकरांपेक्षां जादा जमीन असणारावर जमिनीच्या किंमतीच्या प्रमाणांत कर आकारला गेला असता, तर जमीनदारांस सर्व जमीन आपणांजवळ ठेवावयाची तर कर भरण्याकरतां ज़ादा उत्पादन वाढविण्याची जरूर भासली असती, किंवा कराच्या कचाट्यांतून सुटण्याकरतां जमीन विकावी तरी लागली असती. अशानें एका धोंड्यानें दोन पक्षी मारले गेले असते. जमिनी विकल्या गेल्यानें आर्थिक विषमता कमी झाली असती व त्याबरोबरच उत्पादनहि वाढविलें गेलें असतें. समजा, कालांतरानें जमीन घेण्यास पैसा नसल्यानें कोणी शिल्लक राहिला नसता, अशा स्थितींत जमिनदारांनीं उत्पादन वाढविण्याकरितां सहकार्यानें सहकारी शेती केली असती. हेंहि शक्य झालें नसतें, तर सरकार स्वतःचें एक मंडळ स्थापून या मंडळाकरवीं ज्या जमिनींची मशागत अपेक्षेप्रमाणें होत नाहीं, त्या जमिनींची मशागत करून, जादा उत्पादन करूं शकलें असतें. कूळकायद्याचा उद्देश निव्वळ कुळांस संरक्षण देणें हा नव्हताच. संरक्षणाबरोबर

जादा उत्पन्न होण्यासाठीं कुळांस प्रोत्साहन मिळेल हा प्रमुख उद्देश होता. वर सुचविलेल्या पद्धतीनेंहि कुळांस सवलती देणें शक्य आहे. पण कुळांस सचलती देणें हा खरा मोठा प्रश्न नसून असंघटित शेतमजुरांस संरक्षण देणें हा एक फारच मोठा प्रश्न आहे. तो सोडविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. त्या दृष्टीनें हिंदुस्थान-सरकारचा प्रयत्न चालूहि आहे. असो. हा मुद्दा येथें प्रस्तुत नाहीं.

पुष्कळ लोक बेकार राहिल्यानें राष्ट्रीय उत्पादनांत उपलब्ध असलेल्या सर्व मनुष्य-शक्तींचा उपयोग करून घेतला जात नाहीं. त्यायोगें उत्पादन कमी पडतेंच, पण त्याबरोबर आर्थिक विषमताहि वाढत जाते. पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं, श्रीमंतांवर जादा कर लादल्यानें त्यांची नवीन धंदे काढण्याची किंवा आहे ते वाढविण्याची कुवत त्यांचे अंगीं राहात नाहीं, व म्हणून जादा लोकांस नोकरी-धंदा न मिळाल्यानें बेकारी वाढत जाते. या प्रश्नाचें पुढील प्रकरणांत सविस्तर विवेचन करूं.



## प्रकरण १७ वें

# कर व बेकारी

**१. बेकारी**[1]—हें एक सामाजिक असंतोषाचें प्रमुख कारण आहे. त्यामुळें आर्थिक विषमतेंत भर पडत जाते एवढेंच नव्हे तर, 'आधीं पोटोबा मग विठोबा' या न्यायानें बेकारास पोट स्वस्थ बसूं देत नाहीं. नुसती आर्थिक विषमता समाजांतील निरनिराळ्या थरांत द्वेषभावनेचें बीजारोपण करून, कालांतरानें ह्या द्वेष–बीजाचें वटवृक्षांत रूपांतर करून, समाजाचा पायाच उखडूं शकेल. पण बेकारी ही इतका काळहि वाट पाहूं शकणार नाहीं. 'Empty mind is devil's workshop', कशांतहि न गुंतलेलें मन हा सैतानाचा कारखाना आहे, अशी म्हण आहे आणि ती यथार्थहि आहे. बेकारांस कांहींच उद्योग नसल्यानें व तशांतच पोटाची खळगी कशी भरावी हीहि सारखी विवंचना असल्यानें, तो आतां काय करावें, मग काय करावें, ह्या विचारांत सारखा असणार व कांहींच मार्ग सुचला नाहीं तर अत्याचारास प्रवृत्त होणार. असे एकास दोन, दोहोंस तीन, अशा रीतीनें पुष्कळ सहचारी एकत्र झाले कीं, ते सहज कांहीं तरी क्रांतिकारक करूं शकतील. थोडक्यांत आर्थिक विषमतेचें बेकारी हें एक अगदीं जुळें भावंड आहे. ह्या पुस्तकांत आपण वेळोवेळीं सरकारी कर्तव्य, कायदा व सुव्यवस्था एवढयापुरतेंच हल्लीं मर्यादित न राहतां सामाजिक व आर्थिक बाबीहि त्याच्या कक्षेंत आल्या आहेत, असें म्हटलें आहे. त्यानुसार बेकारीनिवारण हें एक हल्लींच्या सरकारचें प्रधान कर्तव्य होऊन बसलें आहे. जें सरकार या कर्तव्यांत कसूर करील, त्याचा पायाच अस्थिर होईल, म्हणून कोणतेंहि सरकार याकडे दुर्लक्ष करूं शकणार नाहीं.

---

१. सन १९५१ च्या खानेसुमारीप्रमाणें बाराहि महिने अर्धवट बेकारींत असलेल्या शेतमजुरांची संख्या ८·३ कोटी आहे.

**२. कम्युनिस्ट वा फॅसिस्ट राजवट व बेकारी**—कम्युनिस्ट सरकारांनीं हा प्रश्न बऱ्याच अंशीं यशस्वी रीतीनें सोडवला आहे. त्यांचेकडे कायद्यानेंच खाजगी मालमत्ता अगदींच मर्यादित केली असल्यानें, सारें भांडवल सरकारी हुकमतींत राहातें. तसेंच सर्व तऱ्हेचें उत्पादन वाढवून, सर्व लोकांचें राहणीचें मान वाढविणें हें तर त्यांचें ध्येयवाक्य. त्यामुळें सर्व राष्ट्रीयसंपत्तीचा उपलब्ध मनुष्यशक्तीच्या साहाय्यानें जादा उत्पादन करण्याकडे उपयोग कसा करून घ्यावा व झालेलें उत्पादन समाजाच्या निरनिराळ्या घटकांत कसें विभागावें एवढीच त्या सरकारची विवंचना. रशिया, चीन ह्या राष्ट्रांत कम्युनिस्ट सरकारें अधिकारावर आहेत. ते देश मोठे, त्यांची नैसर्गिक संपत्ति अवाढव्य. या सर्व अनुकूलतेमुळें अद्याप कित्येक वर्षें साध्या मनुष्यशक्तीचा उपयोग करूनहि, त्यांच्या गरजेइतकें उत्पादन होणें शक्य होणार नाहीं. लोकसंख्याहि पुष्कळ असल्यानें एवढ्या साऱ्यांचें राहणीमान वाढविणें ही कांहीं साधी गोष्ट नाहीं. तशांतच केलेलें उत्पादन सर्वांत विभागणें हा उत्पादनाचा प्रधान हेतु असल्यानें, त्या देशांत बेकारी हा प्रश्नहि आणखी बराच काल निर्माण होऊं शकणार नाहीं. समजा, देशाच्या नैसर्गिक संपत्तीच्या मर्यादितपणामुळें कधीं काळीं हा प्रश्न उपस्थित झालाच, तर उत्पादनाची जशी वांटणी करावयाची, त्याच तऱ्हेनें कामाचीहि वांटणी केली म्हणजे प्रश्न सुटला.

फॅसिस्ट राज्यव्यवस्थेंतहि उत्पादनसाधनांवर सरकारचें पूर्णपणें नियंत्रण असल्यानें, व त्या राजवटीचा प्रधान हेतु स्वदेशांतील विरोध निग्रहानें समूळ नाहींसा करून, व्यक्तिनिष्ठ हुकुमशाही स्थापण्याचा व तदनंतर जमल्यास परराष्ट्रांवरहि येनकेन प्रकारेण वर्चस्व लादण्याचा असल्यानें, सैन्यसंभार भरपूर ठेवणें अशा सरकारास जरूर असतें. याकरितां देशांतील उपलब्ध मनुष्यशक्तीचा पुरेपूर उपयोग करून घेणें अशा सरकारास आवश्यक असतें. म्हणून ज्या देशांत अशी राजवट अस्तित्वांत असते, तेथेंहि बेकारीचा फारसा प्रश्न उपस्थित होत नाहीं.

या दोन्ही राजवटींकडे बेकारीचे दृष्टीनें तुलनात्मक पाहातां, पहिलीचा उद्देश जनता-कल्याणाचा असल्यानें ती बरी असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. मग ज्या राजवटींत बेकारी असूं शकत नाहीं, अशी कम्युनिस्ट राजवट बरी कीं काय? असा प्रश्न उपस्थित होतो. कम्युनिझम किंवा समतावाद म्हणजे तरी काय, तर

ज्याच्या त्याच्या कुवतीप्रमाणें काम करणें व ज्याच्या त्याच्या जरूरीप्रमाणें वेतन घेणें. पण अद्याप तरी रशियासारख्या कम्युनिस्ट देशांतहि—या तऱ्हेचें ध्येय असलेली राजवट अस्तित्वांत येऊन ३० वर्षें होऊन गेलीं तरीसुद्धां—ही पद्धत अस्तित्वांत येऊं शकलेली नाहीं. रशियांत कुवतीप्रमाणें काम व त्या प्रमाणांत दाम अशी पद्धति अस्तित्वांत आहे. तेव्हां अगदीं शुद्ध कम्युनिस्ट नसली तरी रशियन तऱ्हेची राजवट असावी कीं काय हा मुद्दा प्रस्तुत आहे.

**३. लोकशाही व बेकारी**—आपण ज्या लोकशाही राजवटीखालीं नांदतों आहों तशाच पद्धतीची, पण रशियाप्रमाणें प्रत्येकास कुवतीप्रमाणें काम व त्या प्रमाणांत दाम अशी व्यवस्था करणारी राजवट असेल तर ती मात्र आदर्श ठरेल यांत शंका नाहीं. मग लोकशाही म्हणजेच रामराज्य असें समीकरण होऊं शकेल. पण अशी राजवट असणें, हें अद्याप तरी मृगजलवत् भासतें आहे. रशियांत फॅसिस्टांसारखी हुकुमशाही राजवट असून ती प्रत्येकाच्या कुवतीप्रमाणें काम घेते, व त्या प्रमाणांत दाम देते. हुकुमशाही राजवट म्हटली कीं, ती डोळ्यांत तेल घालून विरोध दडपून टाकते व आपला मार्ग निष्कंटक करण्याचा प्रयत्न करिते. अशा राजवटीस खुट्ट झालेलें खपत नाहीं. बरें, एकदां सरकारची अशी प्रकृति झाली कीं, जेथें तेथें विरोध दिसूं लागतो; व "वाजे पाऊल आपुलें; म्हणे मागें कोण आलें," अशी परिस्थिति होऊं लागते. अशा स्थितींत आर्थिक स्वातंत्र्याच्या नांवाखालीं व्यक्तिस्वातंत्र्य मारलें जातें, व मग सोन्याच्या पिंजऱ्यांतील पोपटाप्रमाणें जनतेची स्थिति होते. ही स्थिति केव्हांहि स्पृहणीय नव्हे. तेव्हां रशियांत ज्या पद्धतीनें कम्युनिझम आणला व ज्या पद्धतीनें त्याचा राब चालविला जात आहे, ती गोष्ट अनुकरणीय नाहीं. यावरून बेकारी निवारण्याकरितां रशियन तऱ्हेची राजवट आपणांस मानवणार नाहीं हें सिद्ध होतें. लोकशाहींतूनच कुवतीप्रमाणें काम व त्या प्रमाणांत दाम, असा समाजवाद प्रत्यक्षांत आणण्याचा प्रयत्न करणें आवश्यक आहे. त्या दृष्टीनें बेकारीनिवारणार्थ हल्लींच्या सरकारनें कशा तऱ्हेनें प्रयत्न करावा हें पाहूं.

**४. बेकार कोणास म्हणावें?**—ज्यांना शक्य असूनहि आळसामुळें काम करण्याची इच्छा असत नाहीं, किंवा ज्यांना प्रकृतिअस्वास्थ्यामुळें, किंवा मानसिक दौर्बल्यामुळें काम करणें अशक्य असतें, असे लोक खऱ्या अर्थानें बेकार

असूनहि त्यांचेविषयींचा विचार येथें प्रस्तुत नाहीं. ज्यांना इच्छा व कुवत असून व कर्मीत कमी पण जीवनवेतनावर काम करण्याची ज्यांची तयारी असते, पण कामच कांहीं नसल्यानें, ज्यांना बेकार राहावें लागतें अशांचाच विचार येथें कर्तव्य आहे.

**५. भांडवलदारांची ओरड**—भांडवलदार लोकांची नेहमींची ओरड म्हणजे, सरकारनें इतके जबर कर लादले आहेत कीं, त्यांच्याजवळ भांडवलाचा जरूर त्या प्रमाणांत पुरवठा होत नसल्यानें, त्यांना आहे ते धंदेहि चालविणें किंवा त्यांत वाढ करणें कठीण जातें, मग नवीन धंदे काढून बेकार लोकांना काम कोठून देणार ! पण ही निव्वळ दिशाभूल आहे, हें थोडासा विचार केला असतां दिसून येईल. भांडवलदारांजवळचा पैसा करानें कमी होतो म्हणजे काय होतें, तर तो पैसा सरकारच्या तिजोरींत जमा होतो. सरकार तरी त्या पैशाचें काय करतें ? हा पैसा कांहीं लोकांजवळून जमा करून, दिल्लीजवळच्या यमुना-नदींत ओतला जात नाहीं. भांडवलदारांच्याऐवजीं सरकार स्वतः कांहीं उद्योग-धंदे, व्यापार काढील व कांहीं पैसा 'उद्योगधंद्यांच्या भांडवली बँके' (Industrial Financial Corporation) मार्फत खाजगी उद्योगधंद्यांच्या वाढीकरितां उपयोगांत आणील व अशा रीतीनें बेकार लोकांना कामधंदा लावून देईल. खाजगी व्यक्तींपेक्षां, सर्व-लोक-प्रतिनिधिभूत असें जें सरकार, तें जास्त चांगल्या रीतीनें अशा पैशाचा उपयोग करील असें मानण्यास हरकत नाहीं. तथापि करवाढीनें खाजगी भांडवलदारांजवळचें भांडवल त्या प्रमाणांत कमी होईल यांत शंका नाहीं. पण तो मुद्दा अलग आहे, बेकारीशीं त्याचा संबंध नाहीं. तेव्हां करवाढ झाल्यानें बेकारी वाढते, ह्यांत कांहीं तथ्य नाहीं. आतां मुद्दा असा उपस्थित होतो कीं, सरकारनें स्वतः काय उपाय योजावेत म्हणजे बेकारीस आळा बसेल ?

**६. बेकारी निवारण्याचे उपाय--(अ) कामाचे तास कमी करणें**—एक सर्वमान्य उपाय म्हणजे कामाचे तास (Working hours) कमी करणें हा होय. हल्लीं कायद्यानेंच कामाच्या तासांची मर्यादा आठ तास करण्यांत आली आहे. पूर्वी कामगारांकडून भांडवलदार सक्तीनें १०-१०, १२-१२ तास काम घेत. कामगारसंघाच्या (Trade unions) व सरकारच्या दडपणानें जरी आठ तासांच्यापेक्षां जादा काम केलें तर जादा वेतन देण्यांत

येऊं लागलें, तरी त्यामुळें काय झालें, तर व्यक्तिगत कामगारांचा तात्पुरता फायदा झाला; पण बेकारी कमी होण्यास मदत झाली नाहीं. एवढेंच नव्हे तर व्यक्तिशः ज्या कामगारांना असें जादा वेतन मिळूं लागलें, त्यांचाहि तादृश फायद्या-व्यतिरिक्त, एकंदरींत तोटाच झाला. तरुणपणामुळें प्रथम प्रथम मनुष्य जादा काम करूं शकेल, पण पुढें पुढें उतारवयांत शक्ति क्षीण होत जाते, व प्रथम जादा केलेल्या कामाचा परिणाम उतारवयांत जास्त जाणवतो. त्यामुळें ज्यांना एरवीं ५५-६० वयापर्यंत काम करणें शक्य असतें, अशीं माणसें अकालींच वृद्ध होतात. या कारणानें कोणींहि कोणत्याहि स्थितींत आठ तासांच्यापेक्षां जादा काम करूं नये, असेंच हल्लीं कायद्यानें ठरविण्यांत आलें आहे. हा कायदा अंमल-बजावणींतील अडचणींच्या दृष्टीनें अद्याप शेत-मजुरांना लागू करण्यांत आलेला नाहीं. पण मध्यवर्ति सरकारचे तशा दृष्टीनें प्रयत्न चालू आहेत. हिंदुस्थानांत शेतकऱ्यांकडून लहान प्रमाणांत शेती केली जाते, व त्या शेतकऱ्यांस मोसमांप्रमाणें कमी-जास्त शेतमजूर लागतात. तेव्हां वर्षांतून कांहीं माहिने किंवा महिन्यांतून कांहीं दिवस जादा काम करावें लागलें, तरी बाकीच्या वेळांत त्यांना सक्तीची विश्रांति मिळत असल्यानें, वाजवीपेक्षां जादा श्रमानें अशा लोकांच्या प्रकृतीवर कांहीं परिणाम होईल अशी चिंता बाळगण्याचें कारण नाहीं. या मजुरांचा खरा प्रश्न त्यांना बाराहि महिने पुरेसें काम मिळवून देण्याचा आहे. ते वर्षांतून ५।६ महिने तरी बेकारच असतात. अशा तऱ्हेचा कायदा केलाच तर तो फक्त मोठ-मोठ्या भांडवलदारी पद्धतीनें केलेल्या साखरकारखानदार किंवा तत्सम शेत-कऱ्यांसच फक्त लागू करावा लागेल.

(आ) **स्वदेशीस उत्तेजन**—हल्लीं कायद्यानें कामाचे तास आठापर्यंत मर्यादित करूनहि, बेकारीचा प्रश्न सुटलेला नाहीं. तेव्हां हा कांहीं एकमेव उपाय नव्हे. जबर आयात-कर लादून किंवा आयातीवर निर्बंध घालून, परदेशांतून माल येण्याचें थांबवावें, व असा माल स्वदेशांत उत्पादन करून उद्योगधंदे वाढवावे व अशा रीतीनें स्वदेशांतील लोकांस जादा कामधंदा देऊन बेकारीस आळा घालावा, हा एक उपाय सुचविला जातो. पण हा तितकासा परिणामकारी उपाय नव्हे, हें थोडासा विचार केला असतां दिसून येईल. माल आयात होतो, म्हणजे त्याच्या बदला कांहींतरी दुसरा माल निर्यात करावा लागतो. कोणी विनामोबदला माल

पाठविणार नाहीं. अगदीं दुष्काळ किंवा अशीच कांहीं दैवी आपत्ति आल्यास माणुसकीच्या नात्यानें थोडीशी मदत म्हणून कांहीं माल विनामूल्य पाठविला जाईल; पण अशी गोष्ट कारणपरत्वें होणें शक्य आहे, नेहमीं नाहीं. यावरून हें स्पष्ट होईल कीं, ज्या त्या देशाच्या भौगोलिक परिस्थितीमुळें एखादी विशिष्ट वस्तु एखाद्या देशांत निर्माण करणें जास्त सोपें व कमी खर्चात होऊं शकतें. त्यामुळें अशा मालाच्या मोबदल्यांत दुसरा देश आपल्या देशांत सुलभरीतीनें तयार होणारा माल पाठवील. असें न केलें तर जी वस्तु थोड्या परिश्रमांत करणें व मिळणें शक्य असेल, त्या ठिकाणीं फाजील श्रम व पैसा खर्च करावा लागेल. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत व तोहि विशेषतः बंगाल प्रांतांत ज्यूट तेथील विशिष्ट हवामानामुळें व जमिनीच्या वैशिष्ट्यामुळें मुबलक प्रमाणांत निर्माण होतो. तेव्हां ज्यूटच्या गोणपाटाच्या बदल्यांत इंग्लंड आपल्याकडे लोखंडी व पोलादी जिनसा निर्यात करूं शकेल, तर तें दोन्ही राष्ट्रांस सोयीचें होईल. इंग्लंडमध्यें लोखंड व कोळसा विपुल प्रमाणांत खाणींतून मिळतो. त्यामुळें तेथील गरजा भागून असा माल परदेशीं रवाना करणें इंग्लंडला शक्य आहे. अशी देवघेव होणें इष्टच आहे. अशा आयात-निर्यातीवर निर्बंध घालून देशांतील बेकारी कमी करणें शक्य नाहीं. आपण ज्यूटचा माल तयार करतों त्या सर्वांची आपणांस गरज नसते; म्हणून कांहीं निर्यात करतों. त्या निर्यात होणाऱ्या मालाकरितां जे एतद्देशीय परिश्रम खर्च होतात, ते आयातीवर निर्बंध घालण्याचे धोरणानें बंद करावे लागतील. याचा अर्थ तेवढ्या प्रमाणांत बेकारी वाढेल. हे बेकार लोक, समजा, लोखंडी मालाच्या आयातीवर आपण निर्बंध घातल्यानें अशा मालाच्या उत्पादनाच्या धंद्यांत उद्योगास लावले, तर त्या प्रमाणांत बेकारी कमी होईल. पण हें धोरण उभयपक्षीं हितावह ठरत नाहीं. इंग्लंडमध्यें बऱ्याच दिवसांच्या संवयीनें लोखंडी माल उत्पादन करण्यांत तेथील लोक वाकबगार बनले आहेत. तसेंच हिंदुस्थानांत ज्यूट-मालाच्या बाबतींत झालें आहे. बरें ही तात्कालिक परिस्थिति आहे; थोड्या काळानें ज्या त्या देशांत असा वाकबगार कामगारवर्ग निर्माण होईल असें जरी गृहीत धरलें तरी, कच्चा माल जो ज्यूट व लोखंड यांचें उत्पादन कसें वाढविणार ? निसर्गानेंच त्यावर निर्बंध व मर्यादा घातली आहे. कोणींहि स्वयंपूर्ण असूं नये. व्यक्ती-व्यक्तींनीं, देशादेशांनीं एकमेकांवर अवलंबून असावें व परस्पर सहकार्यानें

सर्वांनीं या जगांत गुण्यागोविंदानें रहावें, हा जणुं निसर्ग-संकेतच दिसतो. तेव्हां आयात-निर्बंध हा कांहीं बेकारी निवारण्यास योग्य उपाय आहे, असें म्हणतां येत नाहीं.

या प्रश्नाची दुसरी एक बाजू आहे, तीहि लक्षांत घेतली पाहिजे. ज्यूट आपणांकडे भरपूर प्रमाणांत निर्माण होतो. त्यापासून जो गोणपाट तयार करावयाचा तो येथें तयार न करितां, इंग्लंडला निर्यात करावयाचा व तेथील गिरण्यांत तो तयार करून, पुन्हां येथें आयात करावयाचा. असें करावयाचें म्हणजे हा अर्थातच द्राविडी प्राणायाम. असा उलटसुलट प्रकार करण्यापेक्षां, गोणपाट तयार करण्यास आवश्यक असणारी यंत्रसामुग्रीच आयात करून, गोणपाट निर्यात करणें हा साधा मार्ग. पण असें होत नसलें तर मात्र, ज्यूटच्या निर्यातीवर व गोणपाटाच्या आयातीवर निर्बंध घालणें इष्टच ठरेल. अशानें आपल्याकडील बेकारांस कामधंदा मिळेल. साखर, सायकली वगैरेंच्या आयातीवर जे निर्बंध आपल्या सरकारनें घातले आहेत, ते याच हेतूनें. या दोन्हीं वस्तूंस लागणारा कच्चा माल येथें तयार होतो किंवा खाणींतून निघतो. मग त्यापासून तयार होणारा पक्का माल, येथेंच तयार करणें योग्य. त्यामुळें नवीन उद्योगधंदे निघून, जादा लोकांस काम मिळेल. ज्या ठिकाणीं कच्चा माल रवाना करून, त्याऐवजीं पक्का माल आयात केला जातो, अशा देशांत या मालाच्या आयात-निर्यातीवर निर्बंध घालून, तेवढ्या प्रमाणांत बेकारी कमी करणें शक्य आहे. किंवा परदेशांतून कच्चा माल आयात करून येथें पक्का माल निपज करणारी कारखानदारी वाढूनहि बेकारीस थोडा फार आळा घालणें शक्य आहे. हल्लीं आयातनिर्यातीवर निर्बंध, आयात-निर्यात-कर वाढवून घातले जातात.

( इ ) **कारखानदारीची वाढ**—वरील विवेचनावरून हें लक्षांत येईल कीं, बेकारी नाहींशी करण्याचा प्रमुख उपाय म्हणजे नवीन उद्योगधंदे काढणें, हा होय. निदान हिंदुस्थानसारख्या औद्योगिकदृष्ट्या मागासलेल्या देशांत, कांहीं काळापुरता तरी हा रामबाण उपाय ठरेल यांत संदेह बाळगण्याचें कारण नाहीं. हिंदुस्थान देश अफाट, लोकसंख्याहि भरपूर, तेव्हां कितीहि उत्पादन वाढलें तरी त्याचा खप होणार नाहीं, ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं. असें जर आहे तर, मग घोडें कोठें पेंड खातें, हा प्रश्न साहजिकच उपस्थित होतो. काढावे

हवे तेवढे नवीन धंदे व करावी बेकारी कमी ! पण दिसतो तेवढा हा प्रश्न सोपा नाहीं. नवीन धंदे काढावयाचे म्हणजे, त्यास लागणारा कच्चा माल, यंत्रसामग्री, तज्ज्ञ नौकरवर्ग व संघटनाकौशल्य या चार गोष्टींची अत्यंत जरूरी आहे. सध्यां जागतिक संघटनेनें ( UNO ) मागासलेल्या राष्ट्रांना तज्ज्ञ पुरविण्याचें काम हातीं घेतलें आहे. तसेंच अमेरिकेनेंदेखील त्यांच्या चौथ्या मुद्द्याखालीं ( Point four ) तंत्रज्ञ ( Techanical Personell ) पुरविण्याचें ठरविलें आहे. त्यामुळें नवीन धंद्यास जरूर असणारा तज्ज्ञवर्ग वरील मार्गानें मिळवितां येईल, व त्यांच्या हाताखालीं एतद्देशीय नौकरवर्ग शिकून तयार होईल. अशा रीतीनें ५।१० वर्षांच्या काळांत हा प्रश्न सहज सुटून जाईल. या बाबतींत एवढीच दक्षता घेतली पाहिजे कीं, जरूर तो तज्ज्ञवर्ग येथें आणावा व येथील विशिष्ट वातावरणांत त्यांच्या साहाय्यानें येथील नौकरवर्ग तयार करावा. नाहींतर येथून तांत्रिक माहिती घेण्याकरिता लोक परदेशीं पाठविले, तर त्या देशांतील विशिष्ट हवामान व परिस्थितीमुळें तेथें मिळविलेल्या ज्ञानाचा अशा लोकांना आपल्या देशांतील बदलत्या वातावरणांत उपयोग करून घेतां यावयाचा नाहीं. अर्थात् प्रत्यक्ष कामकाज कसें चालतें, यंत्रसामग्री कशी चालते, त्या बाबतींत प्रत्यक्ष अडचणी काय येतात यांच्या निरीक्षणाकरितां कांहीं लोकांनीं परदेशीं जाणेंहि जरूर आहे. मुद्दा एवढाच कीं, जास्त भर परदेशी तज्ज्ञ येथें आणून त्यांच्याकरवीं येथें तंत्रज्ञ निर्माण करण्यावर द्यावा. दुसरीहि एक खबरदारी या बाबतींत घेतली पाहिजे आणि ती म्हणजे, उठल्यासुटल्या आण परदेशी तज्ज्ञ व त्याकरवीं घे एखादा रिपोर्ट तयार करून, अशी प्रवृत्ति नसावी. आपल्याकडे बुद्धीची वाण बिलकूल नाहीं. आपल्याकडे कोणत्याहि विषयावर आदर्श रिपोर्ट ( Blue Prints ) तयार करणारे विद्वान् हवे तेवढे मिळतील. खरी जरूरी आहे तंत्रज्ञांची. आणि तेवढ्यापुरतेच परदेशी तज्ज्ञ आणावेत. हल्लीं मध्यवर्ती सरकारची, जरूर नाहीं त्या बाबतींत निव्वळ एखाद्या विषयावर एखादी पुस्तिका तयार करण्याकरितां परदेशी तज्ज्ञांची आयात करण्याकडे प्रवृत्ति दिसून येऊं लागली आहे, म्हणून ही सूचना करणें भाग पडलें आहे. नुकतेंच जागतिक संघटनेच्या अन्न-धान्यविषयक समितीचा प्रमुख श्री. ऑर ( Boyd Orr ) याला येथील अन्नधान्यवाढविषयक सुरू असलेल्या निरनिराळ्या योजनांची पाहाणी करण्या-

करितां बोलाविलें होतें. ते गृहस्थ आले, येथील योजना पाहिल्या, ठीक आहेत म्हणून सांगितलें व परतले. पण सरकारला त्याकरितां रु. ३ लक्ष खर्च करावे लागले. असो. तज्ज्ञांच्या प्रश्नाच्याबरोबर संघटनाकौशल्याचा प्रश्नहि फारसा अवघड नाहीं. येथें कापडगिरण्या, पोलादाचे कारखाने असे मोठमोठे उद्योगधंदे अस्तित्वांत आहेत. त्यांतील तज्ज्ञांमधून भरपूर संघटनाकौशल्य मिळूं शकेल. जरूरच पडली तर ब्रिटन किंवा अमेरिका येथील कारखानदारांचें साहाय्यहि मिळूं शकेल. खरा प्रश्न आहे यंत्रसामग्रीचा व कच्च्या मालाचा.

कोणत्या प्रकारचा धंदा काढावयाचा किंवा सध्यांच्या धंद्यांपैकीं कोणता वाढविणें जरूर आहे यावर कच्च्या मालाचा व यंत्रसामग्रीचा प्रश्न अवलंबून आहे. सध्यां अस्तित्वांत असलेल्या कापडाच्या व लोखंड–पोलादाच्या धंद्यांची वाढ करण्यास पुष्कळ वाव आहे. दुसऱ्या महायुद्धामुळें जपानी कापडधंदा बसल्यानें सुदूर–पूर्व व मध्यपूर्व या भागांत हिंदी कापडास फार मोठी बाजारपेठ मिळाली आहे. पण या धंद्यास जरूर असलेला–कच्चा माल म्हणजे कापूस, याकरितां आपणांस मुख्यतः पाकिस्तान व इजिप्त यांवर अवलंबून राहावें लागतें. पाकिस्तानच्या आडमुठेपणामुळें व इजिप्शियन कापसाच्या महागाईमुळें कापूस मिळविण्याच्या बाबतींत फार अडचणी निर्माण झाल्या आहेत. लोखंड–पोलादाच्या उत्पादनाच्या बाबतींत मुख्य अडचण आहे यंत्रसामग्रीची. तसेंच विमानोत्पादन, जहाजें बांधणें, अवजड दारूगोळा निर्माण करण्याचे कारखाने उघडणें, याबाबतींतहि यंत्रसामग्रीची प्रायः अडचण आहे. हिंदुस्थानची सध्यांची औद्योगिक प्रगति पाहिली तर यंत्रसामग्रीकरितां आणखी कित्येक वर्षे परदेशांवरच अवलंबून राहावें लागेल. कच्चा माल मात्र येथें उत्पादन करितां येईल. पण त्याकरितां येथील नद्यांचे पाण्याचा उपयोग करून घ्यावा लागेल, व तसें करावयाचें म्हणजे नद्यांवर लहानमोठीं धरणें बांधावीं लागतील. त्याकरितां जरूर असणारें लोखंड परदेशांतून आयात करावें लागेल व सिमेंटचें उत्पादन वाढवावें लागेल. या सर्व गोष्टी करावयाच्या म्हणजे मुख्य गोष्ट आहे पैसा. "सर्वारंभास्तण्डुलाः प्रस्थमूलाः ।" तो पैसा कोठून आणावयाचा ?

**७. भांडवल**—या बाबतींत प्रथमच हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, आपला देश दरिद्रीच आहे. परदेशांतून कच्चा माल आणावयाचा किंवा यंत्रसामग्री

आणावयाची म्हणजे त्यामोबदला तेवढ्याच किंमतीचा माल किंवा सोनें परदेशीं पाठविलें पाहिजे. आपल्या देशांत सोन्याचा सांठा किंवा उत्पादन फार मोठ्या प्रमाणांत नाहीं, कीं ज्यायोगें परदेशी आयातीची किंमत भागवितां येईल. याचा अर्थ आयातीच्या मोबदल्यांत मालाची निर्यातच करावी लागेल. तेव्हां या बाबतींत निश्चित व सकृद्दर्शनीं कडक वाटणारें धोरण सतत कांहीं वर्षें सरकारनें ठेवलें पाहिजे. आपल्या कारखान्यांस जरूर असणारा कच्चा माल व यंत्रसामग्री, शेतीस लागणारीं अवजारें, लोकपोषणास जरूर तें अन्नधान्य, येथें तयार होत नसतील अशीं जरूर तीं औषधें, सार्वजनिक वाहतुकीस जरूर अशीं रेल्वे इंजिनें व डबे, मोटारगाड्या, विमानें व दारूगोळा एवढ्यापुरतीच आयात मर्यादित केली पाहिजे. कोणत्याहि परिस्थितींत खाजगी व्यक्तींस लागणाऱ्या मोटारगाड्या, कापड व इतर चैनीच्या, निमचैनीच्या किंवा आवश्यक अशा सदरांत न मोडणाऱ्या इतर वस्तु आयात न केल्या पाहिजेत. अशा निर्बंधानें थोडासा असंतोष माजेल, कांहीं लोकांची तात्पुरती गैरसोय होईल, पण याचा मोठा राष्ट्रीय फायदा म्हणजे, निर्यात मालापासून मिळणारा सर्व पैसा राष्ट्रीय उत्पन्नांत भर घालणाऱ्या कायम स्वरूपाच्या भांडवली योजनांस लागणारी यंत्रसामग्री व कच्चा माल आणण्याकडे करितां येईल. अति-आवश्यक नसलेल्या परदेशी वस्तूंवर खर्च होणाऱ्या खाजगी पैशाचा ओघ बँकांकडे किंवा कर-रूपानें सरकारी तिजोरीकडे वळेल. अशा रीतीनें सरकारास भांडवली योजनांस लागणारा जादा पैसा उभारतां येईल. एकदां लोकांना कळून चुकलें कीं, सरकार राष्ट्रीय उत्पादन वाढविण्याकरितांच आयातीवर निर्बंध किंवा जादा कर लादतें आहे, तर लोकांचा प्रथम प्रथम अज्ञानानें होणारा विरोधहि हळूहळू मावळेल व सरकारचें आश्वासन प्रत्यक्ष कृतींत उतरण्यासारख्या कांहीं गोष्टी दिसल्या कीं, लोकहि उत्साहानें सरकारला पाठिंबा देतील. रशियांत कम्युनिस्ट राजवट प्रथम सुरू झाल्यावर त्यांना जरूर असलेलें लोणीहि परदेशीं पाठवून लोकांनीं जरूर त्या यंत्रसामग्रीकरितां पैसा उभारला. मुख्य गोष्ट आहे लोकांची मनोभूमिका तयार करण्याची व अशी भूमिका तयार झाल्यावर सरकारनें दिलेलीं आश्वासनें प्रत्यक्षांत उतरविण्याची.

**८. आळशी प्रवृत्तीवर उपाय**—वर चर्चिल्याप्रमाणें उद्योगधंद्यांच्या वाढीबरोबर बेकारीस आळा बसेल यांत संशय नाहींच. पण याचा परिणाम

कदाचित् लोकच स्वतः होऊन कामावर न येण्याचा संभव आहे. समजा, एखाद्या कुटुंबांत पांच माणसें काम करूं शकणारीं आहेत पण त्यांच्या प्राथमिक गरजा चार माणसांच्या मिळकतीवरच भागण्यासारख्या आहेत. अशा स्थितींत पांचांपैकीं एक माणूस नेहमीं कामावर हजर राहणार नाहीं. यामुळें जर सरकारला मनुष्यशक्तीचा तुटवडा भासला नाहीं तर प्रश्नच नाहीं. पण तसा जर भासूं लागला तर सरकारनें हुकूमशाही राजवटीप्रमाणें वेठीनें मजूर ( Conscription of labours ) कामावर न्यावेत कीं काय असा प्रश्न उपस्थित होतो. असें केलें तर मग लोकशाही व हुकूमशाहींत फरक काय राहिला ? लोकशाही सरकार करपद्धतींत थोडासा बदल करून ह्या प्रश्नास तोंड देऊं शकेल. प्राप्तिकराची मर्यादा खालीं आणून व विक्रीकराची व्याप्ति वाढवून लोकांजवळ जादा खेळत असलेला पैसा सरकार आपल्याकडे खेंचूं शकेल व अशा रीतीनें लोकांच्या आळशी प्रवृत्तीस मारून उद्योगी प्रवृत्तीस उत्तेजन देऊं शकेल. उपभोग्य वस्तूहि ( Consumer goods ) आयातीच्या कडक निर्बंधामुळें व अति-आवश्यक नसलेल्या वस्तूंच्या उत्पादनावरहि घातलेल्या नियंत्रणामुळें, हव्या तेवढ्या प्रमाणांत मिळत नसल्यानें, राष्ट्रीय चलनवृद्धीहि ( Inflation ) होऊं शकणार नाहीं. लोकांच्या हातांत खेळत असलेला जादा पैसा करूपानें सरकार आपल्याकडेच खेंचणार, तेव्हां लोकांच्या हातांत जादा पैसा असल्यानें, वस्तूंच्या किंमती वाढतील अशीहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं. एवढें मात्र खरें कीं, जरूर तें अन्नधान्य व कापड सरकारनें नियंत्रित किंमतीत वांटलें पाहिजे.

**९. राष्ट्रीय विनियोग व कर्जांची वाढ यांचा बेकारी-निवारणाशीं संबंध**—ही झाली मागासलेल्या देशांतील बेकारी-निवारणाची रीत. पण औद्योगिकदृष्ट्या प्रगतींत उच्चांक गांठलेल्या देशांतदेखील, मंदीच्या काळांत सर्वच व्यापारी व्यवहारांवर अनिष्ट परिणाम होत असल्यानें, उद्योगधंद्यांतील उत्पादन कमी होऊन, बेकारी वाढते. भांडवलशाही राष्ट्रांत युद्धासारखी आपत्ति न आली तर दर नऊ वर्षांनीं आर्थिक मंदी येईल असें अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. तेव्हां अशी मंदी येऊं नये म्हणून युद्धासारखी आपत्ति स्वखुषीनें दर ८-१० वर्षांनीं ओढवून घ्यावयाची कीं काय ? युद्धकाळांत बेकारी जरी नष्ट होत

असली तरी, एकंदरींत मानवी जीवन फार हलाखीचें होतें, त्यामुळें बेकारी निवारण्याची ही रीत योग्य असें कोणीच म्हणूं शकत नाहीं.

पैसेवाल्या लोकांजवळ उपभोग्य वस्तूंचा भरपूर पुरवठा झाल्यानें, ते अशा मालाची आपली खरेदी कमी करितात, व त्यामुळें मागणीपुरवठ्याच्या न्यायानें पुरवठ्यापेक्षां मागणी कमी झाल्यानें पुरवठा कमी करावा लागतो व त्यामुळें उत्पादन घटतें. यावरून हें दिसून येईल कीं, बेकार व कमी प्राप्तीच्या लोकांजवळ जर पैशाचा पुरवठा वाढला तर त्यांची मागणी वाढेल व त्यामुळें उत्पादन घटविण्याची जरूरी पडणार नाहीं. वरील गटांजवळील पैशाचा पुरवठा वाढवावयाचा तर त्यांना कामधंदा दिला पाहिजे. मंदीच्या काळांत खाजगी भांडवलवाले नवीन धंदे काढण्यास किंवा आहेत ते पूर्णपणें चालविण्यास धजत नाहींत. याचा अर्थ सरकारनेंच या बाबतींत पुढाकार घेतला पाहिजे. अशा काळांत बँकेचा व्याजाचा दर कमी करून व आपले कर्जरोखे मध्यवर्ती बँकेस विकत घेण्याची सूचना करून, नाणेंबाजारांतील पैशाचा पुरवठा सरकार वाढवूं शकेल. याबरोबरच सरकारनें सार्वजनिक कामें सुरू करण्याचें व लोकोपयोगी नवीन धंदे काढण्याचें धोरण स्वीकारलें पाहिजे. यायोगें लोकांत योग्य वातावरण निर्माण होईल व त्याबरोबर बेकारी हटून मंदीची झळ शक्य तितकी कमी बसून, व्यापारी चक्राची गति ( Trade cycle ) पुन्हां तेजीकडे झुकूं शकेल. तात्पर्य, औद्योगिकदृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रांत जेव्हां बेकारी जाणवूं लागते, तेव्हां याचा अर्थ राष्ट्रांतील लोक एक तर आपला खर्च कमी करून जादा शिल्लक ठेवूं लागले आहेत किंवा लोकांजवळचा एकंदर पैसा कमी झाला आहे असा होतो. याकरितां लोकांनीं खर्च कमी केला तर त्या प्रमाणांत सरकारनें आपला वाढविला पाहिजे. हा जादा खर्च भागविण्याकरितां कर वाढविणें, चलनवाढ करणें व कर्ज काढणें या तिन्हींचा उपयोग करावा लागतो. फाजील चलनवाढ झाली आहे असें दिसून आल्यास व ती कमी केल्यास बेकारीवर परिणाम होणार नाहीं असें दिसत असल्यास सरकारनें आपली गंगाजळी वाढवून व कर्ज परत करून, आपल्या कर्ज काढण्याच्या धोरणानें झालेली चलनवाढ कमी केली पाहिजे.

**१०. मोसमी बेकारी**—अशा तऱ्हेच्या बेकारीशिवाय दुसरी एक मोसमी बेकारी ( Seasonal unemployment ) असते. शेतीसारख्या धंद्यांत

हिंदुस्थानांत साधारणपणें जुलै-ऑगस्ट व पुन्हां नोव्हेंबर-डिसेंबर, असे चार महिने शेतीवरील मजुरांस काम नसतें. अशा बेकारीस तोंड देण्याकरितां लहान लहान घरगुती धंद्यांची वाढ प्रत्येक खेडोपाड्यांत झाली पाहिजे. मोठमोठया उद्योगधंद्यांत लागणारे छोटे छोटे विभाग तयार करून घेतले तर खेडुतांना तो एक चांगला किफायतशीर धंदा होईल. बेकारीनिवारणाबरोबर ग्रामोद्धारासहि मदत होईल. या बाबतींतहि पुन्हां सरकारनेंच पुढाकार घेतला पाहिजे. हिंदमध्यें तरी अद्याप ग्रामीण उद्योगधंद्यांच्या वाढीबाबत भांडवलदारांस औत्सुक्य नसल्यानें, सरकारनेंच या क्षेत्रांत लक्ष घालून त्यास चालना दिली पाहिजे.

या सर्व उपाययोजनेनंतरहि थोडीबहुत बेकारी निरनिराळ्या क्षेत्रांत राहण्याची शक्यता आहे. त्याकरितां बेकारी-विमानिधीची ( Unemployment Insurance Fund ) प्रत्येक उद्योगधंद्यांत सोय करावी लागेल.

अशा रीतीनें बेकारी समूळ नाहींशी करितां येईल. भरपूर उद्योगधंदे वाढविल्यावरहि जर बेकारी समूळ नाहींशी झाली नाहीं, तर कम्युनिस्ट समाज-रचनेंत ठरविल्याप्रमाणें असलेल्यां कामाची वांटणी शारीरिकदृष्ट्या योग्य असलेल्या लोकांत करतां येईल व त्यांना त्या प्रमाणांत दाम देतां येईल. बाकीच्या लोकांकरितां म्हातारपणाबद्दल किंवा अशक्तपणाबद्दल तनखा सरकार देईल. हिंदुस्थानपुरताच विचार करावयाचा झाल्यास भरपूर उत्पादन होऊन असा काळ येण्यास बराच कालावधि लागेल. तेव्हां आतांच या प्रश्नाचा गंभीरपणें विचार करण्याची जरूरी नाहीं.



## प्रकरण १८ वें

# आर्थिक नियोजन

**१. आर्थिक नियोजन**—१९१७त रशियामध्यें झालेल्या राज्यक्रांतीनंतर तेथें जी नवीन कम्युनिस्ट राजवट प्रस्थापित झाली तिनें १९२३मध्यें राष्ट्राच्या आर्थिक विकासाची एक पंचवार्षिक योजना आंखून ती धडाडीनें पूर्णपणें यशस्वी केली. त्यांत मिळालेल्या अपूर्व यशानें उत्साहित होऊन त्या सरकारनें दुसरी तत्सम योजना १९२८ मध्यें आंखून तीहि तितक्याच जोमानें १९३३ मध्यें पूर्णतेस नेली. ज्या राजवटीविषयीं इतर जगांतील पुढारलेलीं राष्ट्रें उघड उघड तिरस्कार दाखवीत, त्याच राजवटीनें एवढया अल्पावधींत एका मागासलेल्या राष्ट्राचा नेत्रदीपक असा आर्थिक विकास केलेला पाहून तीं थक्क झालीं. तशांतच १९३२ सालीं सर्व जगभर पसरलेल्या आर्थिक मंदीनें तर सर्वच भांडवलवादी राष्ट्रांचे डोळे खाडकन् उघडले. त्या मंदीची झळ रशियास लागूं शकली नाहीं, पण इंग्लंड–अमेरिकेसारख्या अतिसमर्थ व संपन्न अशा राष्ट्रांस ती लागलेली पाहून राष्ट्राच्या आर्थिक विकासांत सरकार उदास राहूं शकत नाहीं, अशी सर्वांची खात्री पटली. तेव्हांपासून ‘ योजनाबद्ध आर्थिक–विकास ’ हा एक सर्व अर्थशास्त्रज्ञांचा अति आवडीचा विषय बनला. तथापि दुसरें महायुद्ध उजाडेपावेतों किरकोळ डागडुजीशिवाय, कोणत्याच सरकारनें आर्थिक क्षेत्रांत नियोजन करण्याकडे विशेष लक्ष घातलें नाहीं.

**२. नियोजन व समाजवाद**—असें नियोजन म्हटलें कीं, तें भांडवलवादी असावें कीं समाजवादी असावें असा एक मुद्दा नेहमीं उपस्थित करण्यांत येतो. परंतु थोडा विचार केला असतां तो भ्रममूलक आहे हें दिसून येईल. ‘ योजनाबद्ध आर्थिक–विकास ’ असा जेव्हां शब्दप्रयोग केला जातो तेव्हां असा विकास सरकारनें करावा असाच अर्थ अभिप्रेत असतो. भांडवलदार, समजा, पूर्वनियोजित कार्यक्रमानें त्यांच्या उद्योगधंद्याची वाढ करीत असतील किंवा

करणार असतील तर तो कार्यक्रम प्रायः त्यांना त्यांनीं घातलेल्या भांडवलावर किती टक्के व्याज सुटेल किंवा नफा किती प्रमाणांत अधिक होईल या उद्देशानेंच आंखलेला असतो. राष्ट्राचा सर्वांगीण आर्थिक विकास कसा होईल ही बुद्धि त्यांत नसते. अर्थात् त्यांच्या प्रयत्नानें झालेल्या धंद्याच्या वाढीमुळें राष्ट्राचा कांहीं फायदा होणार नाहीं असें नव्हे. पण त्यांचा प्रधान हेतु स्वतःचा आर्थिक फायदा हा असतो, व राष्ट्राचा फायदा हाहि हेतु त्यांच्या मनांत असलाच तर तो दुय्यम असतो यांत दुमत असण्याचें कारण नाहीं. बरें, सरकारनें यांत लक्ष घालण्यापूर्वीं भांडवलदार आपापल्या कुवतीप्रमाणें अशा तऱ्हेचें नियोजन करीत असतच. तेव्हां सरकारनें राष्ट्राचा आर्थिक विकास स्पष्ट योजना आंखून करावा, असा जेव्हां भांडवलवादी राष्ट्रांतहि सूर निघूं येतो, तेव्हां त्यास समाजवादाची छटा असते असें म्हणण्यास हरकत नाहीं. राष्ट्राच्या आर्थिक क्षेत्रांत सरकारनें म्हणजे समाजाच्या प्रातिनिधिभूत संस्थेनें क्रमाक्रमानें पदार्पण करून, सर्व समाजाचें जीवनमान वाढवावें व सर्वांनाच जीवन सुसह्य होईल अशी परिस्थिति निर्माण करावी, असें जेव्हां म्हटलें जातें: तेव्हा उत्क्रांतिवादानें भांडवलवादी समाजव्यवस्थेकडून समाजवादी व्यवस्थेकडे जावें, असाच त्याचा अर्थ असतो. मग म्हणणाराची प्रत्यक्षांत तशी इच्छा असो वा नसो. याउलट आर्थिक नियोजनाचा हेतु निरनिराळ्या भांडवलदारांची संघटना स्थापून त्यांच्या आपआपसांतील स्पर्धेमुळें त्यांच्या नफ्यावर होणारें आक्रमण थांबवावें, मग असें करतांना सामान्य जनांच्या सुखसोयींची किंवा गरजांची कदर बाळगण्याचें कारण नाहीं, असाच असेल तर तो शुद्ध राक्षसी हेतु होय. ह्याच हेतूनें जर्मनींत फॅसिझम उदयास आला. असा हेतु उराशीं बाळगून नियोजन करण्याचा कोणी विचार करील तर तो फॅसिस्टच, व जर्मनीस त्यायोगें जो अनन्वित त्रास सोसावा लागला तोच अशा राष्ट्रांच्या कपाळीं असणार यांत संदेह नाहीं. पण जगांतील सत्प्रवृत्ति अशा असत्प्रवृत्तींचा योग्य बंदोबस्त करील असा भरंवसा वाटतो.

**३. नियोजन म्हणजे काय?**—प्रथमच योजनाबद्ध आर्थिक विकास म्हणजे काय याची आपणांस पूर्ण कल्पना पाहिजे. नाहींतर विवेचन पायाशुद्ध राहणार नाहीं. सरकारनें राष्ट्रांतील सारी खनिजसंपत्ति, शेती व उद्योगधंदे यांचा योग्य समन्वय साधून, त्यांचें उत्पादन ठराविक मुदतींत व ठराविक प्रमाणांत वाढवून

त्या उत्पादनाचा उपयोग त्या राष्ट्रांतील सर्व लोकांच्या जास्तींत जास्त सुखाकरितां करावयाचा. एवढा मोठा कार्यक्रम पांच वर्षांच्या मुदतींत पूर्ण करतां आला नाहीं, तर त्या कार्यक्रमापैकीं कांहीं भाग प्रथम, नंतर आणखी कांहीं भाग व शेवटीं राहिलेला सर्व अशा रीतीनें सर्व कार्यक्रम १५ ते २० वर्षांत पुरा करतां येईल. याचा अर्थ १५–२० वर्षांनंतर आर्थिक नियोजनाची गरज संपून पुन्हां पाहिलें असंघटित, परस्परविरोधी व राष्ट्रहितप्रधान नसलेलें व्यक्तिनिष्ठ ( laissez-faire ) नियोजन सुरू करावयाचें असा मात्र नव्हे. २० वर्षांच्या कालावधीनंतर राष्ट्रापुढें आणखी कांहीं निराळ्या आर्थिक समस्या निर्माण होतील, त्या योजनाबद्ध नियोजनानेंच सोडवाव्या लागतील. कांहीं नवीन प्रश्न जरी उपस्थित झाले नाहींत तरी लोकांचें जीवनमान वाढविणें हा कधींहि न सुटणारा असा प्रश्न असल्यानें आर्थिक नियोजनाची गरज नाहीं असा दिवस उजाडणेंच शक्य नाहीं. अशा तऱ्हेचें नियोजन कोणी व कसें करावें याचा विचार करण्यापूर्वी नियोजनानें व्यक्तिस्वातंत्र्यावर घाला येतो असा एक आक्षेप घेतला जातो त्याचा परामर्श घेणें जरूर आहे. या आक्षेपवाद्यांचें म्हणणें असें कीं, ज्या गोष्टींत सरकार हस्तक्षेप करतें, त्यांत सत्तेचा अंश आलाच, मग त्याबरोबरच व्यक्तिस्वातंत्र्याचाहि खून झालाच. पण हा अगदींच संकुचित दृष्टिकोन झाला. समाजांत राहाणें म्हणजेच सामाजिक स्थैर्याच्या दृष्टीनें जरूर तीं बंधनें पाळणें हें होय. जो तीं बंधनें पाळणार नाहीं, त्याला शासन करणें हें समाजाचें कर्तव्यच ठरतें. समाज शासन करतो म्हणजे समाजाची प्रतिनिधिभूत जी शासनसंस्था–सरकार–ती शासन करते. तेव्हां एकंदर समाजाच्या हिताकरितां जर सरकारनें एखादी गोष्ट करण्याचें ठरविलें तर 'व्यक्तिस्वातंत्र्य,' 'व्यक्तिस्वातंत्र्य' म्हणून टाहो फोडण्यांत अर्थ नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे. याच आक्षेपाचा पर्याय म्हणून नियोजनानें मनुष्याची नफा मिळविण्याकरितां धडपड करण्याची नैसर्गिक प्रवृत्ति मारली जाते, असें म्हटलें जातें. पण असा आक्षेप घेण्यांत मनुष्याच्या, लोकांकडून भलें म्हणून घ्यावें, एखादें काम परिपूर्ण करून दाखवावें, हातांत सत्ता असावी किंवा निरपेक्ष बुद्धीनें समाजसेवा करावी, अशा दुसऱ्या कांहीं सहजप्रवृत्तींकडे दुर्लक्ष केलें जातें. बरें, नियोजनांत व्यक्तिसुख वाढावें व त्यास आर्थिक स्थैर्य लाभावें हाच तर प्रमुख हेतु असतो. अशा तऱ्हेचा

अनिर्बंध व्यक्तिस्वातंत्र्यवादाचा उदोउदो करणाऱ्या भांडवलदारांस आपल्या पैशाच्या जोरावर सामान्य जनतेस कोंडींत पकडून, त्यांना शोषण करण्याचें अप्रतिहत स्वातंत्र्य हवें असतें, ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. तेव्हां या आक्षेपांतहि कांहीं अर्थ आहे असें मानण्याचें कारण नाहीं.

४. तें कोणीं करावें?—राष्ट्रांतील सर्व संपत्तीचा पुरेपूर उपयोग करावयाचा म्हणजे हा कार्यक्रम अंमलांत आणण्यास मध्यवर्ती सरकारांशिवाय इतर कुणीहि समर्थ नाहीं हें ओघानें प्राप्त झालेंच. हिंदसारख्या खंडप्राय देशांत तरी हें अटळच आहे. येथें अनेक घटकराज्यें, अठरापगड जाति, अनेक भाषा व त्या सर्वांत एकराष्ट्रीयत्वाची भावना नुकतीच कोठें मूळ धरूं लागलेली, त्यामुळें संघराज्याच्या प्रत्येक घटकावयवाकडे जर ज्या त्या भागांतील आर्थिक विकास सोपवून दिला तर प्रत्येकजण स्वतःच्या संकुचित स्वार्थाकडे दृष्टि ठेवून कार्यक्रम आंखूं लागेल. यायोगें एका देशव्यापी कार्यक्रमानें थोडक्या खर्चांत जें कार्य व्हावयाचें त्यास निष्कारण सर्व राष्ट्राची पृथक् पृथक् शक्ति खर्ची पडावयाची. तशांतच निरनिराळ्या प्रांतांतून वाहणाऱ्या नद्यांच्या पाण्याचा उपयोग, मोठमोठे रस्ते, ( National Highways ) हें काम कांहीं एका घटकाचें नव्हे. मध्यवर्ती सत्तेनेंच सर्व घटकांच्या गरजांचा आढावा घेऊन, एकंदर राष्ट्राचें जास्तींत जास्त सुख, थोड्यांत थोड्या परिश्रमानें कसें साधेल याचा विचार करून हा आर्थिक विकासाचा कार्यक्रम आंखला पाहिजे. असें झालें तरच आर्थिक नियोजनाचा, कमींत कमी खर्चांत पुरेपूर उत्पादन, व त्याचें सर्व नागरिकांत योग्य वांटप व या दोन्हींच्या समन्वयानें राष्ट्राचें आर्थिक स्थैर्य वाढविणें, हा जो प्रधान हेतु तो साधेल, एरवीं नाहीं.

आर्थिक नियोजनच करावयाचें झाल्यास जागतिक सरकार स्थापन करून त्याकरवीं सर्व जगाची साधनसंपत्ति सर्व जगांतील लोकांच्या सुखाकरितां वापरावी. एरवीं एका राष्ट्रांतील प्रांतांनीं किंवा घटकांनीं वेगवेगळें नियोजन केल्यानें सबंध राष्ट्राचे जे तोटे होतात, नेमके तेच जागतिक सरकारनें असें नियोजन करण्याऐवजीं, एखाद्या राष्ट्रानें केल्यानें होतात हें खरें आहे. पण जागतिक सरकार स्थापून त्यामार्फत सर्व जगांत शांतता, सुव्यवस्था व आर्थिक स्थैर्य स्थापावें, ही कल्पना अद्याप तरी विचारवंतांच्या कल्पनासृष्टीला अत्यानंद

देणारी घटना ठरली आहे. ती जेव्हां प्रत्यक्ष व्यवहारांत अवतरेल तो सोन्याचा दिवस यांत संदेह नाहीं. पण गांवांतील सर्व घरें मला ठाकठीक करतां येत नाहींत, कारण तशी मला सत्ताहि नाहीं व तशीं साधनेंहि माझ्या हातीं नाहींत, म्हणून मींहि माझें घर साफसूफ करूं नये म्हणणें हा व्यवहारी मार्ग नव्हे.

५. **त्यास लागणारी यंत्रणा**—मध्यवर्ती सत्तेनें राष्ट्राचा सर्वांगीण आर्थिक-विकास योजनाबद्ध करावयाचा असें निश्चित झाल्यावर योजना आंखणारें, त्या अंमलांत आणणारें व त्याकरतां जरूर त्या पैशांची तरतूद करणारें, अशीं तीन वेगवेगळीं खातीं त्या सरकारच्या दिमतीस दिलीं पाहिजेत. नियोजन-समिति ( Planning Commission ) राष्ट्राच्या प्राप्त परिस्थितींत जरूर तें उत्पादन वाढविण्याकरतां व त्याचें योग्य वांटप करण्याकारितां काय योजना आंखल्या पाहिजेत हें ठरवून त्या आंखून 'प्राधान्येन व्यपदेशः' या न्यायानें त्या अंमलांत आणण्याचा क्रम ठरवून त्या सरकारच्या नियोजनखात्याकडे ( Planning Ministry ) पाठवील. तें खातें त्यांचा सर्व बाजूंनीं विचार करून, त्या योजना अंमलांत आणण्यास लागणाऱ्या पैशांची तरतूद अर्थ-नियोजन मंडळाकडून ( Planning Finance Corporation ) करून घेऊन सरकारची ( Cabinet approval ) त्यास संमति मिळाल्यावर त्या प्रत्यक्षांत उतरविण्याचा कार्यक्रम हातीं घेईल व त्या पूर्णत्वास नेईल. हा व्यवहार करतांना राष्ट्राच्या शक्तीचा व पैशाचा अपव्यय होणार नाहीं याची दक्षता घेण्याकरतां प्रत्यक्ष राष्ट्राध्यक्षांच्या ( President of the Union ) हुकमतीखालीं तपासणीमंडळ (Directorate of Planning Inspection) नेमण्याचीहि अत्यंत जरूरी आहे. या मध्यवर्ती संघटना निर्माण केल्यानंतर नियोजन–खातें राष्ट्राच्या आर्थिक विकासाच्या ज्या योजना मान्य करील, त्या प्रत्यक्ष अंमलांत आणण्याकरितां आपल्या नियंत्रणाखालीं जरूर ती प्रादेशिक किंवा विशिष्ट योजना–विषयक स्वतंत्र मंडळें ( Public Corporations ) स्थापन करील. उदाहरणार्थ, निरनिराळ्या राज्यांतील रस्तेवाढीच्या योजना अंमलांत आणण्याचें ठरलें तर, प्रत्येक राज्यांत एक रस्तेवाढमंडळ ( Road Corporation ) नेमलें जाईल; पण तेंच दामोदर नदीवरील धरण–योजना किंवा तुंगभद्रा नदीवरील धरणयोजना असेल तर, स्वतंत्र दामोदर नियंत्रण–मंडळ ( D. V. A. ) किंवा

तुंगभद्रा नियंत्रणमंडळ अशासारख्या मंडळ्या स्थापन केल्या जातील. लहान लहान एकाच स्वरूपाच्या योजना एका स्वतंत्र मंडळामार्फत पार पाडल्या जातील. जनतेच्या सर्वांगीण उन्नतीकरितां बद्धपरिकर झालेलें कोणतेंहि सरकार राष्ट्राच्या आर्थिक विकासाच्या योग्य योजना आंखून वरील यंत्रणांकरवीं त्या प्रत्यक्षांत उतरवील. आतांपर्यंत कविकल्पनेंतच हिंद ही सुजला सुफला व सस्यश्यामला भूमि राहिली आहे. आर्थिक नियोजनानें ती कविकल्पना साकार होईल, ह्यांत रशियानें अशा उपायानें मिळविलेल्या अपूर्व यशानें संदेह वाटत नाहीं. अर्थात् सरकारनें योग्य योजना आंखल्या पाहिजेत, त्या जनतेस समजावून सांगून, त्यांच्यांत त्याबाबत योग्य तो उत्साह निर्माण केला पाहिजे. राजकीय स्वातंत्र्य मिळविण्याकरितां नाहीं का असंख्य लोकांनीं अनन्वित हाल सोसले ? मग तेच आर्थिक स्थैर्य मिळविण्याकरितां कां नाहीं आनंदानें सोसणार ?

**६. निरनिराळ्या योजनांतील प्राधान्य-निर्णय**—ह्या प्रकरणांत आपण ठिकठिकाणीं ' योग्य ' योजना आंखली पाहिजे असें म्हटलें आहे. अशा योजना आंखतांना कोणत्या योजनेस प्राधान्य दिलें पाहिजे व ती कशी अंमलांत आणली पाहिजे हें आतां पाहूं.

**( अ ) अन्नधान्याच्या उत्पादनास अग्रस्थान-पडीक जमिनी लागवडीस आणणें**—हिंदुस्थानच्या प्राप्त परिस्थितींत अन्नधान्य उत्पादनाच्या प्रश्नास प्राधान्य दिलें पाहिजे. यांत दुमत असण्याचें कारण नाहीं. देशाच्या फाळणीनंतर तर ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली आहे. सन १९५१–५२ या सालची गरज भागविण्यास कमींतकमी ४० लाख टन अन्नधान्यें परदेशांहून आयात करावीं लागलीं आहेत. याचा अर्थ दरवर्षी सरकारास २२५ कोटी रुपयांची परदेशी हुंडणावळ अन्नधान्याकरितांच खर्च करावी लागत आहे. एवढी मोठी रक्कम या कामीं खर्ची पाडल्यावर आपण आपल्या उद्योगधंद्यावाढीच्या योजना पार पाडण्याकरितां जरूर ती यंत्रसामग्री कशानें आणणार ? आपला देश कृषिप्रधान. अशा देशानेंच जर अन्नासारख्या अति आवश्यक वस्तूंच्या बाबतींत परदेशावर अवलंबून राहावयाचें, तर मग दुसऱ्या वस्तू आयात करणार कशा ? मग राहाणीचें मान वाढवायचें कसें ! तशांतच राजकारण, लढाई अशा कांहीं कारणांनीं अन्नधान्य जर नाहीं आयात करतां आलें तर लोक भुकेनें तडफडून

भरावयाचे. आपल्या देशांत अन्नधान्याचें उत्पादन वाढवावयाचें झाल्यास तें आहे त्या शेतजमिनीस भरपूर पाणी मिळण्याची सोय करून व लागवडीखालीं नसलेल्या जमिनी लागवडीखालीं आणून अशा दोन उपायांनीं करतां येईल. देशांत पाणी व जमीन दोन्ही विपुल असल्यानें हे दोन्ही उपाय अंमलांत आणणें फारसें जड नाहीं.

हिंदमध्यें अद्याप १७·२ कोट एकर जमीन लागवडीखालीं आणण्यासारखी आहे.

**( आ ) पाणीपुरवठा वाढविणें**—जमिनीस पाणी उपलब्ध करून देण्याकरितां, नद्यांवर धरणें बांधून त्यांपासून कालवे काढले पाहिजेत. धरणें बांधतांना, थोडया खर्चात जास्त पाणी अडवतां येईल व त्या पाण्याचा उपयोग कमदार जमीन भिजविण्याकडे होईल; तसेंच एखादी अवखळ नदी आपल्या तऱ्हेवाईक वागणुकीनें आपल्या तीरावरील लोकांस पावसाळ्यांत चंडिकेचें रूप धारण करून त्रास देत असेल तर तीस लगाम घालतां येईल व जमल्यास वीज-उत्पादन करतां येईल. या चार बाबी लक्षांत घ्याव्या लागतात. बिहारमधील कोसी धरणयोजना आंखण्यांत या चारहि गोष्टी लक्षांत घेतल्या गेल्या आहेत. मोठ्या योजना फार खर्चाच्या व दीर्घ कालानें फळ देणाऱ्या असतात. त्याकरितां लहान लहान योजनाहि हातीं घेऊन कांहीं ठराविक क्षेत्रास पाणी पुरवून जादा उत्पन्न काढण्याचा यत्न करणें इष्ट असतें. आपल्या देशांत नद्या पुष्कळ, व त्या वर्षातून बऱ्याच मोठ्या पाण्याचा सांठा समुद्राकडे वाहून नेतात. त्यांना ठिकठिकाणीं बंधारे घालून, त्या पाण्याचा उपयोग अधिक धान्य पिकविण्याकडे केला, तर तें मोठ्या योजनेस पूरकच ठरेल. आपल्याकडे प्रत्येक राज्यसरकार वर्षास जवळ जवळ १ कोट रुपये 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेच्या प्रचारावर खर्च करतें. तें अजिबात बंद करून त्या पैशाचा विनियोग लहान लहान बंधारे बांधण्याकडे केला तर ही प्रत्यक्ष कृति जनतेच्या मनांत पोकळ प्रचारापेक्षां जास्त भरेल, व सध्यां जो सरकारच्या कर्तबगारीविषयीं व कार्यक्षमतेबद्दल सर्वत्र अविश्वास व्यक्त केला जातो, त्याचें रूपांतर अशा भरीव कामगिरीनें हार्दिक सहकार्यांत होईल.

नवीन जमीन लागवडीस आणण्याकरितां प्रत्येक राज्यसरकारनें स्वतंत्र खातेंच उघडलें पाहिजे. त्या खात्यानें जिल्हानिहाय पहाणी करून ट्रॅक्टरच्या

साहाय्यानें नांगरून व ३-४ वर्षे स्वतः कसून, नंतर ती शेतकऱ्यांस विकून टाकावी. याबरोबरच या खात्यानें शेतकऱ्यांस कृषिविषयक सल्ला द्यावा व आधुनिक औतें पुरवावींत.

(इ) **विशिष्ट पिकें व प्रदेश यांची सांगड घालणें**—या दोन्ही प्रश्नांस हात घातल्यानंतर सरकारनें कोठल्या जमिनींतून कोणतीं पिकें काढावयाचीं, हेंहि निश्चित केलें पाहिजे. अन्नधान्याबरोबरच कापूस, ताग, ऊंस, चहा व गळितांचीं धान्यें यांचें उत्पादन देशांतील इतर गरजा भागविण्याकरितां वाढविलेंच पाहिजे. बंगाल, बिहार येथें ताग; आसाम–निलगिरी येथें चहा; गुजराथ, मराठवाडा, कर्नाटक येथें कापूस; महाराष्ट्र, उत्तरप्रदेश येथें ऊंस; तेलंगण, कर्नाटक येथें शेंगदाणा अशीं निरनिराळ्या पिकांचीं निरनिराळीं क्षेत्रें ठरवून टाकलीं पाहिजेत. बंगाल–बिहारमध्यें तागाची निर्मिति आवश्यक झाल्यावर तेथील बुडालेल्या तांदळाचें उत्पादन कोंकण, मद्रासमध्यें जादा पिकवून भरून काढलें पाहिजे. उत्तर प्रदेशामध्यें साखरेचे पुष्कळ कारखाने आहेत. पण तेथें ऊंस खाजगी शेतकरी अपुऱ्या साधनांनीं पिकवीत असल्यानें त्याचें उत्पादन एकरीं १२ टन पडतें, तेंच महाराष्ट्रांतील कारखानदार सरासरी ४० टनांपर्यंत काढूं शकतात. खाजगी बागाईतदार तर तें ५६ टनांपर्यंत नेतात. याकरितां सहकारी पद्धतीवर आधुनिक साधनसामग्रीनें एक तर त्याचें उत्तरप्रदेशांतील उत्पादन वाढवावें किंवा तेथें ऊंसाचें उत्पादन बंद करून तें महाराष्ट्रांत वाढवावें, व तिकडे गव्हाचें उत्पादन वाढवावें. एकरीं गव्हाच्या पिकास १२ टन ऊंसापेक्षां कमी भाव येत असल्यास सरकारनें ज्या शेतकऱ्याचा ऊंस पिकविण्याचा धंदा बसविला असेल त्यास दोन्हींमधला बदला मदत (Subsidy) म्हणून द्यावा.

(ई) **जमीनदार व कुळें यांचे संबंध**—कसणाऱ्या शेतकऱ्याला त्या शेतीविषयीं आस्था वाटली पाहिजे. आपल्या मेहनतीनें व अक्कलहुशारीनें आपण जें उत्पादन काढूं, त्याचा सरकारी करभार दिल्यानंतर, आपण स्वतः उपभोग घेऊं शकूं, अशी त्यास खात्री वाटली पाहिजे. याकरितां बंगाल–बिहारसारखे पूर्ण जमीनदार किंवा कुळामार्फत कसणारे रयतवारी पद्धतींतील बशे जमीनदार (absentee landlords) या दोघांचाहि मालकीहक्क त्यास साऱ्याच्या कांहीं पट रक्कम देऊन नष्ट करावा लागेल. तसे कायदे आतां उत्तर

प्रदेश, बंगाल, बिहार, मद्रास आदि राज्यांत झाले आहेत. तीं सरकारें या कायद्याची अंमलबजावणीहि करूं लागलीं आहेत. ही रक्कम कशी द्यावयाची हा एक प्रथमदर्शनीं मोठा कठीण प्रश्न दिसतो. पण या लोकांस नुकसानभरपाई-दाखल अशी रक्कम कां द्यावी याचा थोडासा विचार केल्यास यांत कांहींच काठिण्य नाहीं हें सहज दिसून येईल. या लोकांच्या जीवनमानांत एकदम फरक पडूं नये, आज ज्यांना पिढ्यान्‌पिढया व वर्षानुवर्षें कांहीं ठराविक रक्कम मिळत आली त्यांना लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं उद्यांची भ्रांत पडूं नये, कांहीं दिवस तरी बदललेल्या परिस्थितीशीं समरस होऊन मिळकतीचीं नवीन साधनें शोधण्यास अवसर मिळावा, या माणुसकीच्या भूमिकेवरूनच त्यांना कांहींतरी रक्कम देणें इष्ट आहे, असें आपण ठरवितों. त्यांनीं कांहीं समाजसेवा केली म्हणून त्यांना कांहीं मानवेतन द्यावें अशी कांहीं यापाठीमागील भूमिका नाहीं. असें जर आहे तर कायद्यानें जमिनी कुळांच्या मालकीच्या करून त्या कुळांवर ते जो खंड जमीनदारांना देत, तोच पहिलीं १० वर्षें सरकारला देण्याचें बंधन घालावें, व सरकारनें तो जसाच्या तसा जमीनदारांना द्यावा. यायोगें जमीनदारांना नवीन उत्पन्नाचे मार्ग शोधण्यास दहा वर्षांचा अवधि मिळेल व कुळांना १० वर्षांनीं जमीन कांहींहि जादा खर्च न करतां आपल्या मालकीची होईल अशी खात्री येईल. फारतर एखाद्या जमीनदारास वर्षास रु.२००००चे वर मिळकत असेल तर त्यास या रकमेपेक्षां जादा रक्कम मिळूं नये व कुळांकडून आलेला जादा पैसा शेतीसुधारणाफंडांत जमा करावा व त्याचा विनियोग शेतीचें उत्पादन वाढविण्यांकडे व्हावा असें बंधन घालावें. या मार्गानें कोणालाहि फारसा त्रास न होतां मोठमोठया तज्ज्ञांचा मेंदू शिणविणारा हा प्रश्न चुटकीसरसा सुटेल.

याच पद्धतीनें आर्थिकदृष्ट्या न परवडणारे जमिनींचे लहान लहान तुकडे एकत्र करावेत. शेतकऱ्यांस सामुदायिकरीत्या शेती कसण्यापेक्षां सहकारी पद्धतीनें शेती कसण्याचें उत्तेजन द्यावें. यामुळें मानवी मनांतील मालकीहक्काच्या भावनेस धक्का पोहोंचणार नाहीं, व ‘ दसकी लकडी एकका बोजा ’ या न्यायानें शेती सौकर्यानें व किफायतशीर पद्धतीनें कसतां येईल.

**( उ ) आदर्श शेतें**—याचबरोबर आपल्या शेतकऱ्यांस पारंपरिक व मध्ययुगीन शेती कसण्याच्या कल्पनेपासून परावृत्त करून त्यांना आधुनिक

सुधारणांचा पुरेपूर फायदा मिळावा, या हेतूनें दर ४–५ खेड्यांत एक आदर्श शेत ( Model farm ) एका कृषितज्ज्ञाच्या देखरेखीखालीं कमी खर्चांत जास्त उत्पादन कसें काढतां येणें शक्य आहे, याचें प्रात्यक्षिक दाखविण्याकरितां चालवावें. शेतीबरोबरच आपल्या इतर गरजा भागविण्याकरितां उद्योगधंद्यांची वाढ करण्याची योजनाहि आंखली पाहिजे. त्याचें सविस्तर विवेचन पुढील प्रकरणांत करण्याचें योजिलें आहे. उद्योगधंदे व मजूर दोन्ही परस्परावलंबी असल्यानें, पहिल्याबरोबरच दुसऱ्याचा विचार करणें क्रमप्राप्तच आहे.

७. **शैक्षणिक प्रगति**—कोणतेंहि नियोजन यशस्वी व्हावयाचें म्हणजे त्यास लोकांचें पूर्ण सहकार्य पाहिजे. तें योग्य प्रचारानें मिळवितां येईल; पण त्याकरितां लोकांची शैक्षणिक पातळीहि उंचावली पाहिजे. याचा अर्थ देशाच्या नियोजनामध्यें लोकांच्या शैक्षणिक प्रगतीस प्रमुख स्थान दिलें पाहिजे. कोणत्याहि देशाचा सामान्यतः सुजाण नागरिक होण्यास प्रत्येकास आपली मायबोली व राष्ट्रभाषा चांगल्या रीतीनें लिहितां वाचतां आली पाहिजे. त्याबरोबरच गणिताचें सामान्य ज्ञान व देशाचा इतिहास व भूगोल हेहि माहीत असले पाहिजेत. आधुनिक जगांत राहावयाचें म्हणजे त्यांतील निरनिराळ्या राजकीय विभागांतील लोकांची सामाजिक व आर्थिक राहाणी, शास्त्रीय व यांत्रिक प्रगति, यांचीहि सर्वसाधारण माहिती प्रत्येकास असणें अवश्य आहे. हें सारें शिक्षण देतांना निव्वळ पुस्तकी ज्ञानावर भर देण्यापेक्षां व्यवहारी ज्ञानावर व कोणतेंहि काम स्वतः करण्याची आवड विद्यार्थ्यांत उत्पन्न करण्यावर भर दिला पाहिजे. याचा अर्थ सध्यां आपल्याकडे जी बेसिक शिक्षणपद्धति अंमलांत आणण्यांत आली आहे, ती मला मान्य आहे, असा नव्हे. प्रत्यक्ष एखाद्या धंद्याचें शिक्षण प्रत्येकास अवश्य आहे, असें मुळींच नाहीं. बरें, सध्यां जें सुतारकाम, विणकाम अशा तऱ्हेचें शिक्षण दिलें जातें त्यांतून मुलांना कांहीं ज्ञान मिळतें किंवा यांतून पुढें त्यांना तज्ज्ञ सुतार वा विणकरी निर्माण करावयाचे आहेत, अशांतलाहि भाग नाहीं. मूळ उद्देश मुलांत प्रत्यक्ष काम करण्याची आवड निर्माण करण्याचा असला पाहिजे. सुताराचा कारखाना, कापडगिरण्या व निरनिराळे कारखाने मुलांना दाखविल्यानें आधुनिक यंत्रयुगाची सामान्य कल्पना त्यांना येण्यास हरकत नाहीं. काम करण्याची आवड या दृष्टीनें मुलांना स्वतःच्या शाळेंतील बाग तयार करणें,

मैदान स्वच्छ ठेवणें, खेडेगांवांतील किंवा शहरांतील छोटे रस्ते तयार करणें, सहलीवर जाऊन तेथील स्वयंपाक व तदनुषंगिक स्वतांचीं इतर कामें स्वतः करणें, अशांसारख्या कार्यक्रमाचा शिक्षणांत अंतर्भाव करणें आवश्यक आहे. सध्यां जो प्राथमिक व दुय्यम मिळून ११ वर्षांचा शिक्षणक्रम आहे त्यांत मुलांना मराठी, हिंदी, संस्कृत, इंग्रजी इतक्या भाषांचा अभ्यास करावा लागतो. याशिवाय इतिहास, भूगोल, गणित, शास्त्र, ड्रॉइंग व बेसिक शिक्षण एवढया प्रचंड विषयांचें लेंढार मुलांच्या पाठीमागें असल्यानें, " एक ना धड भाराभर चिंध्या " या लोकोक्तीप्रमाणें या ११ वर्षांच्या शेवटीं मुलगा कांहीं पोपटपंची करण्याशिवाय कसल्याहि कामास लायक ठरत नाहीं. संस्कृत व इंग्रजी या दोन जादा भाषांचा या शिक्षणक्रमांत वास्तविक अंतर्भाव करण्याची जरूरी नाहीं. ३–४ वर्षांच्या अभ्यासानें या विषयांत बोलण्यास किंवा लिहिण्यास मुळींच जमत नाहीं. निव्वळ भावनाविषयक बाबींवर या दोन भाषा आपल्या मुलांवर लादल्या गेल्या आहेत. जीं मुलें विशेष तल्लख असतील किंवा ज्यांची तशी इच्छा असेल, अशा मुलांच्या सोयीकरतां ७ व्या इयत्तेपासून या दोन भाषा ऐच्छिक ठेवाव्यात, व बेसिकच्याऐवजीं वर सुचविल्याप्रमाणें प्रत्यक्ष शारीरिक कष्टांच्या कामाचा तीन महिन्यांतून एक आठवडा ठेवावा.

अशा शिक्षणक्रमामुळें सर्वच मुलांवर भाषाविषयक अभ्यासाचा फाजील ताण पडणार नाहीं. सामान्य मुलें, मराठी व हिंदी या दोन भाषा चांगल्या तऱ्हेनें जाणूं शकतील व शारीरिक श्रमाच्या आठवड्यांत सहकार्यानें काम करण्याची व प्रत्यक्ष कष्टाचीं कामें करण्याची संवय त्यांच्या अंगीं बाणूं शकेल.

**८. आरोग्य**—शिक्षणानंतर नागरिकांचें आरोग्य वाढविणें हेंहि एक नियोजनाचें महत्त्वाचें अंग आहे. आरोग्यसंपन्न नागरिक नसतील तर सबंध देशाची प्रकृतीच रोगी बनेल व मग कोणतेंच काम धडाडीनें होणार नाहीं. ' खायला काळ व धरणीला भार ' या न्यायानें धरणीची योग्य सेवा न झाल्यानें तीहि आहे त्या लोकसंख्येचा भार सहन करूं शकणार नाहीं. मग वाढत्या लोकसंख्येची गोष्ट दूरच राहिली. याकरितां कांहीं खेड्यांच्या समूहांतून दवाखाने, इस्पितळें व प्रत्येक खेड्याचा पाणीपुरवठा यांकडे लक्ष द्यावें लागेल. तसेंच प्रत्येक

खेडुतास आपलें घर व अंगण व घराभोंवतील जागा स्वच्छ ठेवण्याचें महत्त्व पटवावें लागेल व वेळप्रसंगीं सक्तीचाहि अवलंब करावा लागेल.

**९. लोकसंख्या**—दिवसानुदिवस लोकसंख्यावाढीचा प्रश्न मात्र उग्ररूप धारण करूं लागला आहे. हिंदुस्थानांतील सध्यां आहे या लोकांस भरपूर अन्न व वस्त्र मिळणें फार कठीण झालें आहे. आर्थिक नियोजनानें या परिस्थितींत थोडा-बहुत फरक पडूं शकेल, पण जेथें वर्षास ५० लाख या प्रमाणांत लोकसंख्या वाढत आहे, तेथें कोणतेंहि नियोजन केव्हांना केव्हां तरी अपुरेंच पडेल. तेव्हां याबाबतींत संततिनियमनाचा प्रचार सतत चालू ठेवणें अवश्य आहे.

**१०. पैसा**—एवढें सारें नियोजन करावयाचें म्हणजे त्यास पैसाहि अफाट लागणार, तो कोठून आणणार ?

**( अ ) चलनवाढ**—प्रथमच कांहीं गोष्टी लक्षांत ठेवल्या पाहिजेत. अगदीं चिकित्सक दृष्टीनें पहावयाचें झाल्यास पैसा म्हणजे काय ? पैसा म्हणजे माणसाचे दोन हात व राष्ट्राची साधनसामग्री—खनिज संपत्ति, शेती, नद्या वगैरे. या दोन गोष्टींची जोड योग्य रीतीनें घालूं शकलों तर मग भाग्याला काय उणें ! ती जोड कशी घालवावयाची ? ही जोड घालण्याकरितां प्रत्येक व्यक्तीला परिमाणस्वरूप जी बिदागी द्यावयाची तेंच चलन म्हणजेच प्रत्यक्ष पैसा. देशांतील लोक जेव्हां बेकार असतात तेव्हांदेखील ते निदान एका वेळेला तरी जेवतात. अर्धवट तरी वस्त्र नेसतातच कीं नाहीं ? म्हणजे राष्ट्रांतील उत्पादनाचा कांहीं अंश ते उपभोगितातच. फरक एवढाच कीं, जे कामधंदा करतात, ते कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें परत राष्ट्राच्या उत्पादनांत भर घालतात. जे बेकार असतात ते फुकट खातात. बेकारांना फुकट खावयाचें असतें अशांतला भाग नाहीं, पण त्यांना नाइलाजानें तसें करावें लागतें. मग फुकट बसण्यापेक्षां सरकारनें त्यांनाहि कोयना-व्हॅली-सारख्या योजनांत गुंतवावें. प्रश्न उपस्थित होतो तो हा कीं, त्यांना प्रत्यक्ष पैसा—चलन—कोठून द्यावयाचा ? मी म्हणेन कीं, जोंपर्यंत शक्य आहे तोंपर्यंत नोटा न छापतां द्यावा, व तें अशक्य झालें कीं, जादा नोटा छापून द्यावा. जादा नोटा छापणें म्हणजे चलनवाढ आलीच; महागाई वाढलीच व मग दारिद्र्य त्याबरोबर 'आ' वांसून पाठीमागें लागलेलेंच, अशीं समीकरणें अर्थशास्त्रज्ञ ताबडतोब मांडतात व आपल्या समर्थनार्थ पहिल्या महायुद्धोत्तर जर्मनी व

कम्युनिस्ट राजवटीपूर्वीचा चीन, यांचीं उदाहरणें आपल्यापुढें फेंकतात. पण याबाबत ते मूळ विसरतात कीं, त्या दोन देशांत चलनवाढ कोणत्या कारणांकरितां केली, तर लढाईसारख्या अनुत्पादक बाबींचा खर्च चालविण्याकरितां. पण आपण कशाकरितां करणार आहोंत, तर देशाचें उत्पादन वाढविण्याकरितां. येथें जी चलनवाढ होईल ती वेळ येतांच कमी करण्याची व अत्यावश्यक अशा म्हणजे कमींतकमी अन्न व वस्त्र या दोन वस्तूंच्या किंमतींत वाढ न होऊं देण्याची खबरदारी घेतली म्हणजे झालें. अन्न व वस्त्र या बाबतींत सरकारास उत्पादन व वांटप मक्तेदारी पद्धतीनें करावें लागेल. सध्यांहि या धोरणाचा सरकार अवलंब करीत आहे, त्याची व्याप्ति वाढविली म्हणजे झालें. चलनवाढीनें कांहीं थोडया लोकांच्या हातांत जादा पैसा येणें शक्य आहे. तो जादा पैसा सरकारनें करवाढीनें आपल्या तिजोरींत खेंचला पाहिजे. म्हणजे हे लोक चोरूनमारून परदेशांतून माल आणणें किंवा येथील कांहीं वस्तूंच्या किंमती वाढविणें अशासारखे प्रकार करूं शकणार नाहींत. खालच्या वर्गाच्या हातांत जादा पैसा खेळूं लागेल तर तो विक्रीकराचा दर वाढवून किंवा त्याची व्याप्ति वाढवून सरकार कमी करूं शकेल.

अर्थात् या साऱ्या गोष्टी करण्यास सरकारच्या मनाची खंबिरी पाहिजे. निव्वळ भांडवलदारांच्या हातांत हें अस्त्र श्रीमंताना अधिक श्रीमंत व गरिबांना अधिक गरीब करील. त्याकरितां पूर्ण समाजवादी नसलें तरी सहकारी पद्धतीनें समाजहित प्रस्थापित ( Co-operative Common-wealth ) करण्याचें कंकण हातीं बांधलेलें तरी सरकार अधिकारारूढ अवश्य हवें. नाहींतर कुंपणानेंच शेत खाल्ल्यावर जाब तरी कोणास विचारावयाचा ? अशी स्थिति जर आली तर मग मात्र हिंसात्मक क्रांतीनें राजवट बदलणारांचे हात बळकट होतील.

**( आ ) गंगाजळी, आयातनिर्बंध, देशी परदेशी कर्जें व करवाढ-** यानंतर जी यंत्रसामग्री व दुसरा अत्यावश्यक माल या नियोजनाकरितां परदेशांतून आणावा लागेल, त्यास पैसा देण्याची तजवीज करावी लागेल. याकरितां आपणांस इंग्लंडमधील ८०० कोटींची गंगाजळी आहे तिचा उपयोग करून घेतां येईल. दुसरा उपाय म्हणजे अनावश्यक गोष्टींची आयात अजिबात बंद करावयाची. व निर्यातीनें जी परदेशी हुंडणावळ आपणांस मिळेल, तिचा उपयोग फक्त राष्ट्राच्या उत्पादनांत भर घालणारी यंत्रसामग्री व इतर माल

आणण्याकडे करावयाचा. यायोगें कांहीं लोकांना मोटारी उडवावयास मिळणार नाहींत, कांहीं हौशी लोकांस परदेशी वूलन व रेशमी कापड व कंगवे मिळणार नाहींत. पण अशानें कांहीं ते जीवनांतून उठूं शकत नाहींत. जेथें लक्षावधि लोकांवर अन्नपाण्यावांचून तडफडण्याचा नित्य प्रसंग येतो, तेथें वरील थोडया लक्ष्मीपुत्रांना ५।१० वर्षें कळ सोसावी लागली तर त्यांत वावगें तें काय? यानंतरचा तिसरा उपाय म्हणजे अमेरिकेसारख्या राष्ट्राकडून कर्जाऊ माल आणणें. सध्यांच्या आपल्या परराष्ट्रीय धोरणाचा तिकडे विपर्यास केला जात असल्यानें, तिकडून ज्या प्रमाणांत आपणांस मदत मिळणें शक्य आहे तितकी मिळत नाहीं, हें खरें, पण त्याबरोबर अमेरिकेंत हिंदुस्तानला मदत न करणें म्हणजे कम्युनिस्ट मनोवृत्तींना हिंदमध्यें वाव देणें अशी जाणीव होऊं लागली आहे. आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्यास बाध न येईल अशा रीतीनें गोड बोलून त्या मनोवृत्तीचा आपणांस फायदा घेतां येईल.

वरील उपायांबरोबरच आपणांस देशांत कर्जें उभारतां येतील व राजेरजवाडे यांचेवर प्राप्तीवरील कर लादून इतर करवाढ करून व सर्वत्र वारसाकर यासारखे कर लादूनहि अधिक पैसा जमा करतां येईल.

११. **नियोजन व हुकुमशाही यांचें नातें**—नियोजनांत पुष्कळ नियंत्रणें येत असल्यामुळें सरकार हुकुमशाही बनत जाईल, अशा तऱ्हेचा आरोप येणें शक्य आहे. पण जोंपर्यंत लोकशाहीचीं जीं मानचिन्हें 'भाषण–स्वातंत्र्य' व 'संघटना–स्वातंत्र्य' (Freedom of speech and association) हीं शाबूत आहेत, तोंपर्यंत कांहीं मतलबी लोकांच्या वरील ओरडीकडे लक्ष देण्यांत अर्थ नाहीं. मात्र सरकार व जनता या दोघांनींहि या बाबतींत जागरूक राहिलें पाहिजे. विशेषतः सरकारवर अशा स्थितींत फार जबाबदारी येते. आपण एखादी गोष्ट लोकांचें सभास्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य या दोन्हींस मारक अशी करीत नाहीं ना, असा प्रश्न सतत कोणतीहि गोष्ट करतांना त्यानें स्वतःस विचारला पाहिजे. याचा अर्थ असा प्रश्न विचारून आपल्या कार्यक्षमतेंत कमीपणा आणावयाचा असा मात्र नव्हे. निवडणुकांच्या वेळींच लोकांपुढें नियोजनाची कल्पना मांडून, त्यांची संमति घेतल्यावर व वरील दोन मानचिन्हें शाबूत ठेवल्यावर मग इतर सटरफटर गोष्टींची कदर बाळगण्याची जरूरी नाहीं.

# प्रकरण १९ वें

# उद्योगधंदे

माणूस निव्वळ शेतीवर जगूं शकत नाहीं; त्याला आपल्या दोन्ही हातांचा उपयोग करावाच लागतो. शेतींतून कापूस निघेल तो पिंजून, सूत काढून, त्याचे पासून कापड तयार केलें पाहिजे; ताग निघेल त्यापासून, गोणपाट तयार केलें पाहिजे; शेंगदाणा निघेल त्यापासून तेल, साबण तयार केलीं पाहिजेत. जमिनींतून लोखंड निघेल त्यापासून खिळे, सळई, पट्या तयार केल्या पाहिजेत. अशा रीतीनें शेती व उद्योगधंद्याची पार्वतीपरमेश्वरासारखी अविभाज्य जोडी आहे. आधुनिक काळांत तर यंत्रांचा शोध लागल्यापासून उद्योगधंद्यांचें पूर्वीचें घरगुती स्वरूप जाऊन तें एक वडें शास्त्रच झालें आहे. शेतीच्या नियोजनाचा विचार केल्यावर, उद्योगधंद्यांच्या नियोजनाचा विचार क्रमप्राप्तच ठरतो. शेती व यांत्रिक उद्योगधंदे, हे दोन्ही धंदे एकमेकांस पूरक असल्यानें दोन्हींच्या वाढीकडे जुळ्या भावंडांप्रमाणें लक्ष पुरविणें अत्यावश्यक आहे.

**१. मौलिक वा उपभोग्य वस्तु निर्माण करणाऱ्या धंद्यास प्राधान्य?**—हा विचार करतांना प्रथमच हा प्रश्न उत्पन्न होतो कीं, ज्या उद्योगधंद्यांपासून उपभोग्य वस्तु निर्माण करण्याचे कारखाने चालूं शकतील अशीं यंत्रें, रसायनें व वीज उत्पन्न करण्याचे उद्योगधंदे प्रथम सुरू करावयाचे, कीं जनतेच्या दैनंदिन गरजा भागविणारे उपभोग्य वस्तू निर्माण करण्याचे उद्योगधंदे सुरू करावयाचे? याबाबत असा एक युक्तिवाद करण्यांत येतो कीं, एर्वीतेवीं दोन्ही प्रकारच्या धंद्यांस लागणारी यंत्रसामग्री परदेशांतूनच आणावयाची तर ती मौलिक (Basic or Production goods industries) धंद्यास लागणारी आणण्यापेक्षां लोकांच्या ऐहिक सुखांत ताबडतोब भर घालणारी दुय्यम तऱ्हेची आणावी. त्यायोगें लोकांना आधुनिक सुखोपभोगांचीं साधनें उपलब्ध होतील व जीवन सुसह्य होईल. जीवन सुखावह करण्याकरितांच तर हा सारा खटाटोप करावयाचा

हें खर, पण मौलिक धंदे सुरू केल्यानें हा प्रश्न कायमचा सुटेल ही बाब दृष्टीआड करून चालणार नाहीं. प्रथम कांहीं दिवस आहे ह्या परिस्थितींत दिवस काढावे लागतील. ' चणे खावे लोखंडाचे तैं ब्रह्मपदीं नाचे ' या न्यायानें जी सुधारणा आपण स्वतः खपून करूं शकूं ती केव्हांहि चिरस्थायी ठरूं शकेल. तशांतच जगाचा सध्यांचा राजकीय नूर पहातां, युद्धासारखी आपत्ति केव्हां येऊन कोसळेल याचा नेम नाहीं, मग दुय्यम यंत्रसामग्री आयातहि करतां येणार नाहीं. ' तेल गेलें, तूप गेलें व हातीं धुपाटणें आलें,' अशांतली गत व्हावयाची. मौलिक गोष्टींबाबत परदेशांवर सतत अवलंबून राहणें बरें नव्हे. म्हणून तेच धंदे सुरू करणें इष्ट आहे. यांत खाजगी भांडवलदारांच्या हातीं असे उद्योगधंदे राहिल्यानें जर्मनींतील फॅसिस्टांसारखी हुकुमशाही येण्याचा धोका असतो. पण हिंदुस्थानांत दारूगोळा व इतर शस्त्रास्त्रें यांचे कारखाने सरकारी मालकीचेच आहेत, व दुसरें जे रसायनें, वीज व विमानें वगैरेंचे कारखाने काढावयाचे ते एक तर सरकारी मालकीखालीं काढावेत किंवा त्यांवर सरकारचें पूर्ण नियंत्रण असावें, म्हणजे मग अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

**२. मौलिक धंद्यांत जळण व प्रेरकशक्ति निर्माण करणाऱ्या धंद्यास प्राधान्य**—मौलिक धंद्यांतदेखील जळण व प्रेरकशक्ति ( Fuel & Power ) निर्माण करणाऱ्या धंद्यास प्राधान्य दिलें पाहिजे. आपल्या देशांत कोळशाचा भरपूर पुरवठा नाहीं, पण सर्व देशांत मोठमोठे डोंगर इतस्ततः विखुरलेले असल्यानें व त्यांवर भरपूर पाऊस पडत असल्यानें त्या पाण्याचा उपयोग वीज निर्माण करण्याकडे करितां येईल. इंग्लंडसारख्या विपुल कोळसा असणाऱ्या देशांतदेखील, आगगाड्या, ट्राम व बरेचसे धंदे विजेवर चालविले जातात. आपल्याकडेदेखील आगगाड्या व बरेचसे धंदे वीज-उत्पादन वाढल्यास विजेवर चालवितां येणें शक्य आहे. असें केल्यानें खाणींतून निघणारा कोळसा, पाकिस्तान, जपान वगैरेंसारख्या देशांत निर्यात करून, त्यांचेकडून आपणांस हवा असणारा कच्चा माल ( कापूस, ताग ) व लहान लहान धंद्यांस उपयुक्त असणारी यंत्रसामग्री जपानमधून आणतां येईल. आपल्या देशांत डोंगरावर धों धों शेंदोनशें उंच पाऊस पडतो, व तें सर्व पाणी नद्यावाटे थेट समुद्रास जाऊन मिळतें. एवढ्या नैसर्गिक संपत्तीचा आपण कांहींच उपयोग करून घेत

नाहीं. या नद्यांस ठिकठिकाणीं बंधारे घालून, पाणी अडवितां येईल व त्यापासून भरपूर वीज निर्माण होऊं शकेल. विजेबरोबर बंधाऱ्याच्या पाण्याचा शेतीसहि उपयोग करितां येईल. हे धंदे अर्थातच सर्व दृष्टींनीं सोईस्कर अशा भागांत म्हणजे पश्चिमघाट, पूर्वघाट, विंध्याद्रीलगतचा कांहीं भाग व हिमालयाच्या आसमंतांतील भागांत काढतां येतील. पण त्यांतल्या त्यांत मुंबई-राज्यांत हे प्रथम काढणें जास्त फायदेशीर; कारण संबंध हिंदुस्थानांतील उद्योग-धंद्यांचें जें माहेरघर मुंबई, तेथें विजेची जरूरी जास्त आहे.

**३. रसायनें, दारूगोळा आदि धंदे यांचा क्रम**—यानंतर रसायनें, ॲटमिक एनर्जी निर्माण करणारे कारखाने व संशोधनाच्या प्रयोगशाळा यांस स्थान द्यावें लागेल. त्याबरोबरच शास्त्रीय संशोधनासहि वाव द्यावा लागेल. अर्थातच शास्त्रीय संशोधनाचा भांडवलदारांस त्यांच्या वैयक्तिक स्वार्थाकरितां उपयोग होऊं नये म्हणून तें पूर्णपणें सरकारी नियंत्रणाखालीं चाललें पाहिजे व त्यांतील शोधांचाहि सामान्य जनतेस उपयोग होईल, ही नजर ठेवून सरकारनें स्वतः किंवा स्वतःच्या नियंत्रणाखालीं हे धंदे काढावे लागतील.

शस्त्रास्त्रें व दारूगोळा यांच्या कारखान्यास देशाचे संरक्षणाचे दृष्टीनें फार महत्त्व आहे. याकरितां वीज व जळण यांच्या उत्पादनाच्या धंद्यांपेक्षांहि, या धंद्यास प्राधान्य दिलें पाहिजे हें खरें, पण याबाबत आपण इतके मागासलेले आहोंत कीं, त्याबाबत प्रगति करण्यास फार कालावधि लागेल व पैसाहि अतोनात लागेल. बरें, त्यास सुरवात जरी ताबडतोब केली, तरी ते सारे श्रम अनुत्पादक धंद्यांत खर्च झाल्यानें, देशाच्या सांपत्तिक स्थितींत भर पडणार नाहीं. तेव्हां तूर्त तरी कांहीं वर्षे, आपण सध्यां जसे परदेशांवर याबाबत अवलंबून राहतों तसें राहावें, व नवीन मौलिक धंदे काढण्यासच प्राधान्य द्यावें. यायोगें देशाच्या आर्थिक स्थितींत इष्ट असा फरक होईल, व मग शस्त्रास्त्रांचे नवीन कारखाने काढणें सोपें जाईल.

यानंतर लोखंड व पोलाद, यांचें उत्पादन वाढविणाऱ्या उद्योगधंद्यांस ओघानेंच स्थान प्राप्त होतें. वीज व जळण, शस्त्रास्त्रें आणि दारूगोळा, यांच्या उत्पादनाचे कारखाने पूर्णतया सरकारी मालकीचे असणेंच इष्ट आहे. ज्यांवर बाकी सारे उद्योगधंदे अवलंबून, असे मूलोद्योग सरकारच्या खास मालकीचे

असतील तरच खाजगी भांडवलदार त्यांचा उपयोग राष्ट्राच्या आर्थिक व राजकीय क्षेत्रांत परिणामकारक वर्चस्व स्थापण्याकडे करूं शकणार नाहींत. पण लोखंड व पोलाद यांचे कारखाने सरकारी नियंत्रणाखालीं काढण्यास खाजगी भांडवलदारांस उत्तेजन द्यावें. सरकार जे मौलिक धंदे स्वतः काढणार, त्याकरितां लागणारा पैसा गेल्या प्रकरणांत दर्शविल्याप्रमाणें, चलनवाढ, देशी-विदेशी कर्जें, कर व परदेशांतील गंगाजळी या मार्गांनीं जमा करूं शकेल. मग खाजगी भांडवलदार नवीन उद्योगधंद्यांस लागणारा पैसा कोठून आणणार? याकरितां दोन उपायांचा प्रथम अवलंब करावा लागेल. पहिला म्हणजे हल्लीं जे खाजगी उद्योगधंदे आहेत, त्यांच्या वाढीस किंवा जुने नवे करण्यास जो पैसा लागेल, तो त्या धंद्यांच्या नफ्यांतूनच यावा; त्याकरितां बाहेरून पैसा घालूं नये, असा दंडक त्यांचे बाबतींत करावा. त्याबरोबरच ५ टक्क्यांपेक्षां डिव्हिडंड वांटूं नये व यापेक्षांहि कमी नफा वांटल्यास, व तो त्या धंद्यांतच पुन्हां घातल्यास, अशा न वांटलेल्या नफ्यावर कार्पोरेशनकर माफ करावा. यायोगें आहे त्या धंद्यास लागणाऱ्या भांडवलाचा प्रश्न सुटूं शकेल. मग लोकांजवळील नवीन भांडवल नवीन धंदे काढण्यास, उपयोगी पडूं शकेल. सरकारहि आपल्या 'औद्योगिक भांडवल समिति'मार्फत नवीन धंद्यास भांडवल पुरवील. समजा, अशा सर्व उपायांनींदेखील भांडवल मिळत नाहीं असें दिसून आलें, तर परदेशी भांडवलदारांस आपल्या येथील भांडवलदारांच्या सहकार्यानें असे धंदे काढण्यास उत्तेजन द्यावें. तेंहि न जमेल तर सरकारनें स्वतःच असे धंदे काढण्याचा प्रयत्न करावा. भांडवलदार भांडवल पुढें न येऊं देण्याचा प्रयत्न करीत आहेत असें दिसून आलें, तर खाजगी उद्योगधंदे काढावयाचेच नाहींत, असा फतवा काढणेंहि इष्टच ठरेल. अर्थात् हा शेवटचा उपाय झाला. आडवाआडवीचा प्रकार दिसून आला तरच ह्या चौदाव्या रत्नाचा उपयोग करावा एरवीं नाहीं.

४. **वाहातुकीचीं साधनें**—यानंतर मौलिक धंद्यांत मोडणारे असे दुसरे धंदे म्हणजे वाहातुकीचीं साधनें, यांकडे लक्ष द्यावें लागेल. सध्यां रेल्वे सर्वच्या सर्व राष्ट्रीय मालकीच्या आहेत. त्यांतूनच भांडवल उभें करून जादा रेल्वेमार्ग काढावे लागतील. बस-वाहातुकहि बऱ्याच प्रांतिक सरकारांनीं आपल्या हातीं घेतली आहे, त्यांतूनच रस्तेदुरुस्ती, नवीन रस्त्यांची वाढ, आहेत ते रस्ते कॉंक्रिटचे

करणें अशासारख्या गोष्टींकडे लक्ष द्यावें लागेल. बोटी व विमानांच्या बाबतींत, लोखंड व पोलाद यांच्याबाबत जो मार्ग आक्रमावयाचा तोच आक्रमावा लागेल.

असा हा मौलिक धंद्यांबाबत कार्यक्रम ठरवावा लागेल. याचा अर्थ एक झाल्यावर दुसऱ्यास हात घालावयाचा, तोंपर्यंत नाहीं, असा मात्र नव्हे. हा क्रम झाला. एकाच्या सुरुवातीबरोबर दुसराहि घेतला तरी चालेल, पण पहिला न घेतां दुसरा घ्यावयाचा नाहीं, एवढी दक्षता घेतली म्हणजे झालें.

अशा कार्यक्रमानें उपभोग्यवस्तु पहिलीं पांच वर्षे सध्यांच्या प्रमाणांतच मिळूं शकतील. किंबहुना मोटारगाड्या, सौंदर्यप्रसाधनें यांसारख्या वस्तूंच्या आयातीवर कडक नियंत्रण घातल्यानें कमीहि मिळूं लागतील. पण एवढा जरूरीचा काळ सोडला तर नंतर मात्र त्या साऱ्या आपल्या देशांतच तयार होणार असल्यानें, पुढील वारशाच्या भरंवशावर थोडें खडतर वाटणारें जीवनहि सुसह्य होऊं शकेल.

सध्यां अस्तित्वांत असलेल्या उपभोग्य वस्तूत्पादकधंद्यांच्या वाढीकडे मौलिक धंद्यांच्या पहिल्या पंचवार्षिक कार्यक्रमानंतर लक्ष देणें शक्य होईल. तोंपर्यंत याबाबत सरकारी धोरण काय असावें, हें वर लोखंड व पोलाद या धंद्यांच्या वाढीबाबत विवेचन करतांना दिग्दर्शित केलें आहेच.

**५. मजुरांचा प्रश्न**—उद्योगधंद्यांशीं मजुरांचा प्रश्न अगदीं संलग्न आहे. मजुरांना शोषून आपण गलेलठ्ठ व्हावयाचें, हा भांडवलदारांच्या दृष्टीनें सुवर्णकाळ केव्हांच संपला आहे. आतां उद्योगधंद्यांतील मजुरांना संतुष्ट कसें ठेवावयाचें हा एक मोठा प्रश्न होऊन बसला आहे. मजूर संघटना ( Trade Unions ) हल्लीं फारच वाढलेल्या आहेत व त्यांना सरकारीहि संरक्षण असल्यानें, कोणताहि कारखानदार मजुरांच्या पगाराचा दर कमी करूं शकत नाहीं किंवा त्यांना काढूंहि शकत नाहीं. मजूर संघटित हरताळ पाडून कारखानदारांस जादा पगार देण्यासहि भाग पाडतात. सध्यां तर सर्वच उत्पादनास भरपूर स्वदेशी व विदेशी बाजारपेठ असल्यानें एखाद्या दिवशीं कारखाना बंद होणें म्हणजे हजारों रुपयांचें नुकसान, अशी स्थिति आहे. त्यामुळें कारखानदारवर्ग अगदीं पेंचांत सांपडतो. हे भांडवलदार अव्वाच्या सव्वा नफा मिळवितात. मजुरांना जेमतेम अन्न व वस्त्र मिळेल एवढाच पगार देतात व घाणेरड्या चाळींतून राहण्यास भाग पाडतात,

असा मजुरांचा दावा आहे. भांडवलदारांच्या मतें, त्यांना आजपावेतों जेवढा नफा मिळे तो मिळत नाहीं. त्यायोगें नवीन भांडवल जमा होत नाहीं, नवीन भांडवल नाहीं म्हणजे आहे त्या धंद्याची वाढ नाहीं, मग नवीन धंद्याची वाढ करणें दूरच राहिलें. अशा स्थितींत मजुरांना जादा पगार देणें त्यांना परवडत नाहीं. अशा परस्परविरोधी, रस्सीखेचींत राष्ट्राची प्रगति मात्र खुंटते. ज्याच्या त्याच्या दृष्टिकोनांतून ज्याची त्याची बाजू न्याय्य दिसते. तेव्हां या दोन दृष्टिकोनांतील अंतर कमी केलें तरच मार्ग सांपडेल एरवीं नाहीं.

**७. भांडवल म्हणजे काय?**—येथें प्रथमच मूलभूत मुद्दा असा उपस्थित होतो कीं, भांडवलदारांना त्यांच्या भांडवलावर नफा कां द्यावयाचा? ह्या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें म्हणजे भांडवल याचा अर्थ प्रथम समजून घेतला पाहिजे. प्रत्येक व्यक्तीजवळ नैसर्गिकच भांडवल असतें व तें म्हणजे त्याची बुद्धि व दोन हात. या भांडवलाची किंमत मोजण्याचें साधन म्हणून व्यवहारांत ‘पैसा’ या चिजेचा उपयोग केला जातो. आतां आपण जेव्हां जेव्हां भांडवल हा शब्द वापरतों, तेव्हां तेव्हां आपणांस वरील अर्थ अभिप्रेत नसतो. तर वरील भांडवलाचें जें व्यावहारिक स्वरूप-पैसा-त्याचा स्वतःच्या गरजा भागविण्याकरितां उपयोग केल्यावर, जो जादा पैसा आपल्या हातीं शिल्लक राहातो, त्यास आपण भांडवल म्हणतों. प्रत्येकाची बुद्धीची झेंप, काम करण्याची कुवत वेगवेगळी असते, त्यामुळें प्रत्येकाची मिळकतहि कमी-जास्त असते. प्रत्येकाच्या गरजाहि ज्याच्या त्याच्या कुटुंबांतील माणसांची संख्या, आवडी-निवडी व सामाजिक रचना यांवर अवलंबून असतात. मिळकतींतून गरजा वजा केल्यावर जी शिल्लक राहाते तें भांडवल. सामाजिक रचनेचा ह्या शिल्लक ठेवण्याच्या प्रवृत्तीवर फार परिणाम होतो. म्हातारपण, आजारीपण, किंवा लग्नकार्यासारख्या प्रसंगोपात्त खर्चाची तरतूद व आपल्या मुलांचें जीवन सुखी जावें म्हणून त्यांच्या-करितां ठेवावयाची शिल्लक, या बाबी मनुष्यास प्रसंगीं स्वतःच्या दैनंदिन गरजा कमी करूनहि जादा शिल्लक ठेवण्यास प्रवृत्त करितात. सरकारनें अशा बाबीं-बद्दलची जिम्मेदारी जर पत्करली तर मग कोणास शिल्लक ठेवण्याची गरज तरी राहाणार नाहीं किंवा कुवतीपेक्षां तो काम तरी कमी करूं लागेल. असा अनवस्था-प्रसंग येऊं नये म्हणून कोणतेंहि सरकार वरीलसारख्या शिल्लक ठेवण्याच्या

प्रवृत्तीस जोपासणाऱ्या गरजा थोडयाबहुत प्रमाणांत प्रत्येक व्यक्तीपुढें निर्माण करीलच करील. आतां अशी जी शिल्लक राहाते तो प्रत्येकजण आपल्या कुलुपबंद तिजोरींत ठेवील. पण त्याला जर अशी खात्री वाटली कीं, हा पैसा कुलुपबंद पेटींत ठेवण्याच्याऐवजीं दुसऱ्याला वापरावयास दिला तर त्याबद्दल तो कांहीं मोबदलाहि देईल व पैसाहि सुरक्षित राहील, तर तो पैसा दुसऱ्यास वापरावयास देण्याकरितां बाहेर काढील, एरवीं नाहीं. हा जो मोबदला त्यालाच आपण व्याज किंवा नफा म्हणतों.

८. **मजुरांची सौदाशक्ति व व्याजाचा दर**—हें व्याज किंवा नफा देण्याची गरज एकदां पटल्यावर तो किती घ्यावा याचा विचार क्रमप्राप्तच ठरतो. मजुरांच्या गरजूपणाचा फायदा घेऊन ती मजुरी अगदीं कमी ठेवणें, उत्पादित वस्तूंची जेवढी जास्त किंमत घेतां येईल ती घेणें व अशा रीतीनें गुंतविलेल्या भांडवलावर जादा नफा मिळविणें, हाच भांडवलदारांचा उद्देश असतो. तो न्याय्य अशा बाबींना इहलोकींच्या व्यवहारांत लुडबुड देणार नाहीं. भांडवलदारांना रोजच्या अन्नवस्त्राची ददात नसते. त्याउलट मजुरास दुपारची वेळ कशी निभावेल, ह्याची भ्रांत असते. याचाच अर्थ मजुराची सौदाशक्ति ( Bargaining Power ) भांडवलदाराच्या सौदाशक्तीच्या पासंगालाहि पुरणार नाहीं. अशा स्थितींत मजूरसंघटना व सरकारची सहानुभूति ह्या गोष्टी जर मजुरांच्या पाठीशीं नसत्या, तर मजुरांच्या स्थितींत एकोणिसाव्या शतकापासून आजपावेतों रतिभरहि फरक पडला नसता. यावरून नफा किंवा व्याजाचा दर यांवर नियंत्रणाची जरूरी आहे ही गोष्ट पटते. ह्याबाबत कोणताहि दर ठरविला तरी त्यास शास्त्रीय आधार देतां येणार नाहीं. दर ज्या त्या काळच्या लोकमतावर व सामाजिक परिस्थितीवरच अवलंबून ठेवावा लागतो. सध्यां सरकारी रोख्यांवर ३॥ ते ४ टक्के व्याज मिळतें. सरकारी रोख्यांपेक्षां खाजगी उद्योगधंद्यांत पैसा गुंतविणें हें जादा धोक्याचें असतें. उद्योगधंद्यांत जसा नफा होण्याची अपेक्षा असते, तसा तोटा होण्याचाहि धोका असतो. याकरितां अशा शेअर्सवर शें. ५ हा दर योग्य वाटतो. मात्र जे उद्योगधंदे बऱ्याच दिवसांपासून चालू आहेत व ज्यांत सहसा तोटा होण्याचा धोका नसतो अशा प्रस्थापित उद्योगधंद्यांच्या शेअर्सवरील नफ्याचा दर सरकारी कर्जरोख्यां-

इतकाच मर्यादित करणें योग्यच दिसतें. यायोगें कारखानदार आपले उद्योगधंदे पूर्वी ज्या दक्षतेनें चालवीत तसेच या नवीन नियमाखालीं चालवित नाहींत, असें दिसून आल्यास, ज्या प्रमाणांत मागील तीन वर्षांच्या सरासरपेक्षां नफा कमी झाला असेल त्या प्रमाणापेक्षां १½ पटीनें त्यांना देण्याच्या नफ्याचें प्रमाण दंड म्हणून कमी करावें. असा नियम केल्यास हा नफा मर्यादित करण्याच्या पद्धतीनेंहि धंद्याच्या कार्यक्षमतेवर परिणाम होण्याचा संभव नाहीं. याबाबत नियंत्रण ठेवण्याकरितां आपल्याकडे धंदे नियंत्रण मंडळ ( Board of Trade Control ) व त्याखालील यंत्रणा निर्माण करणें जरूरीचें आहे. जरूर त्या सूचना व शेवटीं ताकीद दिल्यानंतरहि जर धंदेवाल्यांनीं आपल्या वागणुकींत बदल केला नाहीं तर या मंडळानें असे धंदे आपण स्वतः चालवावेत. या मंडळाचे पदाधिकारी व इतर अधिकारीवर्ग निवडतांना वरील गोष्टीस जरूर तेव्हां लायक ठरतील अशा व्यक्ती निवडण्याची खबरदारी घ्यावी.

( अ ) **मजुरीचा दर**—या गोष्टी केल्यावर आतां मजुरीचा दर ठरविणें सोपें जाईल. अशा रीतीनें नफा किंवा व्याज दिल्यानंतर जो एकंदर नफा शिल्लक राहील त्यांतून त्या धंद्याचा घसारा फंड शेंकडा ५ टक्के किंवा ज्या धंद्यांत जो योग्य असेल तो दर व त्या धंद्याच्या वाढीस आवश्यक असलेला वाढफंड शेंकडा ५ टक्के, ह्या दोन बाबी बाजूला काढून ठेवल्या पाहिजेत. यानंतर जो नफा शिल्लक राहील, तो मजुरांत त्यांच्या मजुरीच्या प्रमाणांत न्याय्य ( equity ) रीतीनें वांटून घ्यावा. असें केल्यावर मजुरांनाहि कुरकुर करण्यास जागा रहाणार नाहीं.

( आ ) **मजूर व चालक मंडळ**—सध्यांचें युग आहे लोकशाहीचें, त्याकरितां मजुरांच्या कांहीं प्रतिनिधींना प्रत्येक उद्योगधंद्याचें एक चालक मंडळ ( Managing Council ) स्थापून, त्यावर स्थान द्यावें. तांत्रिक बाबी सोडून उद्योगधंद्याची वाढ, व्यवस्था, मजुर–मालक संबंध, व इतर तत्सम बाबींच्या बाबतींतील सामान्य धोरण आंखून देण्याचें व तें अंमलांत येतें कीं नाहीं हें पहाण्याचें कार्य, या मंडळानें करावें. अशा रीतीनें मजुरांनाहि विश्वासांत घेतल्यावर, मजुरांचा प्रश्न, हा प्रश्नच रहाणार नाहीं.

## प्रकरण २० वें

# राष्ट्रीयीकरण

मागील प्रकरणांत प्रत्येकास कांहींना कांहीं शिल्लक ठेवण्याची जरूरी भासते व अशी ठेवलेली शिल्लक त्याला जोंपर्यंत गरज नाहीं तोंपर्यंत दुसऱ्यास जर वापरण्यास द्यावयाची, तर त्याबद्दल त्यास मोबदला म्हणून कांहीं तरी व्याज किंवा नफा मिळाला पाहिजे; हें आपण पाहिलें. पण यापेक्षांहि एक मूलगामी मुद्दा उत्पन्न होतो त्याचा विचार आतां आपणांस कर्तव्य आहे. मनुष्याला ज्या कारणांकरितां शिल्लक ठेवण्याची जरूरी असते तीं कारणेंच नाहींशीं केलीं तर मग शिल्लक ठेवावयाची कशाला ? असें झालें तर त्यावर नफा किंवा व्याज देण्याचा प्रश्नच उद्भवणार नाहीं

**१. जादा श्रमास प्रेरकशक्ति कोणती ?**—आजारीपण, म्हातारपण, लग्नकार्य अशा प्रसंगीं सरकारनें मदत करावी, मुलांबाळांचें शिक्षण, कामधंदा या बाबतींतील जबाबदारी सरकारनें स्वीकारावी, ही सारी जिम्मेदारी सरकारनें आपल्या शिरावर घेतल्यावर मग कोणालाहि कांहीं पावसाळ्यांकरितां तरतूद करून ठेविली पाहिजे अशी जरूरी भासणार नाहीं. पण मग यावर असा प्रश्न उपस्थित केला जाईल कीं, शिल्लक ठेवण्याची गरज नाहीं, तर माणूस आपले उत्पादक श्रमहि कमी करील, व मग ती एक मोठी राष्ट्रीय हानी ठरेल. पण असें म्हणण्यांत आपण एक गोष्ट गृहीत धरतों—आणि ती म्हणजे माणसाच्या उत्पादक श्रमास पैसा ही एकमेव प्रेरकशक्ति आहे. येथें आपण प्रत्येकास आपल्या नित्य गरजा भागविण्याकरितां कांहींना कांहीं श्रम केलेच पाहिजेत हें गृहीत धरलें आहे. वादाचा मुद्दा असा आहे कीं, शिल्लक ठेवण्याकरितां तो जादा श्रम पैशाच्या प्रेरकशक्तीशिवाय करील कीं नाहीं ? राष्ट्रहितैकदृष्टीनें जे काम करणारे आहेत त्यांना पैसा ही प्रेरकशक्ति मुळींच नसते. 'परोपकाराय सतां विभूतयः' या कोटींतील गांधी, नेहरूंसारखे लोक काम करीतच असतात. इतर सर्व लोकांनाहि जादा काम करण्यास प्रवृत्त करणारा पैसा ही एकमेव शक्ति नाहीं. कांहीं लोकांस इतर लोकांपेक्षां आपण कांहींतरी

विशेष आहोंत, असें दाखविण्याकरितां जादा काम करावेंसें वाटतें. कांहींस स्वतःची मनःप्रवृत्ति तशी असते म्हणून, कांहींस समाजांत मानमान्यता, प्रतिष्ठा मिळावी म्हणून, अशा निरनिराळ्या कारणांकरितां जादा व विशेष काम करावेंसें वाटत असतें. आणि समाजांतील अशींच माणसें राष्ट्रीय संपत्तींत विशेष भर घालीत असतात. इतरेजनांच्या पुढें स्वतःची वीतभर खळगी भरण्याव्यतिरिक्त दुसरा विचार नसतो. आणि अशा माणसांस जादा पैशाची प्रेरकशक्तीहि जादा काम करण्यास प्रेरणा देऊं शकणार नाहीं. तेव्हां पैसा शिल्लक ठेवण्याची जरूरी नाहींशी झाली तर त्यायोगें राष्ट्रीय हानि होईल हें म्हणणें तितकेंसें बरोबर आहे असें वाटत नाहीं. शिल्लक ठेवण्याची गरज न राहिल्यामुळें कांहीं लोक नेहमींच्याच त्यांच्या प्रवृत्तीपेक्षां जादा खर्च करतील, पण यायोगें राष्ट्रीय उत्पादनास उत्तेजनच मिळतें. त्यांत राष्ट्रीय तोटा कांहीं नाहीं, हें आपण चौथ्या प्रकरणांत पाहिलें आहे.

**२. राष्ट्रीयीकरणामागील तात्त्विक भूमिका**—आपत्तींत आपलें कसें होईल, आपल्या मुलाबाळांचें कसें होईल, अशी प्रत्येकास वाटणारी विवंचना जर सरकार म्हणजे समाज एकमेकांच्या सहकार्यावर दूर करूं शकेल तर तें एक सुवर्णयुगच आलें असें प्रत्येकास वाटेल. आणि याकरितांच तर साऱ्या विचारवंताची धडपड आहे ना! अशा युगांत देशांतील सारे उत्पादक धंदे कांहीं खाजगी भांडवलदारांच्या सुखाकरितां चालविले न जातां समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या ऐहिक सुखांत वृद्धि व्हावी या हेतूनें चालविले जातील. खाजगी व्यक्तीच्या जादा नफा मिळविण्याच्या हेतूनें चालणारा धंदा असें स्वरूप या धंद्यास असणार नाहीं. याचाच अर्थ असे सारे धंदे सरकारच्या म्हणजे सामाजिक मालकीनें चालविले जातील.

सर्व समाजाच्या हिताकरतांच सर्व उद्योगधंदे सरकारी मालकीनें सरकारी नियंत्रणाखालीं चालविले जात असल्यानें तेथें खाजगी व्यक्तींस हल्लींसारख्या मिळणाऱ्या भरमसाट नफ्यास वावच असणार नाहीं. अशानें समाजांतील सध्यां दिसणारी आर्थिक विषमता आपोआपच नष्ट होईल. अशा समाजरचनेंत प्रत्येकानें आपल्या कुवतीप्रमाणें काम व आपल्या जरूरीप्रमाणें उत्पादनांतील हिस्सा घ्यावा, ( Work according to capacity & consumption of goods

according to necessity ) या तत्त्वाचा अंमल असेल असें युग पृथ्वीवर केव्हां अवतरणार असेल तें असो. पण सध्यांच्या जगांतील विचारप्रवाहाचा ओघ पाहातां याबाबत सुरवात करावी व रशियांत ज्या पद्धतीनें साऱ्या उत्पादक धंद्यांवर सरकारी मालकी प्रस्थापित झालेली आहे, त्या हिंसात्मक पद्धतीनें ती प्रत्यक्षांत न आणतां, इंग्लंडमध्यें ज्या वैचारिक क्रांतीच्या मार्गानें ती निर्माण केली जात आहे, त्या पद्धतीनें सगळीकडेच ती प्रत्यक्षांत उतरविण्याच्या दृष्टीनें पावलें टाकण्यास सुरवात करावी, अशी साऱ्या पुरोगामी विचारवंतांची इच्छा आहे.

**३. राष्ट्रीय मालकीचा धंदा म्हणजे काय?**—ही झाली धंद्यांच्या राष्ट्रीयीकरणामागील तात्त्विक भूमिका. प्रत्यक्षांत त्यास सुरवात कशी करावयाची, असें करण्यांत फायदेतोटे कोणते याबाबतचेंहि विवेचन अत्यावश्यक आहे. प्रथमच राष्ट्रीय मालकीचा धंदा या शब्दाची व्याप्ति काय आहे, हें लक्षांत घेतलें पाहिजे. एखाद्या धंद्यावर वस्तूंची किंमत, नोकरांचा पगार व इतरहि अनेक बाबी सरकारनें ठरवून दिल्यानें त्यावर पूर्ण नियंत्रण घातलें तरी ह्या धंद्याचें राष्ट्रीयीकरण झालें असें समजतां यावयाचें नाहीं. हा धंदा ज्या व्यक्तींच्या किंवा कंपनीच्या मालकीचा आहे त्यांचाच तो धंदा राहातो. पण जेव्हां एखाद्या धंद्याची सारी मिळकत सरकारी मालकीची असेल, तेव्हां तो ' राष्ट्रीय मालकीचा धंदा ' असें समजावयाचें. अशा मिळकतीवर कर्जाचा बोजा असल्यानें या मालकी हक्कास बाध येत नाहीं.

**४. खाजगी भांडवलदारांची अडवणूक**—उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाचें तत्त्व सरकारनें अंगीकृत केलें आहे, असें एकदां जाहीर केल्यावर खाजगी भांडवल बाहेर येणार नाहीं. त्यामुळें नवीन उद्योगधंदेच काढतां येणार नाहींत, असा आक्षेप यावर घेतला जातो. मागील प्रकरणांत खऱ्या अर्थानें भांडवल म्हणजे मानवी बुद्धि व त्याचे हात व देशांतील खनिज संपत्ति होय, हें आपण पाहिलें आहे. हें भांडवल जोंपर्यंत उपलब्ध आहे तोंपर्यंत वेळप्रसंगीं हव्या तेवढ्या नोटा छापल्या तरी त्यांत धोका नाहीं, हेंहि आपण पाहिलें. तेव्हां भांडवलदारांनीं जर भांडवल बाहेर काढलें नाहीं तर नवीन धंदे काढण्याकरितां जादा नोटा छापण्याचा प्रसंग सरकारवर येईल. पण अशा प्रसंगीं जादा नोटा

छापणें हें प्राकृत अर्थानें तारणाशिवाय नोटा छापल्या असें होणार नाहीं. भांडवलदारांच्या तिजोरींत असलेल्या नोटांच्या तारणावर ह्या नोटा छापल्या जातील. सरकारी तिजोरींत अशा तऱ्हेची पद्धती हल्लींच अंगिकारिली जाते. समजा, नाशिकच्या तिजोरींत वाजवीपेक्षां जास्त चलन आलें असेल व पुण्यास जमा झालेल्या चलनापेक्षां जादा चलनाची जरूरी असेल, तर नाशिकमधील जादा चलन ' चलनपेटींत ' ( Treasury chest ) बंद केलें जातें व त्या जोरावर पुण्याच्या पेटींतील चलन बाहेर वापरांत काढलें जातें. अशा रीतीनें व्यवहारांतील चलनाचा सांठा अकारण वाढूं न देण्याची खबरदारी चलन इकडून तिकडे न हालवितां रिझर्व्ह-बँक घेते. याच तऱ्हेनें भांडवलदारांच्या तिजोरींतील अडकून पडलेला पैसा सरकारच्या 'चलन पेटीं'त अडकून पडला आहे असें समजून व्यवहारांतील चलनाचा सांठा आहे त्या प्रमाणांत ठेवण्याकरितां सरकारनें जादा नोटा छापाव्यात. अर्थात् ' चलनपेटी 'चें उदाहरण या स्थितींत तंतोतंत लागूं पडतें, असा माझाहि दावा नाहीं. माझें म्हणणें एवढेंच कीं, भांडवलदार जोंपावेतों आपली तिजोरी उघडणार नाहींत तोंपर्यंत जादा नोटा छापल्यानें धोका नाहीं. पण त्यांनीं पैसा उद्योगधंद्यांत न गुंतवितां व्यवहारांत उपभोग्य वस्तू विकत घेण्याकरितां बाहेर काढला, तर चलनवाढीचा धोका टाळण्याकरितां २१ व्या प्रकरणांत सुचविलेल्या जबर दराच्या वाढत्या श्रेणीच्या करांचा व जीवनावश्यक वस्तूंच्या उत्पादनावर व वांटपावर कडक नियंत्रण ठेवण्याचा मार्ग सरकारनें अंगिकारावा, म्हणजे चलनवाढीचे दुष्परिणाम टळतील.

याबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, एकदां भांडवलदारांस कळून चुकलें कीं, सरकार जें म्हणेल तें करून दाखवील, तेव्हां विस्तवाशीं खेळ खेळण्यांत आतां अर्थ नाहीं, मग ' सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः ' या न्यायानें भांडवलदारहि सरकार देईल त्या व्याजावर पैसा गुंतविण्यास तयार होईल. मुख्य गोष्ट सरकारनें स्वतांच्या खंबीरपणानें लोकहिताकरितां स्वतांच्या अंतःकरण-प्रवृत्ति ' मृदूनि कुसुमादपि ' व लोकहितविरोधी प्रवृत्ति दडपण्याकरितां ' वज्रादपि कठोराणि ' अशा ठेवून लोकोत्तर पुरुषांचें लक्षण अंगीं बाणविण्याचा यत्न केला पाहिजे. सरकारपासून अशा लोकोत्तर गुणांची अपेक्षा करावयाची नाहीं तर करावयाची कोणापासून ?

**५. खाजगी व सरकारी कार्यक्षमता**—यानंतर दुसरें असेंच एक बुजगावणें दाखविलें जातें. स्वतांच्या फायद्याकरितां वाटेल ते कष्ट सोसून भांडवलदार कारखाने चालवितो. तेच धंदे सरकारी मालकीचे झाल्यावर, भांडवलदारांच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं ज्या कार्यक्षमतेनें ते चालविले जातात. त्या कार्यक्षमतेनें ते चालविले जाणार नाहींत. या प्रकरणाच्या आरंभीं आपण पाहिलें कीं, स्वतांचा आर्थिक फायदा हाच एक हेतु, काम चांगलें किंवा वाईट करण्यांत नसतो. स्वतांची मानमान्यता, साहजिक प्रेरणा इत्यादि दुसऱ्या गोष्टींवरहि तो अवलंबून असतो. बरें एवढा मोठा राज्यव्यवहार निव्वळ नोकरांवरच अवलंबून चाललेला असतो कीं नाहीं ?

सर्वसामान्यतः बोलावयाचें म्हणजे हा राज्यव्यवहार कौतुकास्पद कार्यक्षमतेनें नोकरांकडून चालविला जातो यांत संशय नाहीं. राज्यकारभार जर कार्यक्षमतेनें हांकला जातो तर धंदे तसे चालविले जाणार नाहींत, असें म्हणणें युक्तियुक्त दिसत नाहीं. उलटपक्षीं खाजगी धंद्यास कांहींकांहीं वेळेस योग्य तांत्रिक सल्ला मिळत नाहीं किंवा भांडवलाचा तुटवडा पडतो, किंवा अशाच दुसऱ्या अडचणींस तोंड द्यावें लागतें. तशी अवनीप्रभूच्या खास देखरेखीखालीं चाललेल्या धंद्यांची अवस्था असूं शकणार नाहीं.

येथें उपलब्ध झाले नाहींत तर तो परदेशांतून तंत्रज्ञ मागवूं शकेल, परकी सरकारचें साहाय्य व भांडवल मिळवूं शकेल. देशांत हवें तेवढें भांडवल तो जमा करील किंवा निर्माण करील. भूतलावरील ‘ कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् ’ अशी शक्ति म्हणजे सरकार, तें आधिभौतिक क्षेत्रांत काय करूं शकणार नाहीं ? या दृष्टिकोनांतून विचार केला असतां सरकारच उद्योगधंदे अधिक कार्यक्षमतेनें चालवूं शकेल असें दिसून येईल. सरकार नालायक असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. कारण सरकार म्हणजे ज्या त्या देशांतील बहुसंख्य लोकांच्या प्रगतीचा टप्पा दर्शविणारी ग्रंथी होय.

प्रत्यक्ष व्यवहारांतील बऱ्याच खाजगी उद्योगधंद्यांची दिवाळीं निघालेलीं आपण पदोपदीं पाहातों. यावरूनहि खाजगी उद्योगधंदा यद्यपि व्यक्तिगत नफ्याकरितां चालविला जात असला तरी तो आदर्श कार्यक्षमतेनें चालविला जातोच, असें अनुमान निघत नाहीं. आतां एवढें खरें कीं, सरकारी कामकाज अधिक संथपणें चालतें.

कारकुनाची नोट, नंतर मुख्य कारकुनाची, नंतर ऑफिसरची, ऑफिसरनीं कांहींतरी विचारणा करावयाची, पुन्हां कारकुनाची व त्यावर मुख्य कारकुनाची नोट व शेवटीं निर्णय इतक्या संथपणें धंदा चालविला तर मात्र तोटा होण्याचा संभव. कापूस परदेशांतून खरेदी केला पाहिजे तो जानेवारी ते एप्रिलपर्यंत, पण वर दर्शविल्याप्रमाणें सुंदोपसुंदी करीत बसलें तर हंगाम निघून जावयाचा व मग " बैल गेला नि झोंपा केला. " अशांतली गत व्हावयाची. परदेशांतील कापसाचे सौदे होऊनहि गेलेले असावयाचे व मग सरकार स्वारी खरेदीस बाजारांत यावयाची. नमनांतच रात्र निघून गेल्यावर नाटक केव्हां करणार ! अशा वेळीं चूक नजेरस येऊनहि कांहीं उपयोग होत नाहीं. कांहीं वेळेस अशा महत्त्वाच्या बाबतींत चटकन निर्णय घ्यावा लागतो. खाजगी धंद्याच्या बाबतींत संचालक-मंडळ, एका दिवसांत निर्णय घेऊं शकेल. पण सरकारी कामकाजाची रीत पाहिली तर धंद्याच्या मॅनेजरचा रिपोर्ट आपल्या खातेप्रमुखास, त्याचेकडून आपल्या शिफारशीसह तो पुढें सचिवालयांतील आपल्या खात्याकडे,नंतर अर्थखात्याकडे व तेथून पुढें सरकारकडे. शेवटीं सरकारी निर्णय झाल्यावर तो पुन्हां आल्या मार्गानें मॅनेजरकडे येणार. हा प्रकार राज्यव्यवहारांत थोडासा इष्ट असा आहे. लोकशाही काळांत सरकारला आपल्या प्रत्येक कृत्याबद्दल विधिमंडळास जाब द्यावा लागतो, तसेंच तमाम जनतेस न्याय्य वागणूक मिळावी व सरकारी कामकाजांचे नियमहि उल्लंघले जाऊं नयेत, म्हणून दक्षता बाळगावी लागते. पण उद्योगधंदे असेच चालावयाचे म्हटलें तर तें हानिकारक होईल.

आतां धंदे सरकारी मालकीचे झाले, तर खाजगी धंद्यांत जसें प्रत्येक धंद्याचें चालक-मंडळ धंद्याच्या दैनंदिन व्यवहारांत चटपट निर्णय घेऊं शकतें, तशा तऱ्हेची व्यवस्था करतां यावयाची नाहीं, अशांतला भाग नाहीं. सरकारी मालकीचे धंदेहि सरकारनें नेमलेल्या चालक-मंडळांमार्फत चालवितां येतील. अशा मंडळास धंदा योग्य कार्यक्षमतेनें चालविण्याबाबत खाजगी धंद्यांतील चालकांस जो अधिकार असतो तोच असूं शकेल, मात्र त्या मंडळानें आपल्या कामकाजाचा वार्षिक अहवाल आपल्या मालकाकडे म्हणजे सरकारकडे द्यावा. खाजगी धंद्यांतहि असा अहवाल चालक मंडळ आपल्या भागीदारांस सादर करितें.

अर्थात् अशीं स्वतंत्र चालकमंडळें सर्वसामान्य धोरणाबाबत सरकारला

जबाबदार असलींच पाहिजेत. खाजगी धंद्यांतील भागीदारांची जागा येथें सरकारनें घेतलेली असते. जसा खाजगी धंद्यांतील चालकमंडळास आपल्या भागीदारांस आपल्या भल्याबुऱ्या कृत्यांबद्दल जाब द्यावा लागतो, तसाच या चालक मंडळास आपला एकमेव भागीदार सरकार यास जाब द्यावाच लागतो.

परदेशांइतपत आपल्याकडे अद्याप अशा मंडळावर नेमण्याइतक्या लायकीचे लोक भरपूर प्रमाणांत प्रथम प्रथम मिळणार नाहींत. कारण एकंदर उद्योगधंदेच कमी. त्यामुळें यांत तावून सुलाखून निघालेल्या अनुभवी गृहस्थांचाहि अभाव आहे. पण धंद्यांच्या वाढीबरोबर हळूहळू या परिस्थितींत सुधारणा होऊं शकेल.

सध्यां मुंबईसरकार अशाच एका मंडळामार्फत ( State Road corporation ) रस्त्यांवरील नागरी-वाहितुकीचा धंदा चालवितें. व हिंदुस्थानसरकार दामोदर-मंडळा-मार्फत ( D. V. A. ) दामोदर नदीवरील बंधाऱ्याचें काम चालवीत आहे.

जो तज्ज्ञ वर्ग आपल्याकडे उपलब्ध नसेल तो परदेशांतून आणतां येईल. खाजगी उद्योगधंद्यांतदेखील चालकमंडळ सोडलें तर इतर सर्व व्यवहार पगारी नोकरांमार्फतच चालविला जातो. हा नौकरवर्गहि सरकारी हुकमतीखालीं पूर्वीइतक्याच कार्यक्षमतेनें काम करील यांत शंका बाळगण्याचें कारण नाहीं.

**६. मालाचा दर्जा**—सरकारी मालकीच्या धंद्यापासून जो माल निर्माण होईल, त्याच्या दर्जाबाबत मात्र ग्राहक खाजगी धंद्यावर जी टीका करणार नाहीं ती करील. एखाद्या कंपनीची एखादी वस्तु ग्राहकास न पटली, तर तो दुसऱ्या एका कंपनीची ती विकत घेऊं शकेल. पण जेव्हां एखादा धंदा सरकार चालवील, तेव्हां तो मक्तेदारी पद्धतीनेंच चालविला जाईल. त्यामुळें अशी टीका फार होऊं शकेल. अशी स्थिति होऊं नये म्हणून त्या धंद्यांतील निःपक्षपाती तज्ज्ञाकडून वस्तूंच्या दर्जाबाबत दाखला घ्यावा. ऑडिटर जनरलप्रमाणें ( सरकारी हिशेबतपासणी प्रमुख ) हाहि तज्ज्ञ, राष्ट्राध्यक्षांस जबाबदार असावा. यानें धंद्याचे हिशेब व वस्तू तपासून, शक्य तितक्या काटकसरीनें ( economy ) धंदा चालवून उत्पादित वस्तूंचा दर्जा ( quality ) योग्य ठेवला गेला आहे कीं नाहीं याबद्दल आपला अहवाल तयार करून तो सरकारकडे पाठवावा व तो सरकारनें लोकसभेपुढें ठेवावा. लोकसभा जरूर त्या सूचना करील व सरकार त्या अंमलांत

आणील. अशा रीतीनें धंदे चालविले तर अकार्यक्षमतेचा दोष सरकारी धंद्यांच्या बाबतींत लावतां येणार नाहीं, व लोकांच्या तक्रारीची योग्य ती दखलहि घेतली जाईल.

**७. सरकारी धंद्यांत मारक चढाओढ असत नाहीं**—याशिवाय सरकारी उद्योगधंद्यांच्या बाबतींत, मक्तेदारीनें ते चालविले जात असल्यानें, निरनिराळ्या तत्सम धंद्यांतील मारक चढाओढ, जाहिरातीवरील वायफट खर्च, या हानिकारक गोष्टींचा अभाव असेल; व भरपूर भांडवल, प्रवीण तंत्रज्ञ, जनतेचा विश्वास ह्या लाभदायक गोष्टींचा साकल्यानें अंतर्भाव असेल. सरकारी उद्योगधंदे मक्तेदारी पद्धतीनें चालवावे लागतात, नाहींतर खाजगी भांडवलदार अशा धंद्यांशीं चढाओढ करून प्रसंगीं अगदीं नाममात्र नफ्यावर वस्तू विकतील. मग सरकारी धंदा तोट्यांत चालेल. आम जनतेच्या पैशावर हे धंदे चालत असल्यानें अशा रीतीनें खाजगी व्यक्तींना धंदे चालविण्यास परवानगी देऊन, जनतेच्या पैशाचा अपव्यय होऊं देणें, हें कोणत्याहि सरकारास शोभणार नाहीं. धंदा शक्य तितक्या काटकसरीनें चालवावा असें म्हणणें, हें वेगळें व खाजगी व्यक्तींस सरकारी धंद्यांशीं चढाओढ करण्यास मुभा द्या हें म्हणणें वेगळें.

याबरोबरच सरकार पुढील काळाचा विचार करून धंद्यांची आंखणी करूं शकेल व विकेंद्रीकरणाच्या तत्त्वानुसार देशांतील निरनिराळ्या भागांत ते उभारूं शकेल. बेकारीचें समूळ उच्चाटन व समाजांत आर्थिक स्थैर्य, धंदे सरकारी मालकीचे असले तरच होऊं शकेल, एरवीं नाहीं. खाजगी भांडवलदार एवढ्या दूरदर्शीपणें व समाजहिताच्या दृष्टीनें धंद्यांची उभारणी करूं शकत नाहीं, तें सरकारलाच शक्य आहे.

**८. कोणत्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण प्रथम करावें?**—वरील विवेचनावरून धंद्यांच्या राष्ट्रीयीकरणानें सामान्य जनतेचा फायदाच होईल, हें दिसून येईल. यावरून सर्व उद्योगधंदे ताबडतोब राष्ट्रीय मालकीचे करावेत, असें कोणीं अनुमान काढलें तर तें चूक ठरेल. लोकशाहींत त्याबाबत जनमत तयार करावें लागतें. पूर्व अनुभवाच्या अभावामुळें एखाद्या धंद्यांत ठोकर लागली तर सरकारवर जहरी टीकेचा वर्षाव सुरू होतो. लोकशाही सरकारास जनमतांतील क्षणोक्षणीं होणाऱ्या फेरबदलाची कदर करावी लागते. यामुळें सध्यां जे व्यवस्थित चाललेले धंदे

आहेत, ज्यांचें राष्ट्रीयीकरण केल्यानें मूळचा काम करीत असलेला कार्यक्षम नौकरवर्ग व तंत्रज्ञ-गण मिळूं शकेल, व जे समाजांतील जास्तींत जास्त लोकांस उपयोगी अशा वस्तूंचें उत्पादन करितात आणि जे प्रस्थापित होऊन २० वर्षांचा काळ लोटून गेला आहे, ते प्रथम राष्ट्रीय मालकीचे करण्याचा प्रयत्न करावा लागेल. हे धंदे राष्ट्रीय मालकीचे केल्यानें जे उद्योगपति बेकार होतील त्यांना कांहीं तरी उद्योगधंदा पाहिजेच, त्यांना देशांत चालू नसलेले नवीन धंदे काढण्यास उत्तेजन द्यावें लागेल. त्याबरोबर हे नवीन धंदे २०।२५ वर्षें तरी सरकारी मालकीचे केले जाणार नाहींत असें आश्वासन द्यावें लागेल, तरच ते उद्योगपति स्वस्थ मनानें ते धंदे पुढें आणण्याचा प्रयत्न करूं शकतील.

अशा धोरणानें चालावयाचें म्हटलें तर, आतां हिंदुस्थानांत विमा, बँका व कापडगिरण्या यांचें राष्ट्रीयीकरण करण्यास हरकत नाहीं. सध्यांच या धंद्यांवर सरकारचें इतकें नियंत्रण आहे कीं, त्यांना प्रत्येक पाऊल टाकतांना नियंत्रण-बुकांकडे व सरकारच्या डोळ्यांकडे पहावें लागतें. न जाणों आणखी एखादें नियंत्रण यावयाचें व साराच प्रकार वेगळा व्हावयाचा. अशा आनिश्चित मनःस्थितींत कोणताहि उद्योगपति त्या धंद्यांत भर किंवा सुधारणा करूं शकणार नाहीं. तशांतच सध्यां जगांतच राष्ट्रीयीकरणाचे वारे द्रुतगतीनें वाहूं लागले आहेत. त्यामुळें उद्योगपति आपल्या ताब्यांत जोंपर्यंत धंदे आहेत, तोंपर्यंत जेवढा जादा फायदा ओढतां येईल तेवढा ओढण्याचा प्रयत्न करणार. या सर्व कारणांनीं हे व यासारखे धंदे राष्ट्रीय मालकीचे अविलंबें करणें बरें.

९. **वस्तूंचें वांटप**—उत्पादनकेंद्रें राष्ट्रीय मालकीचीं केलीं, म्हणून तेथें होणाऱ्या वस्तूंचें वांटप मात्र तूर्त कांहीं वर्षें सरकारी दुकानांमार्फत करूं नये. सरकारी कारभार एका विशिष्ट दर्जाचा ( Standard ) ठेवावा लागतो. तो शक्य तितका ज्या त्या काळच्या लोकमतास अनुसरूनच आदर्श असावा लागतो अशानें वांटपाचा खर्च वाढतो; व त्याबरोबरच. सध्यां जो दुय्यम दर्जाचा असंख्य व्यापारीवर्ग आहे, तोहि बेकार होतो. त्यांना कांहींतरी कामधंदा द्यावा लागेल. सरकारी दुकानांतच त्यांना जर नौकऱ्या दिल्या, तर त्यायोगें सरकारचा कांहींच फायदा नाहीं. हेच लोक जेव्हां आपापलीं खाजगी दुकानें चालवीत असतील, तेव्हां शक्य तितका कमी नौकरवर्ग ठेवून स्वतां दिवसाचे बारा बारा तास-

खपून व्यापार करतील. पण तेच एकदां सरकारी नौकरींत आले कीं, ठराविक तासच काम व तेंहि पाट्या टाकावयाच्या म्हणून टाकावयाच्या या पद्धतीनें. हा वर्ग लौकिकदृष्ट्या फारसा शिकलेला नसल्यानें, यांचेवर मॅनेजर म्हणून दुसरा सुशिक्षित माणूस नेमला जाईल. तो अननुभवी असल्यानें या अनुभवी नौकर-वर्गाच्या टीकेस पात्र होईल. तेव्हां याच वर्गास नौकरींत घेऊन, त्यांचेकरवीं किरकोळ वांटपाचें (Retail trade) काम करून घेण्यापेक्षां, सध्यां रेशन दुकानदारांना ज्या प्रमाणांत नफा दिला जातो, त्या प्रमाणांत नफा देऊन त्यांच्याच जबाबदारीवर धंदा सोंपविलेला बरा. या धोरणानें ज्या बहुसंख्य वर्गाच्या हातांत व्यापार आहे, त्यांची टीका कमी होईल व जसजशीं उत्पादन-केंद्रें हातांत येत जातील व किरकोळ वांटपदेखील सरकारनेंच हातांत घ्यावें असें जनमत बनत जाईल, व तशी यंत्रणाहि तयार होत जाईल, तसतसा सर्वच व्यापार सरकारी मालकीचा होऊं शकेल. मोठमोठे उद्योगधंदे हातीं घेतल्यानें मूठभर उद्योगपतींकडून सरकारवर टीका होईल, पण इतर बहुसंख्य वर्ग सरकारला पाठिंबाच देईल. तसेंच मोठमोठे धंदे सरकारी हुकमतीखालीं चालूं लागले तर त्या धंद्यांच्या एकंदर खर्चांत वाढ होण्याचा संभव नाहीं. त्या धंद्यांतील कामाचे तास, पगार-श्रेणी व इतर नियम, सामान्यतः सरकारी कामकाजाप्रमाणेंच आहेत. त्यांतून उद्योगपतींना दुसऱ्या नवीन धंद्यांत गुंतविल्यानें, त्यांचाहि रोष कमी होईल. पण किरकोळ वांटप सद्यःपरिस्थितींत ताब्यांत घेतल्यानें बेकार होणारा मध्यमवर्गीय व्यापारी समाज सरकारविरुद्ध उठेल. तशांतच या वर्गासहि नौकरीधंदा मिळवून देण्याची नैतिक जबाबदारी सरकारवरच पडते. तेव्हां अशा गुंतागुंतींत सध्यांच गुरफटून घेण्यापेक्षां योग्य वेळेची वाट पाहाणें जास्त बरें. हा वर्ग काळाबाजार करील अशी भीति बाळगण्याचें फारसें कारण नाहीं. सध्यां जो काळा-बाजार दिसतो आहे, त्याचें मूळ आहे उत्पादनकेंद्रांत. तेथेंच नियंत्रित किंमतीपेक्षां अधिक किंमत प्रथमच घाऊक व्यापाऱ्यांकडून वसूल केली जात असल्यानें, त्यांना आपापल्यापरी जादा भावानें किरकोळ व्यापाऱ्यांस माल विकावा लागतो. मग प्रत्यक्षांत जेव्हां एखादा किरकोळ व्यापारी आपणांस ज्या किंमतीनें माल मिळाला त्यापेक्षां ५।१० टक्के जादा किंमत घेऊन माल विकतो, तेव्हां तो बिचारा दडपला जातो, व वरचा व्यापारीवर्ग मिशीवर ताव मारून मंत्र्यांच्या

बरोबर चहापाणी करीत असतो. अशायोगें समाजांत असहायतेची भावना ( Sense of frustration ) फैलावत जाते, व त्यांतूनच समाजांत अनैतिक प्रवृत्ति जोपासल्या जातात. याकरितां ज्या लोकांनीं आदर्श वागावयास पाहिजे, तेथेंच तशी वागणूक दिसल्यास, त्याचा खालील वर्गावर इष्ट असाच परिणाम होतो व सर्व समाजाची नैतिक पातळी उंचावत जाते. ' महाजनो येन गतः स पन्था । ' मोठ्या लोकांच्या पावलावर पाऊल टाकून जाणें हा तर इतरेजनांचा धर्म ! उत्पादनकेंद्रेंच सरकारच्या मालकीचीं झाल्यावर काळाबाजार थांबण्यास मदत होईल व मग तो खालच्या थरांत फैलावण्याची शक्यता कमी होईल. अशा स्थितींतहि एखादा व्यापारी काळाबाजार करीत आहे, असें दिसून आल्यास सध्यां जशीं रेशनदुकानें अशा व्यापाऱ्यांकडून काढून घेतलीं जातात, तशीं तीं दुकानें काढून घ्यावींत, म्हणजे इतर लोकांवराहि वचक बसेल.

**१०. वस्तूंच्या किंमती**—यानंतर प्रश्न उपस्थित होतो तो असा कीं, या राष्ट्रीयीकरण केलेल्या धंद्यांतील उत्पादित वस्तूंच्या किंमती उत्पादनखर्चाच्या ठराविक प्रमाणापेक्षां वाढवून, अशी जादा आलेली रक्कम सरकारच्या जमा बाजूस दाखल करावी कीं काय ? थोडक्यांत म्हणजे याचा उपयोग करासारखा करावा कीं काय ? जनताकल्याणाचें कंकण हातीं बांधलेल्या सरकारास पैसा किती लागेल याचा कांहीं नेम नाहीं. अशा सरकारांतील अर्थमंत्र्यास पैसा कसा जमवावा याची सारखी विवंचना असते. अशा स्थितींत जर राष्ट्रीयीकरण केलेल्या धंद्यांपासून वस्तूंच्या किंमती वाढवून जर अमाप पैसा मिळवितां येत असेल तर तो मोह कोणत्या सरकारास आवरतां येईल ? त्यास ही एक कामधेनूच वाटेल. पण यांत एक मोठा धोका असतो व तो हा कीं, पैशाची जरूरी असलेल्या अर्थमंत्र्यास वस्तूंच्या किंमती किती वाढवाव्या याचें भान रहात नाहीं व मग भरमसाट किंमती वाढल्या कीं, सामान्यजनांस अतोनात हाल सोसावे लागतात. जमाखर्चाची तोंडमिळवणी कशी करावी, हा एक प्रश्न सर्वांच्या डोळ्यांपुढें थैमान घालूं लागतो व अशी परिस्थिति नांदूं देणें समाजहितवादी सरकारास शोभणार नाहीं. ज्या समाजव्यवस्थेंत पैशाला महत्त्व नाहीं, उत्पादित वस्तू प्रत्येकाच्या गरजेच्या प्रमाणांत वांटून देणें एवढेंच ज्या सरकारचें काम, तेथें ह्या प्रश्नास महत्त्व नाहीं. म्हणून त्यांचा विचार येथें कर्तव्य नाहीं. याकरितां वस्तूंच्या

किंमती बेबंद वाढूं नयेत म्हणून राष्ट्रयिीकरण केलेल्या धंद्यांचा फायदा सर्व खर्च वजा जातां, शें. ५ पेक्षां जादा असूं नये, अशा निर्बंधानें वस्तूंच्या किंमती ठरवाव्यात व हा फायदा सरकारी तिजोरींत जमा न करितां, त्याचा उपयोग त्याच धंद्यांची वाढ करण्याकडे करावा, अशा तऱ्हेचा नियम असावा. मात्र अशा धंद्यांतील सर्व पैसा सरकारी मालकीचा असल्यानें त्यावर शें. ५ व्याज द्यावें व हें व्याज मात्र सरकारी तिजोरींत जमा करावें. ह्या आलेल्या व्याजांतूनच, सरकारनें जर लोकांकडून कर्जे काढून पैसा जमविला असेल, तर कर्जावरील व्याज द्यावें. लोकांच्या कर्जावरील व्याजाचा त्या धंद्यावर आणखी वेगळा बोजा पडूं नये. या सर्वांचा अर्थ असा कीं, उत्पादित वस्तूंची किंमत, भांडवलावरील ५ टक्के व्याज, घसाराफंड ५ टक्के, नोकरांचा पगार व कच्च्या मालाची किंमत, या सर्वांच्या बेरजेपेक्षां जास्त असूं नये. समीकरण मांडावयाचें झाल्यास, वस्तूंची किंमत = कच्चा माल + नौकरपगार + भांडवलावरील व्याज ( शें. ५ टक्के ) + घसाराफंड + वाढफंड ( शें. ५टक्के ) असें मांडतां येईल. मात्र समाजहिताच्या दृष्टीनें ज्या वस्तूंचा खप न वाढणें इष्ट असतें, अशा दारू वगैरेसारख्या मादक पदार्थांची किंमत सामान्य प्राप्तीच्या माणसास न झेपेल अशीच ठेवणें योग्य होईल. त्या उलट क्विनाईन किंवा जीवनसत्त्वाच्या गोळ्या उत्पादनाच्या किंमतीपेक्षांहि कमी किंमतींत किंवा फुकट वांटणेंदेखील इष्ट ठरेल.

हिंदुस्थानांत रेल्वे, पोस्ट व तारखातें हे धंदे राष्ट्रीय मालकीचे आहेत. १९५१–५२ च्या अंदाजपत्रकांत ( Budget ) रेल्वेमधील फायदा म्हणून २० कोटी रु. सरकारनें आपल्या सामान्य उत्पन्नांत ( general revenue ) जमा केलेले आहेत. वर विवेचन केलेल्या तत्त्वानुसार ही प्रथा अनिष्टच आहे, असें म्हणावें लागतें. सरकारला जादा उत्पन्न पाहिजे तर तें नेहमींच्या करांत वाढ करून किंवा नवीन कर बसवून मिळवावें, पण वरील मार्गानें मिळविण्यानें राष्ट्रीयधंदे ज्या व्यापारी तत्त्वांवर ( Commercial basis ) चालविले गेले पाहिजेत, तसें न होतां, राष्ट्रीयीकरणाच्या प्रथमावस्थेंतच त्यांत अनिष्ट प्रथा सुरू होऊन अशा धंद्यांच्या कार्यक्षमतेवर परिणाम होईल. आतां हें कबूलच केलें पाहिजे कीं, धंदे राष्ट्रीय मालकीचे केले व त्यांतील उत्पादित वस्तूंच्या किंमती मागील परिच्छेदांत सुचविल्याप्रमाणें जर ठरविल्या तर अशा धंद्यांपासून सरकारला

कार्पोरेशन करासारख्या करांचें व खाजगी व्यक्तींच्याहि मिळकतीचें प्रमाण कमी झाल्यानें प्राप्तिकराचें उत्पन्न आतां जेवढें मिळतें, तेवढें मिळणार नाहीं. हें बुडालेल्या करांचें उत्पन्न विक्रीकर, वारसाकर ह्या करांत वाढ करून भरून काढावें लागेल.

**११. भांडवल**—धंद्याचें राष्ट्रीयीकरण करावयाचें असें ठरल्यावर, मुख्य प्रश्न असा निर्माण होतो कीं, ठीक आहे, करावें धंद्याचें राष्ट्रीयीकरण; पण कां हो पैसा आणायचा कोठून ? नुसत्या कापडधंद्याचेंच राष्ट्रीयीकरण करावयाचें झालें, तर कोट्यवधि रुपये लागतील. एवढा अफाट पैसा सरकार आणणार कोठून ?

या प्रश्नाचें माझें उत्तर अगदीं साधें आहे. मी येथें एक प्रतिप्रश्न विचारतों. कां हो, ह्या गिरणीवाल्यांनीं एवढा पैसा आणला कोठून ? शेअर-भांडवल उभें करूनच ना ? मग सरकार जेव्हां एखाद्या धंद्याचें राष्ट्रीयीकरण करील, तेव्हां तें असे सारे भाग विकत घेईल, व भागीदारांना प्रत्यक्ष पैसा देण्याच्या ऐवजीं त्यांच्या भागांच्या ( Share ) दर्शनी किंमतीइतका ( Par-value ) १ ते १½ टक्के व्याजाचा कर्जरोखा लिहून देईल. असें केल्यानें भागीदारांना पूर्वीइतका नफा मिळणार नाहीं हें खरें, पण त्यांना आपले भाग जसेच्या तसे राहिल्यानें आपली पुंजी बुडण्याची भीति नाहीं व त्याबरोबरच कांहीं ना कांहीं तरी व्याज मिळत राहीलच. पैशाच्या जरुरीप्रमाणें हे भाग पुन्हां बाजारांत विकतां येतीलच. एकदां एक गोष्ट इष्ट आहे असें ठरल्यावर त्याकरितां झळहि सोसावी लागणारच. अहो, मुलगी सासरीं जातांना किती वाईट वाटतें. १५-२० वर्षें तिचा सांभाळ केला तो केला व नंतर तिच्याबरोबर आपल्या शक्त्यनुसार बिदागी देऊन, तिची रवानगी करण्याची पाळी प्रत्येकावर येते. शेवटीं 'अर्थोऽहि कन्या परकीय एव' ह्या कालिदासोक्तीचा आधार घेऊन आपण समाधान मानतों, व ती सासरीं आनंदांत आहे हें ऐकून आपलें समाधान द्विगुणित होतें. तसेंच एकदां राष्ट्रीयीकरण ही एक फायदेशीर गोष्ट आहे, असें म्हटल्यावर तो धंदा बरा चालला आहे व आपल्यालाहि आपल्या रकमेवर १-१½ टक्के व्याज मिळतें आहे, हें पाहून आपलें समाधान द्विगुणित व्हायला हवें. आतांपासूनच आपण आपल्या मनाची तशी तयारी करूं या, म्हणजे प्रत्यक्ष राष्ट्रीयीकरणाचे वेळीं आपलें मनःस्वास्थ्य बिघडणार नाहीं.

# प्रकरण २१ वें

# युद्ध व अर्थ

**१. युद्धाची सर्वंकषता**—" युद्धस्य वार्ता रम्या ! " युद्धाची बातमी ऐकायलाच गोड. पण प्रत्यक्ष युद्ध म्हटलें म्हणजे कोण भयंकर ! प्रत्यक्ष रणांगणावर लढणाऱ्या सैनिकांसच युद्धाचा भयंकरपणा जाणवतो असें नाहीं, तर त्या सैनिकास अन्न, वस्त्र व दारुगोळा पुरविणाऱ्या राष्ट्रांतील यच्चयावत् सर्व नागरिकांस युद्धजन्य कष्टप्रद जीवन सहन करावें लागतें. हवाई-यानांतील आश्चर्यकारक प्रगतीमुळें घर व रणांगण यांत कांहीं फरकच राहिलेला नाहीं. नुकत्याच झालेल्या महायुद्धांतील अनुभवावरून युध्यमान राष्ट्रांतील नागरिकांस प्रत्यहीं प्राण व वित्त यांशीं प्रत्यक्ष प्रसंग असल्याची जाणीव होत असे. तटस्थ राष्ट्रांसदेखील आधुनिक युद्धाची झळ लागल्याशिवाय राहात नाहीं. अशा या सर्वव्यापी व सर्वभक्षक आधुनिक युद्धाचा परिणाम ज्या त्या राष्ट्राच्या अर्थ-व्यवस्थेवर काय होतो याचा विचार या प्रकरणांत करण्याचें योजिलें आहे.

**२. लोकशाहीचा युद्धप्रयत्न**—लढाई सुरू करावयाची किंवा आपणांवर लादल्या गेलेल्या लढाईस तोंड द्यावयाचें म्हणजे प्रत्यक्ष रणांगणावर लढणाऱ्या सैनिकांस भरपूर प्रमाणांत शस्त्रास्त्रें, विमानें, लढाऊ बोटी व दारुगोळा यांचा सतत पुरवठा केला पाहिजे. ही गोष्ट निव्वळ पैशानें होणारी नव्हे. पैशाचा उपयोग फार तर तटस्थ राष्ट्रांकडून युद्धोपयोगी माल विकत घेण्याकडे होईल. येथें पैसा म्हणजे सोनें असाच अर्थ घ्यावा लागेल. युद्धकाळांत युद्धमान राष्ट्राच्या गरजा एवढया वाढलेल्या असतात कीं, आयात केलेल्या मालाच्या मोबदल्यांत दुसरा माल तयार करून निर्यात करण्यास सवडच नसते. त्याकरितां सोनेंच पाठवावें लागतें. तेव्हां एकदां लढाई सुरू झाली कीं, तटस्थ अशीं राष्ट्रें भेटणें कठीण. भेटलीं तर तीं आपणांस सोनें देऊनहि माल पुरवितील कीं नाहीं याची शंका. कारण त्या तटस्थ राष्ट्रांसहि एखाद्यास माल पुरविला तर

दुसऱ्याचा रोष ओढवेल ही भीति असते. त्यामुळें एकदां लढाई सुरू झाली कीं, दोस्त म्हणविणाऱ्या सर्व राष्ट्रांस उपलब्ध असलेल्या मनुष्यबळाचा व इतर साधनसामग्रीचा समन्वय साधून युद्ध यशस्वी करण्याचा आटोकाट प्रयत्न करावा लागतो. लोकशाही सरकारास अनिर्बंधपणें हें करतां यावें म्हणून तीं आपापल्या कायदेमंडळांकडून भरपूर अधिकार मागून घेतात, व कायदेमंडळांनाहि तसा अधिकार देणें क्रमप्राप्तच असतें. तीं असा अधिकार देणार नाहींत तर सरकारें मनमोकळेपणें व पूर्ण लक्ष घालून युद्धप्रयत्न करूं शकणार नाहींत व अशा अर्धवट स्थितींत चालविलेल्या युद्धांत अपयश हमखास येणारच. म्हणून लोकशाही सरकारांसदेखील युद्धकाळापुरते हुकूमशाही सरकारासारखे अधिकार प्राप्त होतात. फरक एवढाच कीं, हुकूमशहा स्वतः होऊन असे अधिकार धारण करतो, लोकशाही सरकारांस जनतेनें निवडून दिलेल्या कायदेमंडळाकडून अपरिहार्य कारणांमुळें ते बहाल केले जातात. असें जरी असलें तरी लोकशाही सरकारांस आपल्या कायदेमंडळांस आपण करीत असलेल्या प्रयत्नांचा आढावा व त्यांच्या टीकेस उत्तर हें द्यावेंच लागतें.

**३. युद्धनियंत्रणमंडळाचें सर्वाधिकारित्व**—असे अधिकार प्राप्त झाल्यावर सरकार एक मध्यवर्ती युद्धनियंत्रण–मंडळ स्थापन करितें व त्यामार्फत राष्ट्रांतील सर्व साधनसामग्रीचा युद्धोपयोगी साहित्य निर्मिण्याकडे उपयोग करितें. या मंडळामार्फतच दोस्त राष्ट्रांच्या युद्धप्रयत्नांशीं आपल्या प्रयत्नांचा समन्वय साधतें. शांतताकाळांत देशांतील सर्व कारखानदारी उपभोग्य वस्तू निर्मिण्याकडे गुंतलेली असते, व युद्धोपयोगी साहित्य निर्मिणारी कारखानदारी बहुधा सरकारी मालकीची किंवा सरकारी नियंत्रणाखालीं असते. युद्धकाळांत एवढ्या कारखान्यांकडून जरूर तेवढ्या युद्धसाहित्याचा पुरवठा होणार नाहीं. म्हणून मोटारगाड्या, विमानें बनविणाऱ्या कारखान्यांचें रूपांतर युद्धोपयोगी जीपगाड्या, टँक्स, जेट–विमानें निर्मिणाऱ्या कारखान्यांत करण्यांत येतें. कापड–गिरण्यांचें शांतताकाळांतील उत्पादन कमींतकमी गरजेइतकें मर्यादित करून सैनिकांस जरूर तें कापड निर्मिण्याकडे त्या उत्पादनाचा ओघ वळविला जातो. नागरिकांना आपल्या शांतताकाळांतील गरजा अगदीं कमी करून, कमींत कमी वस्तूंवर जीवन कंठावें लागतें. एवढें झाल्यावर युद्धोपयोगी साहित्य भरपूर निर्माण होऊं लागतें व

जनमनाचीहि युद्धासारखी आपत्ति आल्यामुळें युद्धप्रयत्नांशीं समरस होण्याची तयारी झाल्यामुळें त्यांत भरच पडत जाते.

युद्धप्रयत्नांत सर्व कारखानदारी गोंवूनच नुसतें भागत नाहीं, तर उपलब्ध असलेल्या सर्व मनुष्यशक्तीचा उपयोगहि करून घेणें भाग असतें. प्रत्यक्ष सैनिक म्हणून सर्व सशक्त लोकांस काम करावें लागतें, त्यामुळें कारखानदारी चालविण्या-करितां स्त्रिया, मुलें व ज्यांना शक्य आहे अशा पेन्शनरांचाहि उपयोग करून घेणें भाग पडतें. कामाचे तास वाढवून व सुट्या कमी करून अपुऱ्या मनुष्य-शक्तीचा युद्धोत्पादनाकडे उपयोग करून घेतला जातो. सुटींत घरीं परतलेल्या किंवा प्रत्यक्ष रणांगणावर न गेलेल्या सैनिकांसहि कारखान्यांत काम करून उत्पादन वाढवावें लागतें.

अर्थात् हें सारें नुसत्या प्रचारानें होईल असें जर कोणी मानील तर त्यास मनुष्यस्वभावाचें ज्ञान कमी आहे असें म्हणावें लागेल. समाजांत बहुसंख्य व्यक्ती जरी चांगल्या विचाराच्या व राष्ट्राभिमानी असतात; तरी कांहीं थोडे मानवराक्षस असतातच. रात्रीच्या अंधाराचा फायदा घेऊन किंवा आडरानांत रेलगाडीस अपघात झाल्याचें पाहून हतबलास लुटणारे कांहीं नराधम असतातच कीं नाहीं! तसेंच नुसतें प्रचारानें लोकांच्या राष्ट्रप्रेमास आवाहन करून वरील-प्रमाणें एकसूत्री युद्धप्रयत्न करतां येणार नाहीं. त्याकरितां जे बऱ्या बोलानें सैन्यांत दाखल न होतील किंवा आंखून दिलेलें काम करण्यांत जे कुचराई करतील, त्यांना वठणीवर आणण्याकरितां युद्धमंडळास आपल्या हातीं असलेल्या सर्व अधिकारांचा उपयोग करून सक्तीची सैन्यभरती, कारखान्यांवर नियंत्रण इत्यादि गोष्टी निश्चित योजना आंखून कराव्या लागतातच.

**४. पैशाची तरतूद—करवाढ, कर्जें, चलनवाढ, नियंत्रणें, इतर मार्ग**—एवढा सारा खटाटोप करावयाचा म्हणजे सरकारास किती अफाट पैसा लागेल याची नुसती कल्पनाच केलेली बरी! एवढा गडगंज पैसा सरकार आणतें कोठून? या बाबतींत प्रथमच एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, युद्धासारख्या भयंकर आपत्तीनें सामान्य माणसाच्या हें आपलें घर, हा माझा पैसा, या संपत्ति-विषयक भावना शांतताकाळाइतक्या तीव्र नसतात. कारण बॉंबफेकीनें किंवा प्रत्यक्ष शत्रुस्वारीनें कोणत्या वेळीं घराची राखरांगोळी व पैशाची धूळधाण

होईल याचा नेम नसतो. त्यामुळें सर्व राष्ट्रांतील साधनसामग्री एकत्र करून, सर्वांस जरूर तेवढ्या प्रमाणांत अन्नधान्य, कपडा व आसऱ्याचीं साधनें मिळतील अशी व्यवस्था करून, बाकी सारी युद्धाप्रीत्यर्थ उपयोगी आणणें एवढेंच सरकारचें कर्तव्य असतें. याचा अर्थ राष्ट्राची सारी संपत्ति सरकारी मालकीची होते असा मात्र नव्हे. आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाल्यामुळें उपलब्ध साधनसामग्री सरकारला जरूर त्या तऱ्हेनें उपयोगांत आणतां येते. अर्थात् सरकारला युद्ध-प्रयत्नाकरितां ज्या गोष्टी लागतात, त्या सर्व तें पैसा देऊनच विकत घेतें. हा पैसा सरकार कसा उभारतें, हा प्रश्न मात्र मनोवेधक आहे. युद्धप्रयत्नाकरितां हवा असलेला पैसा सरकार 'युद्ध, व प्रेम जिंकण्याकरितां कोणताहि मार्ग शिष्टसंमतच' ( Everything is fair in love and war ) या न्यायानें सुचेल त्या सुष्ट-दुष्ट मार्गानें उभा करतें.

पहिला आणि सहजासहजीं सुचणारा मार्ग म्हणजे अस्तित्वांत असलेल्या प्राप्तिकराच्या किंवा विक्रीकराच्या दरांत युद्धकाळापुरती वाढ करणें हा होय. पण पैसा एवढा लागतो कीं, ह्या राजमान्य मार्गाचा फारसा उपयोग होत नाहीं. दुसऱ्या महायुद्धापूर्वीं ब्रिटनचें वार्षिक अंदाजपत्रक १००० दशलक्ष पौंडांचें होतें (१००० दशलक्ष पौंड = १३०० कोट रुपये अंदाजें) तेंच युद्धाच्या पहिल्या वर्षांतच तें ५००० दश लक्ष पौंडांचें झालें. पुढें पुढें हा खर्च आणखीहि पुष्कळ वाढत गेला. तेव्हां नुसत्या करवाढीनें हा प्रश्न सुटणार नाहीं, हें उघड आहे.

याच्या जोडीस कर्ज उभारून खर्च भागविणें हा एक दुसरा शिष्टसंमत मार्ग आहे. युद्धकाळांत खाजगी व्यक्तींचा खर्च कमींत कमी होतो, व सारा खर्च करण्याचा मक्ता सरकारकडेच येतो. त्यामुळें जरुरीपुरत्या गरजांवर पैसा खर्च केल्यावर जो पैसा खाजगी व्यक्तीजवळ राहील, तो सारा बँकांमार्फत किंवा प्रत्यक्ष कर्जे उभारून सरकारी तिजोरींत खेंचला जातो.

एवढें करूनहि सरकारच्या साऱ्या गरजा भागूं शकत नाहींत. त्याकरितां सरकार आपल्या वचनचिठ्यांच्या जोरावर मध्यवर्ती बँकेमार्फत जादा नोटा छापतें, व अशा रीतीनें सरकारला विनाव्याज बरीचशी रक्कम वापरण्यास मिळते. पण याचा परिणाम मात्र प्रत्यक्षांत सरकारच्या हातांत जादा खर्च करण्याचें साधन निर्मिण्यांत होतो. सरकारलाहि अशा कृत्रिम तऱ्हेनें जादा पैसा निर्मितां आला तर

हवाच असतो. अवाढव्य खर्चानें त्याचे हात तंग झालेले असतात, त्यामुळें या मार्गानें पैसा मिळाला तर तो एक अकल्पित ठेवाच मिळाल्याप्रमाणें होतें. या तिसऱ्या मार्गानें सरकार पैसा जमा करतें. पण हा मार्ग दुधारी शस्त्राप्रमाणें आहे. जोंपर्यंत अन्न-वस्त्र अशा वस्तूंच्या किंमतीवर व वांटपावर कडक नियंत्रण असतें, तोंपर्यंत या जादा चलनवाढीचा परिणाम फारसा जाणवत नाहीं. या वस्तू जर का नाहीं नियंत्रित केल्या, तर जादा सरकारी खर्चामुळें नागरिकांच्या हातांत खेळणाऱ्या पैशांत वृद्धि होते, व त्यामुळें उपलब्ध वस्तूंच्या पुरवठयांत मात्र फरक होत नाहीं. याचा परिणाम त्या वस्तूंच्या किंमती वाढण्यांत होतो. तेव्हां जादा निर्मिलेला हा पैसा पुन्हा बँकांत येऊन त्याचा सरकारला उपयोग होण्याऐवजीं, आहे त्या वस्तु खरिदण्यांतच तो खर्च होऊन जातो. समजा, सन १९३९ सालीं १०० चलन होतें व त्यावेळीं तेवढयांत १०० वस्तू मिळत. युद्धकाळांत म्हणजे सन १९४२ सालीं उपभोग्य वस्तू कमी झाल्यामुळें त्या समजा, ६० मिळूं लागल्या. या वस्तूंच्या किंमतीवर जर नियंत्रण नसेल तर ६० वस्तू खरिदण्यांतच १०० चलन खर्च होऊन जाईल. पण तेंच जर वस्तूंच्या किंमतीवर कडक नियंत्रण राहील तर ४० चलन जनतेच्या हातांत जादा राहील. त्यांपैकीं सरकारनें जादा करवाढीनें जरी १० आपल्या तिजोरींत जमा केलें तरी ३० शिल्लक राहातें. अर्थातच नागरिक ह्यांपैकीं कांहीं उदा० १० सरकारला कर्ज म्हणून देईल व बाकी २० बँकेंत जमा करील. हें शेवटीं मध्यवर्ती बँकेंत जमा होईल. ह्याच्या जोरावर ती बँक ५० पर्यंत जादा चलन छापूं शकेल. बँकांच्या कामाच्या अनुभवावरून मध्यवर्ती बँक आपल्याजवळ असलेल्या तारणाच्या २॥ ते ३ पटीपर्यंत चलन जादा छापूं शकते. याचा अर्थ देशांतील चलन १५० होतें. वस्तूंस लागणारें चलन ६० च राहातें, म्हणजे ९० पर्यंत चलन सरकारला जादा खर्चायला मिळतें. अशा पद्धतींत धोका एवढाच असतो कीं, पेंचांत सांपडलेल्या सरकारच्या मनावरील तोल सुटतो व कांहींतरी ठेवी निर्माण करून सरकार जादा नोटा छापूं लागतें. याकरितां जनता व सरकार या दोघांनींहि जागरूक राहून मनावरील ताबा ढळूं देतां कामा नये. तसा सोडला तर कम्युनिस्ट चीनमध्यें झालेल्या चलनवाढीप्रमाणें वाढ होईल, मग त्याचे काय दुष्परिणाम होतात हा इतिहास ताजा आहे. सरकारनें जर कडक नियंत्रण ठेवलें

तर युद्धकाळापुरता तरी चलनवाढीचा नागरिकांच्या दैनंदिन जीवनावर फारसा परिणाम होत नाहीं. कारण त्या विशिष्ट परिस्थितीमुळें त्यांचा कितीहि पैसा बँकेंत सांठला तरी त्यांना तो काढून खर्च करणें शक्य नसतें. पण पुन्हां शांतताकाळांत उपभोग्य वस्तूंच्या तऱ्हा व पुरवठा वाढतो, त्यामुळें नागरिक सांठविलेला पैसा बाहेर काढूं लागतात. याचा परिणाम वस्तूंच्या किंमती वाढविण्यांत होतो. तेव्हां पुन्हां युद्धपूर्वकाळांतील स्थिति येण्याकरितां सरकारला अन्न व कापड यांसारख्या वस्तूंच्या किंमतीवर नियंत्रण ठेवावेंच लागतें. नाहींतर मध्यम व खालच्या वर्गास अकल्पित कष्ट सोसावे लागतील. बँकांत जो पैसा सांठला जातो त्यापैकीं या वर्गाचा फार कमी असतो. बराचसा पैसा श्रीमंत वर्गाचाच असतो. ज्या मध्यम व खालच्या वर्गाच्या साहाय्याच्या जोरावर सरकारनें लढाई लढवावयाची त्याच वर्गास युद्धोत्तर काळांत आपदावस्था भोगावी लागेल. लोकशाही राजवटींत या वर्गाच्या हातांत बहुसंख्य मतें असल्यानें, या वर्गाचे हाल करील असें सरकार अस्तित्वांतच येऊं शकणार नाहीं. याकरितां थोडा काळ असें नियंत्रण ठेवल्यावर पुन्हां ५।१० वर्षांच्या अवधींत पूर्वस्थिति येईल व मग चलनवाढीचे दुष्परिणामहि भोगावे लागणार नाहींत. युद्धोत्तर काळांत बँकांतून नागरिक पैसा बाहेर काढीत असल्यानें, जादा नोटांचें तारण कमी होतें व त्यामुळें आपोआपच मध्यवर्ती बँकेस व्यवहारांतील जादा चलन कमी करण्यास साधन मिळतें.

सर्व परिस्थितीचें निदान अचूक करून वरीलप्रमाणें जर चलनाच्या बाबतींत धोरण अंगिकारिलें तर युद्ध आलें व गेलें तरी जनतेस तें फारसें तापदायक वाटणार नाहीं. याचा अर्थ युद्ध जनतेस हवें असतें किंवा तें आलें न आलें तर त्याचा जनतेस विधिनिषेध नसतो, असा मात्र करावयाचा नाहीं. ती एक महा आपत्ति आहे व टाळूनहि टळत नाहीं असें एकदां ठरल्यावर कमींत कमी त्रास कोणत्या धोरणानें होईल, एवढाच विचार येथें प्रस्तुत आहे.

पण अशा तऱ्हेचें धोरण अंगिकारिलें जातेंच असें नाहीं. युद्ध येईल कीं नाहीं, आलें तर तें किती काळ चालेल; कोणतीं राष्ट्रें मित्र बनतील, कोणतीं शत्रु बनतील; परदेशांतून कोणता माल मागवितां येईल, कोणता येणार नाहीं; स्वदेशांतील लोक खाजगी इस्टेटी व मालकीच्या बाबतींत कितपत दुराग्रही राहतील; या सर्व गोष्टींचा अंदाज सरकारला बांधतां न आल्यानें, तें युद्धकाळांत कोणतें

धोरण निश्चित स्वीकारावें याबाबत निर्णय घेण्यास विलंब लावतें. त्यामुळें असा निर्णय घेण्याच्या कालापर्यंत मध्यंतरीं वस्तूंच्या किंमती मागणी व पुरवठा ह्या न्यायानें वाढत जातात. त्या वाढूं नयेत म्हणून किंमतीवर नियंत्रणें घातलीं जातात, पण वांटपावर नियंत्रण नसल्यानें वस्तूंच्या पुरवठ्याच्या अपुरेपणामुळें काळाबाजार सुरू होतो. वांटपावर नियंत्रण घालीपर्यंत किंमती वाढलेल्या असतात. म्हणून नियंत्रित किंमतीहि वाढवाव्या लागतात. अशा ह्या दुष्ट वर्तुळांत वांटप व किंमती सांपडतात. दुसऱ्या महायुद्धाच्या अनुभवावरून जर पुन्हां तिसरें महायुद्ध,–" शांतं पापम् ! " सुरू झालें तर आतां सरकार चलन व नियंत्रण या बाबतींत वरीलप्रमाणें धोरण स्वीकारील यांत संदेह वाटत नाहीं. जें सरकार तसें करणार नाहीं तें सरकार नालायक समजावें लागेल.

या तीन मार्गांशिवाय सरकार देणगी, लॉटरी, परदेशांपासून उधार-उसनवार पद्धतीनें माल आणणें या व तत्सम मार्गांनीं पैसा जमा करतें.

**५. खरा युद्धप्रयत्न म्हणजे काय ?**—युद्धासारखी आपत्ति ही ज्या त्या राष्ट्रांतील नागरिकांचे राष्ट्रीय गुण प्रखरतेनें दृग्गोचर करण्याचा निकष ठरते. ज्या राष्ट्रांत सहकार्य, शिस्त, उद्योगप्रियता, परमतसहिष्णुता व शेजारधर्म या गुणांस महत्त्व दिलें जातें, तेंच राष्ट्र अशा जीवन-मरणाच्या लढ्यांतदेखील सहीसलामत बाहेर पडून, पुन्हां लढ्यांत झालेली अपरंपार हानी भरून काढण्यास कटिबद्ध होऊं शकतें. याबरोबरच अशी आपत्ति लोकांत वरील गुण रुजण्यास मदत करिते. याकरितांच जेव्हां जेव्हां राष्ट्रावर अशाच तऱ्हेचें दुसरें संकट येतें; तेव्हां तेव्हां राष्ट्रीय पुढारी लोकांना युद्धकाळाप्रमाणें अविरत व संघशक्तीनें परिश्रम करण्यास आवाहन करतात. हिंदमध्यें अन्नोत्पादन वाढविण्याकरितां युद्ध-भूमिकेवरून परिश्रम करण्याची पं. नेहरूंनीं सन १९४९ मध्यें घोषणा केली होती, ती याकरितांच. पण अशी घोषणा करण्यापलीकडे सरकारनें याबाबत काय हालचाल केली ? सरकारची सारी यंत्रणा, सारा पैसा याच एका कारणासाठीं गुंतणें आवश्यक होतें; पण अति जरूर नसलेल्या वस्तूंची आयात चालूच होती. लहान-मोठ्या धरणयोजना प्रत्यक्ष हातीं घेण्याच्याऐवजीं त्यांचे कागदी घोडेच नाचत होते व निरर्थक अशा तोंडपाटीलकीच्या 'अधिक धान्य पिकवा' या मोहिमेवर सर्व राज्यसरकारें यथेच्छ पैशाचा विनियोग करीत होतीं. मध्यवर्ती

सरकारचें युद्धनियोजनमंडळाप्रमाणें अन्न-नियोजन-मंडळ नव्हतें. त्यामुळें मध्य व राज्यसरकारांच्या अन्नधान्यवाढ–योजनेंत व वांटपांत एकसूत्रीपणा आणणें शक्य नव्हतें. तात्पर्य, युद्धप्रयत्न म्हणजे अव्यग्र चित्तानें राष्ट्रानें आपले श्रम व अर्थ ( पैसा ) युद्ध या एकमेव कार्यासाठीं कारणीं लावणें, या समीकरणाची जाणीव कोणालाहि झालेली नव्हती. जणूं काय शत्रूच्या वेढ्यांत सांपडलेलें शहर जसें सर्व शहरवासी म्हणजे एका कुटुंबांतील लोक या कल्पनेनें आपपरभाव न ठेवतां उपलब्ध साधनसामग्रीचा वापर करून शत्रूवर तुटून पडून लढवितात, अशा भावनेनें जेव्हां राष्ट्रांतील नागरिक युद्ध किंवा तत्सम आपत्तीस तोंड देतील तेव्हांच तो खरा युद्धप्रयत्न !



# प्रकरण २२ वें

# घटकांचा अर्थव्यवहार

**१. एकतंत्री व संघराज्य स्वरूपाची राज्यघटना**—२६ जानेवारी १९५० ला अंमलांत आलेल्या हिंदच्या घटनेअन्वयें हिंद किंवा भारत यास हिंदी संघराज्य ( Indian Union ) असें संबोधिलें आहे. राष्ट्राची घटना दोन प्रकारची असूं शकते. एक संघराज्याच्या ( Federal ) स्वरूपाची व दुसरी एकतंत्री ( unitary ). संघराज्याच्या स्वरूपाच्या घटनेंत एका भौगोलिक मर्यादेंतील स्वायत्त घटक सर्वांच्या समानहिताच्या भूमिकेवरून एकत्र आलेले असतात. हीं घटक राज्यें सामान्यतः संघराज्यास संरक्षण, परराष्ट्रसंबंध, संघराज्यांतील दळणवळणाचे मार्ग व आयातनिर्यातीवरील निर्बंधाचे अधिकार, या बाबतींत संपूर्ण अधिकार देतात व बाकीच्या बाबतींत स्वायत्त असतात. अशा तऱ्हेचीं संघराज्यें अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें ( U. S. A. ), कॅनडा, ऑस्ट्रेलिया, सोव्हिएट रशिया इत्यादि देशांत अस्तित्वांत आहेत. एकतंत्री राज्यपद्धतींत असे स्वायत्त घटक नसतात. तथापि तेथेंहि राज्यकारभाराच्या सोयीच्या दृष्टीनें स्थानिक बाबी, उदा०, रस्ते, शहरसफाई, दवाखाने, इत्यादि बाबी नगरपालिका अगर स्थानिक-मंडळें यांकडे सोंपविलेल्या असतात. संघराज्यांत प्रांतिक सरकारें हा एक घटक जादा असतो.

हिंद अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांप्रमाणें ( U. S. A. ) संघराज्य नाहीं. कारण यु. एस्. ए. मधील मध्यवर्ति सरकारापेक्षां हिंदमधील मध्यवर्ति सरकारास जादा अधिकार आहेत. युद्धकाळांत आणीबाणीची परिस्थिति जाहीर करून यु. एस्. ए. सारखीं संघराज्येंदेखील एकतंत्री बनतात. अशा परिस्थितींत घटक राज्यांवर मध्यवर्ति सरकार पूर्ण नियंत्रण ठेवूं शकतें. हिंदच्या भौगोलिक मर्यादाच एवढ्या विस्तीर्ण आहेत कीं, हें राष्ट्र मनांत आणलें तरी अगदीं एकतंत्री होऊं शकत नाहीं. राज्यकारभाराच्या सोयीच्या दृष्टीनें कमीअधिक अधिकाराचे प्रांतिक घटक हवेच आहेत. याच भूमिकेवरून हिंदची घटना बनविलेली आहे, संघराज्याच्या भूमिकेवरून नव्हे.

घटकांच्या अर्थव्यवहारांच्या विवेचनांत संघराज्यस्वरूपाच्या किंवा एकतंत्री स्वरूपाच्या राज्यघटनेनें मूलभूत असा कांहीं फरक होत नाहीं. जो कांहीं फरक होतो तो तत्त्वांत नसून तपशिलांत होतो.

हिंदमधील घटकांच्या सध्यांच्या करानें पैसा उभारण्याच्या अधिकाराचें व त्यांना मध्यवर्ति सरकाराकडून मिळणाऱ्या मदतीचें व त्यांच्या खर्चाच्या बाबींचें यथार्थ ज्ञान होण्यास या सर्वांच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीची सम्यक् कल्पना असली पाहिजे. आधुनिक लोकशाहीची कल्पना इंग्रजी राज्यापासूनच हिंदुस्थानांत प्रसृत झालेली आहे. त्यामुळें ह्या ऐतिहासिक पार्श्वभूमीचें समालोचन करतांना विषयाचें तें ज्ञान होण्यास त्या काळाच्या पूर्वीचें विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं.

**२. हिंदमधील घटकांच्या अधिकारांचा इतिहास**–इ. स. १८७० पर्यंत मध्यवर्ति सरकार प्रांतिक सरकारांस निव्वळ आपल्या मुनिमाप्रमाणें वागवी. ह्या सरकारांनीं ठिकठिकाणचा पैसा वसूल करावयाचा, तो मध्यवर्ति तिजोरींत भरावयाचा व जरूर तो पैसा मध्यवर्ति सरकाराकडून मागून घ्यावयाचा व तें सरकार सूचना देईल त्याप्रमाणें खर्च करावयाचा. इ. स. १८७० त प्रथम लॉर्ड मेयोनें प्रांतिक सरकारांस रु. ४,६८,८७,११० इतकी रक्कम तोडून दिली. त्यांतून प्रांतिक सरकारांनीं पोलीस, तुरुंग, शिक्षण, वैद्यक वगैरे खात्यांची व्यवस्था मध्य-सरकाराच्या सार्वभौमत्वाखालीं पण स्वतंत्रपणें पहावी असें ठरविलें. पुढें इ. स. १८७७ सालीं अबकारी, स्टँप, न्याय व कायदा ह्या खात्यांचा कारभार सर्वस्वी प्रांतिक सरकारांकडे सोपविण्यांत आला. इ. स. १८८२ त पूर्वीची प्रांतिक सरकारांस ठराविक रक्कम देण्याची पद्धत मागें पडली व सर्व खात्यांचे प्रांतिक, मध्यवर्ति, व प्रांतिक व मध्यवर्ति सरकारांत विभागलेलीं खातीं असे विभाग पाडण्यांत आले. त्यास दर पंचवार्षिक केलेल्या फेरबदलानंतर इ. स. १८९७ सालीं खालील स्वरूप प्राप्त झालें. कायदा, तुरुंग, पोलिस, शिक्षण, वैद्यक, किनाऱ्याची वाहातुक, कालवे, सरकारी इमारती व स्टेशनरी ह्या खात्यांच्या उत्पन्न व खर्च यांवर प्रांतिक सरकारचा पूर्ण ताबा असावा; स्टँप, जंगल, दस्तैवजनोंदणी ह्या खात्यां-वरील सर्व खर्च प्रांतिक सरकारचा व उत्पन्नांत मात्र प्रांतिक सरकारचा $\frac{3}{4}$ हिस्सा असावा व अबकारी व जमीनधारा ह्या खात्यांवरील सर्व खर्च प्रांतिक सरकारचा व उत्पन्नांत दोन्ही सरकारचा समप्रमाण हिस्सा असावा असें ठरलें. ही व्यवस्था

इ. स. १९२० च्या मॉंटफर्ड सुधारणांपर्यंत चालू होती. ह्या व्यवस्थेंत प्रांतिक सरकारच्या सनदशीर हक्काचा कांहीं एक प्रश्न नव्हता, राज्यकारभाराच्या सोयीच्या दृष्टीनेंच ती अंमलांत आणली गेली होती, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

इ. स. १९२० सालीं विलायतसरकारनें प्रांतिक सरकारांस अर्धवट स्वायत्तता देण्याचें ठरविलें. इ. स. १८९७ पासून प्रांतिक सरकारांकडे असलेल्या खात्यांत सहकारी खातें, स्थानिकस्वराज्य व दुष्काळनिवारण ह्या खात्यांची भर घालून व जमीनमहसूल, अबकारी, स्टँप वगैरे खात्यांतील उत्पन्नाचा मध्यवर्ति सरकारचा हिस्सा बंद करून ह्या सर्व खात्यांची पूर्ण मुखत्यारीनें व्यवस्था पहाण्याची जबाबदारी प्रांतिक सरकारांकडे सोपविली. या खात्यांपैकीं कांहीं लोकनियुक्त मंत्र्यांकडे सोपविण्यांत आलीं व कांहीं प्रांतिक गव्हर्नरनें नेमलेल्या सनदी नौकरांकडे ठेवण्यांत आलीं. त्यास अनुक्रमें सोंपीव व राखीव असें नामाभिधान देण्यांत आलें. घटकांच्या अर्थव्यवहाराच्या विवेचनाच्या दृष्टीनें राखीव व सोंपीव अशा खातेंविभागणीस कांहीं महत्त्व नाहीं.

प्रांतिक सरकारास आपल्या खात्याच्या कारभाराबाबत पूर्णाधिकार जरी मिळाले, तरी स्टेशनरी विकत घेणें व सनदी नौकरांच्या हक्कांची जपणूक करणें, प्रांता-प्रांतांत कांहीं खात्यांच्या व्यवस्थेबद्दल वाद उत्पन्न झाल्यास तो मिटविणें, या बाबी मध्यवर्ति सरकारच्या कक्षेंतील असत. या सुधारणांनीं प्रांतिक सरकारांस जमीन-महसुलांत वाढ करण्याचे व करमणूककर, चैनीच्या पदार्थांवरील कर, जुगारा-वरील कर असे नवीन कर लादण्याचे अधिकार मिळाले. तसेंच प्रांतिक उत्पन्न वाढविणाऱ्या भांडवली खर्चाकरतां कर्ज काढण्याचा व तें आपआपल्या कायदे-मंडळापुढें मांडून पास करून घेण्याचा अधिकारहि प्राप्त झाला.

यायोगें प्रांतिक सरकाराकडे उत्पन्नाचीं बरींच खातीं आल्यानें मध्यवर्ति सरकारच्या बजेटांत दरसाल ९८३ लाखांची तूट येऊं लागली, त्याकरितां प्रत्येक प्रांतानें कांहीं ठराविक रक्कम मध्यवर्ति सरकारास द्यावी असें ठरविलें. त्यास मेस्टन करार असें म्हणतात. पण प्रांताच्या वाढत्या गरज़ा व मध्यवर्ति सरकारच्या जमाखर्चांतील तूट या रस्सीखेचींत व प्रत्येक प्रांताचा अचूक वांटा ठरविण्यांतील व्यावहारिक अडचणींत, प्रांतिक व मध्यवर्ति सरकारांत कटुता निर्माण झाली व शेवटीं तो इ. स. १९२८ सालांत रद्द करण्यांत आला.

ब्रिटिश पार्लमेंटनें १९३५ सालीं पास केलेल्या हिंदी राज्यकारभारविषयक कायद्यान्वयें सन १९३७ सालापासून प्रांतिक स्वायत्तता अमलांत आली. तेव्हां-पासून प्रत्येक प्रांत स्वतंत्रपणें आपलें खातें रिझर्व बँकेंत उघडून आपला दैनंदिन व्यवहार चालवूं शकतो. या कायद्यानें प्रांतास विक्रीवरील कर लादण्याचा नवा अधिकार मिळाला. तसेंच नेमियर निवाड्याप्रमाणें प्राप्तिकरांतील व ज्यूट निर्यात-करांतील वांटा संबंधीं प्रांतांना मिळाला. शिवाय मध्यवर्ति सरकार सिंध, ओरिसा, वायव्यसरहद्द प्रांत, आसाम व यू. पी. प्रांतांना जास्तींत जास्त १०० लाख व कमींत कमी २५ लाखांपर्यंत मदत म्हणून देणग्या देई. या सर्व आर्थिक फेरबदलानें प्रांतांच्या तिजोरीची परिस्थिति बरीच सुधारली.

**३. हिंदी घटनेअन्वयें अंमलांत आलेले आर्थिक संबंध—** प्रजासत्ताक हिंदच्या नवीन राज्यघटनेअन्वयें मध्यवर्ति सरकारशीं प्रांताच्या पूर्वी चालू असलेल्या आर्थिक संबंधांत फारसा बदल झालेला नाहीं. हिंदला संघ-राज्य हें नवीन नामाभिधान दिलें असल्यानें प्रांतांना ‘ राज्य ’ म्हणण्याशिवाय या संबंधांत तूर्त तरी कांहीं विशेष बदल नाहीं. पाकिस्तानच्या निर्मितीनें बंगाल, पंजाब व आसामची फाळणी झाली व सिंध व वायव्यसरहद्द प्रांत पूर्णतः पाकिस्तानांत गेले. त्यामुळें फाळणीपूर्वी प्राप्तिकरापैकीं जो ५० टक्के भाग प्रांतांना वांटून दिला जात असे, त्यांत फाळणीनें झालेल्या बदलामुळें फरक करावा लागला. हिंदच्या गव्हर्नर जनरलनें १७ मार्च १९४८ ला याबाबत एक हुकूम प्रसिद्ध करून १५ ऑगस्ट १९४७ पासून निरनिराळ्या प्रांतांचा प्राप्तिकरांतील, तसेंच ज्यूट-निर्यात-करांतील संबंधीं प्रांतांचा वांटा व निर-निराळ्या प्रांतांना त्यांच्या विशिष्ट परिस्थितीमुळें द्यावयाच्या देणग्या ठरविण्यांत आल्या. उत्तरप्रदेशाला ( पूर्वीच्या संयुक्तप्रांताला ) मध्यसरकार देत असलेली २५ लाखांची देणगी सन १९४२–४३ पासूनच बंद करण्यांत आलेली आहे.

गव्हर्नर जनरलनें काढलेला हुकूम त्याबाबत ताबडतोब कांहीं तरी ठरविलें पाहिजे म्हणूनच काढला होता. हा वांटा शास्त्रशुद्ध पायावर ठरविण्याकरितां सन १९४९ सालीं त्या वेळचे रिझर्व बँकेचे गव्हर्नर व विद्यमान अर्थमंत्रि श्री. चिंतामण देशमुख यांना नेमण्यांत आलें. त्यांनीं सर्व संबंधी प्रश्नांचा विचार

करून आपला निवाडा दिला. त्यांनीं ठरविलेल्या प्रमाणांची तुलनात्मकदृष्ट्या योग्य कल्पना यावी म्हणून तें कोष्टकरूपानें खालीं दिलें आहे.

प्राप्तिकरांतील शें. ५० टक्के सर्व 'अ' विभागीय राज्यसरकारांना विभागून द्यावयाचे, त्याचें शेंकडा वर्गवारी प्रमाण.

| राज्य | फाळणीपूर्वीचें प्रमाण | १९४८ त गव्हर्नर जनरलनें ठरविलेलें प्रमाण | श्री. देशमुख यांनीं ठरावेलेलें प्रमाण | सन १९५१-५२ सालीं राज्यांना मिळालेली प्रत्यक्ष रक्कम |
|---|---|---|---|---|
| मद्रास | १५ | १८ | १७.५ | ९.१५४२ |
| मुंबई | २० | २१ | २१ | १०.९८५१ |
| उत्तरप्रदेश | १५ | १९ | १८ | ९.४१५८ |
| पश्चिम बंगाल | २० (अविभक्त बंगालचा वांटा) | १२ | १३.५ | ७.०६१८ |
| बिहार | १० | १३ | १२.५ | ६.५३८८ |
| मध्यप्रदेश | ५ | ६ | ६ | ३.१३८६ |
| आसाम | २ | ३ | ३ | १.५६९३ |
| पूर्व पंजाब | ८ (अविभक्त पंजाबचा वांटा) | ५ | ५.५ | २.८७७१ |
| ओरिसा | २ | ३ | ३ | १.५६९३ |
| सिंध | ३ | ... | ... | ... |
| | १०० | १०० | १०० | ५२.३१ |

प्रातिकरावर जर मध्यसरकारनें सरचार्ज आकारला तर त्यांतील वांटा मात्र राज्यसरकारांस मिळणार नाहीं. सन १९५०–५१ सालीं सर्व 'अ' विभागीय राज्यसरकारांमध्यें ५०·९७ कोटी रु. प्रातिकराचा राज्यांचा वांटा म्हणून वांटण्यांत आले.

## ज्यूट निर्यातकरांतील वांटा.

| राज्य | फाळणीपूर्वीचें प्रमाण | फाळणीनंतरचें प्रमाण | १९५०च्या घटना-कायद्याअन्वयें |
|---|---|---|---|
| पश्चिम बंगाल | (निमियर निवडया-प्रमाणें) | | १०५ लक्ष रुपये |
| आसाम | | | ४० ,, |
| बिहार | ६२½ टक्के | २० टक्के | ३५ ,, |
| ओरिसा | | | ५ ,, |

| राज्य | फाळणीपूर्वी | राज्यसरकारांस मदत फाळणीनंतर |
|---|---|---|
| आसाम | ३० लाख | ३० लाख |
| ओरिसा | ४० ,, | ४० ,, |

**४. हिंदचे राजकीय विभाग व त्यांचे मध्यसरकारशीं संबंध**— हिंदच्या स्वातंत्र्यप्राप्तीनंतर, पूर्वीच्या संस्थानी मुलुखांतील कांहीं भाग शेजारच्या प्रांतांत विलीन झाला, कांहीं संस्थानांचीं संवराज्यें झालीं, व कांहींना स्वतंत्र घटक म्हणून मानण्यांत आलें. पूर्वीच्या प्रांतांसुद्धां हिंदच्या राज्यघटनेअन्वयें खालील गट कल्पिले आहेत.

'अ' विभाग. (१) आसाम (२) बिहार (३) मुंबई (४) मध्यप्रदेश (५) मद्रास (६) ओरिसा (७) पूर्व पंजाब (८) उत्तरप्रदेश व (९) पश्चिम बंगाल.

'ब' विभाग. (१) हैद्राबाद (२) जम्मू आणि काश्मीर (३) मध्यभारत (४) म्हैसूर (५) पतियाळा आणि पूर्वपंजाब संस्थानें (६) राजस्थान (७) सौराष्ट्र (८) त्रावणकोर व कोचीन.

'क' विभाग. (१) अजमीर (२) भोपाळ (३) बिलासपूर[१] (४) कुर्ग (५) दिल्ली (६) हिमाचलप्रदेश (७) कच्छ (८) मणिपूर (९) त्रिपुरा व (१०) विंध्यप्रदेश.

'ड' विभाग. अंदमान व निकोबार बेटें.

असे चार विभाग काल्पिण्याचा हेतु एवढाच आहे कीं, पूर्वीच्या संस्थानी मुलुखांत लोकशाहीचें प्रतीक असणारीं कायदेमंडळें व त्यांस जबाबदार असणारीं सरकारें, पूर्वीच्या प्रांतांत ज्या प्रमाणांत कार्यप्रवण होतीं, त्या प्रमाणांत नसल्यानें, त्या मुलुखाचे जे नवीन गट केलेले आहेत, त्यांतील या लोकशाही संस्थांची पूर्ण वाढ होईतों त्यांवर मध्यसरकारचें जरूर तेवढें नियंत्रण असावें. या दृष्टीनें 'अ' विभागांत पूर्वीच्या प्रांतांचा समावेश केलेला आहे. नवीन घटनेअन्वयें, सर्व घटकांना प्रांताऐवजीं राज्यें म्हणण्यांत येतें. 'अ' विभागीय राज्यें हिंदी संघराज्याचे प्रधान घटक म्हणून राहातील. त्यांच्या अंतर्गत कारभारावर मध्यसरकारचें अगदीं आणीबाणीचा प्रसंग सोडून किंवा तेथील लोकशाही कोलमडून पडण्याचा प्रसंगखेरीजकरून इतर वेळीं विशेष असें नियंत्रण राहणार नाहीं.

'ब' विभागांतील राज्यें दहा वर्षांच्या संक्रमणकाळानंतर 'अ' विभागीय राज्यांच्या दर्जास येऊन पोहोंचतील असा विश्वास प्रगट केलेला आहे. या संक्रमणकाळांत या राज्यांच्या कायदेमंडळांतील कायदे व अंदाजपत्रकें मध्यसरकारास आगाऊ दाखविलीं पाहिजेत असें बंधन आहे.

---

१ 'बिलासपूर' हा विभाग 'हिमाचलप्रदेश' या विभागांत विलीन करण्याचा निर्णय मध्यसरकारनें संबंधी राज्यसरकारांच्या संमतीनें १८ ऑगस्ट १९५२ रोजीं घेतला आहे.

'क' विभागीय राज्यांस कायदेमंडळें असावींत कीं नाहीं, हें मध्यसरकारच्या इच्छेवर अवलंबून राहील. हे विभाग लहान असल्यानें बहुधा हे शेजारच्या 'अ' किंवा 'ब' विभागीय राज्यांत विलीन होतील असा फार संभव दिसतो.

'ड' विभाग प्रत्यक्ष राष्ट्राध्यक्षांच्या हुकमतीखालीं राहील.

'क' व 'ड' विभागीय राज्यांवर मध्यसरकारचें प्रत्यक्ष नियंत्रण असल्यानें, त्यांच्या सर्व आर्थिक व्यवहाराचें अंतिम उत्तरदायित्व मध्यसरकारावरच आहे. त्यामुळें मध्यसरकार, या राज्यांच्या अर्थव्यवहारावर जरूर तें नियंत्रण ठेवतें.

'अ' विभागीय' राज्यांच्या मध्यसरकारशीं असलेल्या आर्थिक संबंधाचें विवेचन वर आलेंच आहे. आतां राहतां राहिला प्रश्न 'ब' विभागीय राज्यांचा.

'ब' विभागीय म्हणजे पूर्वीचीं लहान-थोर संस्थानें. तीं संस्थानी सरकारें आपापल्या मुलुखांत जकात, प्राप्तिकर, उत्पादनकर वगैरे कर वसूल करीत. तीं आतां हिंदी संघराज्याचा भाग झालीं असल्यानें, व हिंदी संघराज्यांत राज्या-राज्यांमधील व्यापारावर कसलाहि कर आकारतां येत नसल्यानें व प्राप्तिकर, व उत्पादनकर हे मध्यवर्ति सरकारच्या कक्षेंत येत असल्यानें, त्या करांचें उत्पन्न आतां त्यांना मिळणार नाहीं. तसेंच या विभागांतील राज्यांत प्राप्तिकर हा नवीनच सुरू केला आहे. व त्यांपैकीं कांहीं राज्यें मागासलेलीं आहेत, त्यामुळें त्या करांचें उत्पन्नहि भरपूर येणार नाहीं, म्हणून मध्यसरकारनें ह्या सर्व राज्यांतील पूर्वीच्या राजेलोकांस द्यावयाचा तनखा आपल्या तिजोरींतून द्यावयाचें ठरविलें आहे. मध्यसरकारास अशी एकूण रक्कम $4\frac{1}{2}$ कोटी रु. द्यावी लागते. शिवाय हैद्राबाद, म्हैसूर, सौराष्ट्र व त्रावणकोर व कोचीन या चार राज्यांस मिळून मध्यसरकार दरसाल अदमासें १० कोट रुपये मदत म्हणून देणार आहे व मध्यभारत, पेप्सू आणि राजस्थान यांना प्राप्तिकराचा निम्मा भाग देण्यांत येणार आहे.[१]

**५. अर्थसमितीची नेमणूक**—मध्यसरकारच्या राज्य–सरकारांशीं असलेल्या अर्थसंबंधांत कालमान परिस्थित्यनुरूप फरक होत जाणें हें रास्तच आहे.

---

१. सन १९५१–५२ चे याबाबतचे दुरुस्त आंकडे अनुक्रमें ११·२४ कोटी व ३४ लक्ष रुपये असे आहेत.

यासंबंधाचा नेहमीं विचार केला जावा म्हणून राज्यघटनेंतच राष्ट्राध्यक्षानें दर पांच वर्षांनीं एक अर्थसमिति ( Finance commission ) नेमावी अशी तरतूद केली आहे. ऑक्टोबर १९५१ मध्यें श्री. क्षितीशचंद्र नियोगी यांच्या अध्यक्षतेखालीं अशी समिति नेमलेली आहे. ती या आर्थिक संबंधाचा सांगोपांग विचार करून आपला अहवाल दोन वर्षांत राष्ट्राध्यक्षास सादर करणार आहे. त्यानंतर वरील अर्थविषयक व्यवहारांत पुन्हां जरूर तो बदल करण्यांत येईल.

मध्यसरकार व राज्यसरकारें यांचे १९५१–५२ च्या अंदाजपत्रकांतील आंकडे परिशिष्ट १ मध्यें दिलेले आहेत.

**६. नगरपालिका व स्थानिक-मंडळें**—प्रांतिक घटकांच्या अर्थव्यवहाराच्या विवेचनानंतर, त्याहून मर्यादित क्षेत्रांत व मर्यादित बाबींत काम करणारे इतर घटक म्हणजे नगरपालिका, स्थानिक-मंडळें ( लोकलबोर्डें ) व ग्रामपंचायती यांच्या अर्थव्यवहाराचें त्रोटक विवेचन केल्याशिवाय घटकांच्या अर्थव्यवहाराचें विवेचन पुरें होऊं शकत नाहीं.

हिंदुस्तानांत कमीअधिक अधिकाराच्या तीन तऱ्हेच्या नगरपालिका आहेत. मुंबई, पुणें, दिल्ली, कलकत्ता, मद्रास यांसारख्या मोठमोठ्या शहरांतील नगरपालिका यांचा मुख्याधिकारी राज्यसरकारनें नेमलेला असतो. या नगरपालिकांचा कारभार व कारभाराचें एकंदर धोरण नगरपालिका ठरविते, पण प्रत्यक्ष अंमलबजावणीस हा अधिकारी जबाबदार असतो. त्याच्या या अधिकारांत ढवळाढवळ करण्याचा नगरपालिकेस अधिकार नसतो. या नगरपालिकांचें उत्पन्नहि बरेंच मोठें असतें. मुंबईचें उत्पन्न १२ कोटींचें आहे व पुण्याचें जवळ जवळ १½ कोटीचें आहे. त्यानंतर जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणच्या नगरपालिका, यांच्या कारभारावर जिल्ह्याचा कलेक्टर लक्ष ठेवतो. या शहरांपेक्षां लहान शहरांत लहान नगरपालिका असतात. यांवरहि कलेक्टरच नजर ठेवतो. या नगरपालिकांचा कारभार लोकनियुक्त मंडळामार्फत चालविला जातो.

शहराच्या बाहेर ग्रामीण विभागांतील जिल्ह्यांतील रस्ते, नद्यांवरील पूल, ग्रामीण आरोग्य या बाबींकडे पहाण्याकरतां प्रत्येक जिल्हानिहाय स्थानिक-मंडळें असतात. शहरांतील याच बाबींकडे नगरपालिका लक्ष देतात. नगरपालिकांप्रमाणें स्थानिक-मंडळाचाहि कारभार लोकनियुक्त सभासदांमार्फतच चालविला जातो.

नगरपालिकांच्या कक्षेंत प्राथमिक शिक्षण ही एक बाब स्थानिक–मंडळांपेक्षां जादा आहे. सन १९४७ पूर्वी शिक्षण स्थानिक–मंडळांच्या ताब्यांत होतें, पण त्यांच्या या बाबतींतील अनागोंदी कारभारामुळें तें त्यांचेकडून काढून घेण्यांत आलें.

प्रत्येक खेडेगांवच्या साफसफाईकडे लक्ष देण्याकरतां गांवकऱ्यांनीं निवडून दिलेल्या सभासदांची एक ग्रामपंचायत असते.

नगरपालिकांस जकात, स्थावर मालमत्तेवरील कर, धंदे व वाहनांवरील कर, सायकलकर, यात्राकर लादतां येतात. शिवाय शिक्षण, पाणीपुरवठा, वीज-पुरवठा, भंगीपट्टी वगैरे विशिष्ट सोयींकरतां स्वतंत्र कर आकारतां येतात.

स्थानिक मंडळांस शेतसाऱ्यावर दर रुपयास तीन आण्यांप्रमाणें आकारलेल्या लोकलफंडाचें मुख्य उत्पन्न असतें, तर ग्रामपंचायतीस घरपट्टीचें व यात्राकराचें मुख्य उत्पन्न असतें. शिवाय प्रांतिक सरकार या मंडळांस कांहीं नक्त रकमाहि ( Grants ) देतें. एखाद्या विशिष्ट कामाकरतां कर्ज लागल्यास हीं मंडळें कर्ज काढूं शकतात. पण त्यास प्रांतिक सरकारची आगाऊ परवानगी घ्यावी लागते. एखादे वेळीं प्रांतिक सरकार स्वतांहि या मंडळास कर्ज देतें.

या सर्व मंडळांचा कारभार जोंपर्यंत सुव्यवस्थित चाललेला असतो तोंपर्यंत प्रांतिक सरकार सर्वसाधारण सल्ला व देखरेख ठेवण्यापलीकडे जादा कांहीं पहात नाहीं. पण या कारभारांत कांहीं शिथिलपणा आढळून आल्यास किंवा पैशाच्या व्यवहारांत कांहीं गोंधळ आढळून आल्यास प्रांतिक सरकार हीं लोकनियुक्त मंडळें कांहीं काळ रद्द करतें व तेवढ्या मुदतींत या मंडळांचा कारभार आपण नेमलेल्या अधिकाऱ्यांमार्फत चालवितें.

**७. घटकांच्या अर्थव्यवहारांतील सामान्य तत्त्वें**—या प्रांतिक व इतर घटकांच्या अर्थव्यवहाराच्या धावत्या समालोचनावरून हा व्यवहार कोणत्या सामान्य तत्त्वांवर आधारला आहे हें समजण्यास सोपें जाईल.

प्रत्येक कनिष्ठ घटकाशीं वागण्याची वरिष्ठ घटकाची व मध्यसरकारची रीत सारखी हवी. मध्यसरकार निरनिराळ्या राज्यसरकारांशीं वागण्यांत किंवा प्रांतिक सरकार आपल्या आधिपत्याखालील घटकांशीं वागण्यांत पक्षपातीपणा दाखवील, तर त्यायोगें निरनिराळ्या घटकांत अप्रीति निर्माण होईल व त्याचा परिणाम राष्ट्राच्या अंतर्गत सुरक्षिततेस धोका पोंचण्यांत होईल.

तेव्हां कराचीं साधनें असोत, एखाद्या करांत वांटा असो, प्रत्यक्ष मदत असो किंवा घटकांकडून मध्यसरकार कांहीं ठराविक रक्कम घेत असो, हें सर्व विशिष्ट तत्त्वानुसार व योग्य नियमानुसार दिलें व घेतलें पाहिजे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट घटकांच्या अर्थव्यवहाराच्या बाबतींत लक्षांत ठेवावयाची म्हणजे ही कीं, जशी निरनिराळ्या घटकांवर कांहीं विशिष्ट कर्तव्यांची स्वतंत्रपणें जबाबदारी टाकावयाची, तसेंच त्या घटकांना उत्पन्नाचे मार्गहि स्वतंत्रपणें आंखून द्यावयाचे व आपलें उत्पन्न वसूल करण्याची जबाबदारीहि त्यांचेवरच सोंपवावयाची. यामुळें प्रत्येक घटकास आपलें उत्पन्न आपल्या मार्गानें वरिष्ठांचा हस्तक्षेप न होतां वाढविण्याचें व त्याचा विनियोग आपल्या कक्षेंतील प्रजाजनांचें जास्तींत जास्त कल्याण करण्याकडे करण्याचें स्वातंत्र्य राहातें. या घटकांतील लोकाग्रणींत या पद्धतीमुळें प्रत्येक गोष्टींत वरिष्ठावर अवलंबून राहाण्याच्या किंवा प्रत्येक नव्या सुधारणेबाबत त्यांचे तोंडाकडे पाहाण्याच्या वृत्तीची जोपासना न होतां, स्वतां जबाबदारीनें कांहीं तरी केलें पाहिजे अशी जाणीव सदैव जागृत राहाते. तसेंच वरिष्ठांच्या हस्तक्षेपामुळें आम्ही कांहीं करूं शकत नाहीं; असें स्वतांच्या अकार्यक्षमतेचें लंगडें समर्थन करण्यास व तसें नसतें तर आम्हीं हें केलें असतें, तें केलें असतें, अशी फुकट आत्मश्लाघा मारण्यास या लोकांस जागा राहात नाहीं. त्यामुळें सामान्य जनतेची दिशाभूल करतां येत नाहीं. घटकांचा अर्थव्यवहार सुरळीत व कार्यक्षमतेनें चालावयाचा असेल तर या गोष्टींकडे दुर्लक्ष्य करून चालणार नाहीं.

याबरोबरच प्रत्येक घटकास आपलीं कर्तव्यकर्में पार पाडण्याकरितां पुरेसा पैसा मिळविण्याचीं साधनें उपलब्ध असलीं पाहिजेत, एवढेंच नव्हे तर तीं साधनें अशीं असलीं पाहिजेत कीं, जसजशी कर्तव्यांत वाढ होईल तसतशी असा जादा खर्च भागविण्याकरितां जरूरीप्रमाणें जादा पैसा त्या साधनाकरवीं मिळवितां येईल. विशेषतः प्रांतिक सरकारवरच लोकांचें राहणीचें मान वाढेल अशा बाबींवर, म्हणजे आरोग्य, शिक्षण, यांवर खर्च करण्याची जबाबदारी असल्यानें, त्यांना नेहमींच वाढत्या उत्पन्नाची जरुरी भासणार. आपल्या घटनेंत प्रांतांना प्राप्तिकरांत व ज्यूट-निर्यातकरांत मध्यसरकारशीं सहभागी करून व मागासलेल्या

प्रांतांस मदत देण्याची मध्यसरकारावर जबाबदारी टाकून व प्रांतांना विक्री-करासारखा लवचिक कर सर्वस्वीं देऊन, या तत्त्वाचें परिपालन केलेलें आहे.

तथापि राज्यसरकारांच्या वाढत्या गरजा एवढया तरतुदीनें भागल्या जाणें अशक्य दिसतें. मध्यसरकारनें वारसाकर लादून त्यांतून आपला भांडवली खर्च भागविण्याचें ठरविलें व राज्यघटकांना प्राप्तिकरांत जादा हिस्सा दिला तर सध्यां प्रांतिक घटकांत दिसून येणारा असंतोष कमी होईल. मध्यसरकारची स्वतांची गरज भागविण्याकरितां २५००० रु. च्या पुढें उत्पन्न असणाऱ्या इसमांवर जबर सुपरटॅक्स बसविणें इष्ट ठरेल. इंग्लंड, अमेरिका आदि राष्ट्रांत हीच प्रवृत्ति दिसून येते.

जमीनधारा हा अशास्त्रीय कर आहे, असें आपण म्हटलेंच आहे. तो उत्पन्नावर ठरवून सर्वस्वीं स्थानिक-मंडळांच्या स्वाधीन केला व या मंडळांवर योग्य देखरेख ठेविली तर हीं मंडळें बरींच कार्यक्षम ठरून ग्रामीण भागांत दृश्य कार्य करून दाखवितील असा भरंवसा वाटतो.

या सर्वसामान्य तत्त्वांबरोबर कारभारविषयक ( Administrative ) सोय व करवसुलीखर्चांत काटकसर या व्यवहारी बाजूंचीदेखील या घटकांच्या अर्थव्यवहारांत दखल घेतली गेली पाहिजे. राज्यसरकारांना किंवा नगरपालिका, स्थानिकमंडळें इत्यादींना आपापलीं कर्तव्यें जबाबदारीनें, कार्यक्षमतेनें पार पाडण्याकरतां स्वतंत्ररीत्या पैसा उभारतां आला पाहिजे हें खरें, पण त्याबरोबरच सर्व राज्यविभागांत प्राप्तिकरासारखा कर सारख्याच दरानें आकारणें इष्ट आहे. याकरितांच हा कर मध्यसरकार वसूल करतें व राज्यसरकारांना त्यांतील ठराविक वांटा देतें. याच सोयीच्या दृष्टीनें स्थानिक-मंडळाचा स्थानिक कर ( Local Cess ) राज्यसरकारें वसूल करतात व तो जशाचा तसा त्या मंडळांना देऊन टाकतात. मदत म्हणून रक्कम घटकांना देण्याची पद्धतहि याच न्यायावर आधारलेली आहे.

८. **मध्यसरकारचें सार्वभौमत्व**—या अर्थव्यवहारांत एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेस येत असेल, तर ती म्हणजे मध्यसरकारचें सार्वभौमत्व. व ती इष्ट अशीच गोष्ट आहे. प्रत्येक घटक आपआपल्या क्षुद्र स्वार्थाकरितां किंवा त्या घटकांतील कांहीं महत्त्वाकांक्षी व्यक्तींच्या लहरीकरितां एकंदर राष्ट्रहिताच्या विरोधी

वर्तन करूं लागला, तर मध्यसरकार त्यास वठणीवर आणूं शकतें, याच कारणां-करितां राज्यसरकारांना मध्यसरकारच्या अनुमतीशिवाय स्वदेशांत व परराष्ट्रांत कर्जें उभारतां येत नाहींत. तसेंच राज्यसरकारच्या अनुमतीशियाय नगरपालिका किंवा स्थानिक-मंडळें यांना कर्जें उभारतां येत नाहींत. अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं, वरिष्ठ घटक निष्कारण अशी परवानगी नाकारील. बहुधा परवानगी औपचारिकच असते. जेव्हां कनिष्ठ घटकांची आर्थिक स्थिति अगदींच बिघडली असेल, त्यांचा अर्थव्यवहार नीट चालविला जात नसेल, पहिलीं काढलेलीं कर्जें योग्य वेळीं फेडलीं जात नसतील, किंवा नवीन कर्ज योग्य कारणांकरतां काढलें जात नसेल, अशाच वेळीं वरिष्ठ सरकार अशी परवानगी नाकारील. कनिष्ठ घटकांच्या चालू गाड्यांत खीळ मारण्याकरतां नव्हे, तर तो प्रगतिपथावर द्रुत गतीनें जावा म्हणून मार्गदर्शनाकरितांच हा अधिकार व्यवहारांत वापरला जाईल यांत संदेह नाहीं.

राज्यसरकार मध्यसरकारापेक्षां डोईजड होऊं नये म्हणून राजकीय दृष्टयाहि राष्ट्रीय संरक्षण, परराष्ट्रसंबंध व देशव्यापी वाहातुकीचीं साधनें, हे महत्त्वाचे विषय संपूर्णतया मध्यसरकारच्या कक्षेंत दिलेले असतात.

**९. कनिष्ठ घटकांची जरुरी**—या कारभारविषयक व सार्वभौमत्वाच्या बाबींच्या विचारांतून असा एक मूलभूत मुद्दा उत्पन्न होतो कीं, एकतंत्री राज्य-पद्धतीनें राज्यकारभारांत जास्तींत जास्त कार्यक्षमता, करवसुलींत कमींत कमी खर्च व अंतिम राष्ट्रहितसंवर्धनाची जबाबदारी मध्यसरकारकडे व कांहीं बाबींची अंमलबजावणी राज्यसरकारकडे अशा द्विदल-नियंत्रणाचा अभाव, या गोष्टी जर सहजसाध्य होतात, तर ह्या भारी खर्चाच्या, मध्य व राज्यसरकारें वेगवेगळीं असलेल्या संघराज्याच्या पद्धतीचा स्वीकार कां करावा ? हिंदसारख्या खंडप्राय देशांत लोकशाही जर पूर्णपणें रुजवावयाची असेल तर या प्रकारच्या राज्य-पद्धतीची जरुरी आहे, हेंच त्यास उत्तर आहे. मध्यसरकार आपल्या राज्यपाला-मार्फत नौकरशाहीकडून सर्व देशाचा कारभार हाकूं लागेल, तर स्थानिक लोकांस राज्यकारभारांत प्रत्यक्ष वांटा मिळत नसल्यानें, कांहीं मूठभर लोकांशिवाय लोकशाही म्हणजे काय, याची माहितीहि होणार नाहीं. जर लोकांत राज्य-कारभाराविषयीं औत्सुक्य नसेल तर त्यांच्यांत राजकीय जागृतीहि होणार नाहीं.

या सर्वांचा परिणाम देशांत हुकूमशाही प्रवृत्ति वाढण्यांत होईल. या एका राजकीय कारणाकरितां, बाकी सर्व पटणारीं आर्थिक कारणें बाजूस ठेवून, अशा राज्य-पद्धतीचा स्वीकार करावा लागतो.

याचा अर्थ आतां आहेत एवढे भाग असावेत असा मात्र नाहीं. पुष्कळ भाग असल्यानें राज्यकारभारविषयक खर्च फारच वाढत जातो. आतां एकंदर ३० भाग आहेत, त्याऐवजीं 'अ'विभागीय प्रांत व त्यांच्या जोडीस राजस्थान, म्हैसूर, हैद्राबाद व काश्मीर यांसारखे मोठे ' ब ' विभागीय घटक, किंवा हे सर्व घटक भाषावर विभागून होणारे भाग एवढेच ठेवावेत. बाकीचे शेजारच्या मोठ्या घटकांत विलीन करून टाकणेंच इष्ट.

यावर असा प्रश्न उपस्थित होतो कीं, राजकीय कारणांकरितां राज्य-सरकाराच्या अस्तित्वाची उपयुक्तता मानल्यानंतर नगरपालिका, स्थानिकमंडळें व ग्रामपंचायती या स्थानिकमंडळांची याच राजकीय उद्दिष्टाकरितां जरूर मानायची कीं काय ? कारण, ह्या लोकनियुक्त मंडळांपेक्षां राज्य-सरकारचें एतद्विषयक बाबींचें खातें अशा स्थानिकमंडळांचा कारभार अधिक कार्यक्षमतेनें पाहील. कारभारविषयक अडचण व काटकसर या दोन कारणांशिवाय या मंडळांच्या कारभारांत लोकनियुक्त सभासदांत आपल्यावरील जबाबदारीच्या जाणिवेचा अभाव, त्यांच्यांतील वैयक्तिक स्पर्धा, आपल्या कक्षेंतील सर्व ठिकाणांविषयीं सारख्या आत्मीयतेचा अभाव व गटबाजी या चतुर्दोषांमुळें कमालीची शिथिलता दिसून येते. तेव्हां लोकशाहीस मारक अशा शिक्षणाच्या शाळा असलेल्या ह्या मंडळांची अडगळ दूर करून लोकशाही यशस्वी करण्याचा यत्न करावा अशी एक बाजू मांडली जाते. या आक्षेपांतील भरीवपणा मान्य करूनहि हीं मंडळें रद्द करावीं असें म्हणवत नाहीं. लोकशाही ही जनतेंतूनच यायला पाहिजे व तेथूनच तिला पोषक द्रव्यें मिळालीं पाहिजेत. वरून लोकशाही लादण्याचा प्रयत्न झाला तर त्यास हुकूमशाही वळण लागण्याचा दाट संभव असतो. हिंदसारख्या देशांत लोकशाहीचा प्रयोग आतां कोठें सुरू झालेला आहे. अशा स्थितींत प्रथम कांहीं वावगे प्रकार होण्याचा संभव आहे. पण यांतूनच लोकशाही स्थिर पायावर उभी राहूं शकेल. अर्थात् या मंडळांच्या कारभारांत सुधारणा होण्यास कांहीं जागा नाहीं असें मात्र नाहीं. पुण्या–मुंबईसारख्या नगरपालिकांत धोरण लोकनियुक्त

सभासदांनीं ठरवावयाचें व त्याची अंमलबजावणी राज्य–सरकारास जबाबदार असलेल्या मुख्याधिकाऱ्यानें करावयाची अशी जशी या दोन महत्त्वाच्या कार्यांची विभागणी या दोन अंगांत केलेली आहे, तशी ती खालच्या मंडळांतदेखील करावी; म्हणजे मग गटबाजीस व अकार्यक्षमतेस वाव मिळणार नाही सर्व नोकरवर्ग मुख्याधिकाऱ्याच्या प्रत्यक्ष हुकमतीखालीं कार्य करतो व त्याच्या कारभारांत लोकनियुक्त सभासदांस हस्तक्षेप करण्याचा अधिकार नसतो. तेव्हां अशा मंडळांच्या बाबतींत जर कांहीं महत्त्वाचा प्रश्न असेल तर तो धोरण ठरविणारें ( Policy Making ) व अंमलबजावणी करणारें ( Executive ), या दोन खात्यांच्या विभागणीचा असून तीं मंडळें अजिबात रद्द करण्याचा नाहीं.
या घटकांच्या करपद्धतींचें वेगळें विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं. त्या पद्धति आपण चौथ्या प्रकरणांत विवेचन केलेल्या कर–कसोट्यांस धरून असल्या म्हणजे झालें. अर्थात् प्रत्यक्ष व्यवहारांत त्या तंतोतंत कर–कसोट्यांस धरूनच असतील असें म्हणतां येत नाहीं. व्यावहारिक अडचणींमुळें व ऐतिहासिक कारणांमुळें बनलेल्या जनमनाच्या विशिष्ट घडणीमुळें, आदर्श करपद्धतीपेक्षां प्रत्यक्षांतील करपद्धति थोड्याशा वेगळ्या असतील एवढेंच. प्रयत्न त्या दिशेनें असला म्हणजे ध्येय गांठणें अशक्य नाहीं. हिंदच्या नवीन घटनेस अनुसरून मध्यसरकार व राज्यसरकार यांत करांची असलेली विभागणी वर दिलीच आहे. सविस्तर माहिती करितां ती परिशिष्ट ५ मध्यें दिली आहे.



## प्रकरण २३ वें

# आर्थिक कारभार व अंदाजपत्रक

**१. आर्थिक संघटनेची जरूरी**—आतांपर्यंत आपण सरकारी आर्थिक व्यवहाराच्या सामान्य तत्त्वांचें विवेचन केलें. पण नुसतीं तत्त्वें चांगलीं असून चालत नाहीं. तीं अंमलांत आणण्यास ठराविक नियमानुसार चालणारी योग्य आर्थिक संघटनाहि अस्तित्वांत असली पाहिजे, व ती बुद्धिमान् व चारित्र्यसंपन्न अशा व्यक्तींच्या नियंत्रणाखालीं केलेल्या नियमांचें कांटेकोर पालन करून चालली पाहिजे. नाहींतर लांचलुचपत व वशिलेबाजी या दोन मोहांस सहजासहजीं बळी पडणारे मंत्री व अधिकारीवर्ग हा आर्थिक व्यवहार चालवूं लागले तर सगळाच ग्रंथ आटोपावयाचा. संबंधी लोक चारित्र्यसंपन्न असावेत असें म्हणण्याशिवाय अधिक कांहीं अर्थशास्त्रज्ञ करूं शकत नाहींत; पण संघटना कशी असावी व कोणत्या नियमानुसार चालावी याबाबत तो निश्चित विचार मांडूं शकतो. पुढारलेल्या लोकशाही राष्ट्रांत सर्वमान्य झालेल्या आर्थिक संघटनेमार्फतच ठराविक नियमानुसार हिंदुस्थानांतील सरकारी आर्थिक व्यवहार चालविला जातो.

**२. अंदाजपत्रकाचें वेळापत्रक**—मध्यवर्ति सरकार व प्रत्येक राज्य-सरकार यांचें स्वतंत्र अर्थखातें एका तज्ज्ञ चिटणिसाच्या देखरेखीखालीं काम करतें. तें खातें बाकीच्या सरकारी खात्यांच्या मदतीनें आपापल्या सरकारचें कच्चें वार्षिक अंदाजपत्रक दरवर्षी १५ जानेवारीच्या सुमारास तयार करतें. सरकारी हिशोबाचें वर्ष ता. १ एप्रिल ते ३१ मार्च असें असतें. अंदाज-पत्रकांत चालू वर्षाचे ९ महिन्यांचे ( डिसेंबर अखेरचे ) जमाखर्चाचे पक्के आंकडे व बाकी राहिलेल्या तीन महिन्यांचे अंदाजी आंकडे असे मिळून चालू वर्षाचा दुरुस्त अंदाज, मागील सालचे पक्के आंकडे, अंदाजी आंकडे दिलेले असतात. पुढील वर्षांत अर्थव्यवहाराच्या बाबतींत कोणतें

धोरण स्वीकारावयाचें, हें प्रथम मंत्रि-मंडळ ठरवितें व त्याअनुसार अर्थखात्यानें तयार केलेल्या अंदाजपत्रकांत दुरुस्त्या, वाढ व फेरबदल करून, कायदे-मंडळापुढें तें अर्थमंत्रि ठराविक दिवशीं, बहुधा फेब्रुवारीच्या ता. २१ च्या सुमारास मांडतो. कायदेमंडळांत कमींत कमी २० दिवस व जास्तींत जास्त २३ दिवस सरकारी अर्थव्यवहारावर साधकबाधक चर्चा होऊन, कायदेमंडळानें केलेल्या दुरुस्त्यांसह तें अंदाजपत्रक पास होतें. त्यास शेवटीं राज्यपालाची ३१ मार्चपूर्वी मान्यता मिळाल्यावर राज्यसरकारास एप्रिलपासून सुरू होणाऱ्या नवीन वर्षाकरितां त्या अंदाजपत्रकानुसार कर वसूल करण्यास व रक्कम खर्च करण्यास मुभा मिळते.

ही झाली अंदाजपत्रकाबाबतींतील राज्यसरकारांची रीत. जवळजवळ याच पद्धतीनें मध्यवर्ति अंदाजपत्रकहि पास केलें जातें. अंदाजपत्रक मांडण्याचें व पास होण्याचें वेळापत्रकहि राज्यसरकाराप्रमाणेंच सन १९५०-५१ सालापर्यंत अंमलांत होतें. पण सन १९५१ सालीं याबाबत नवीन केलेल्या नियमानुसार, अंदाजपत्रक मागील साल संपण्यापूर्वी व नवीन वर्ष सुरू होण्यापूर्वी म्हणजे ३१ मार्चला पास झालेंच पाहिजे असें बंधन नाहीं. तें मागील साल संपल्यावर म्हणजे ३१ मार्चनंतर एप्रिलच्या मध्याच्या सुमारास संसदेपुढें ( मध्यवर्ति विधिमंडळापुढें ) मांडलें जातें. या वेळेपावेतों गेल्या वर्षाच्या जमाखर्चाचे कच्चे आंकडे तयार असतात, म्हणून ती वेळ पुढील वर्षाचें अंदाजपत्रक मांडण्यास अधिक योग्य असें ठरविण्यांत आलें आहे. ह्या अंदाजपत्रकावर पुढें कमींत कमी २० दिवस व जास्तींत जास्त २३ दिवस चर्चा चालून तें मेअखेरपर्यंत पास झालें पाहिजे, असा दंडक घालण्यांत आला आहे. या नवीन नियमानुसार नवीन वर्षाच्या सुरवातीपासून तों तें अंदाजपत्रक पास होईतों म्हणजे एप्रिल, मे या दोन महिन्यांचा खर्च संसदेच्या संमतीशिवाय करण्याची पाळी येते. पण ब्रिटिश पार्लमेंटप्रमाणें वर्षाच्या पद्धतीवर तो केला जावा, अशी रूढि पाळण्यांत यावयाची आहे. नवीन करवाढ किंवा सवलत अर्थातच एक एप्रिलपासून अंमलांत येणार, ती तशी अंदाजपत्रक मांडल्याबरोबर १ एप्रिलपासून अंमलांत यावयाची, पण त्यांत जर संसदेनें फेरबदल केला तर त्याअनुसार रीफंड किंवा फेरवसुली करावयाची असें ठरविण्यांत आलें आहे.

**३. अर्थखात्याची जबाबदारी**—या थोडक्यांत दिलेल्या आराखड्या-वरून, मागील सालचे जमाखर्चाचे पक्के आंकडे, चालू सालचे दुरुस्त आंकडे व

पुढील सालचे अंदाजी आंकडे ठराविक नमुन्यामध्यें तयार करून देण्याचें काम मुख्यतः अर्थखात्यावर आहे, हें दिसून येतें, आणि हें साहजिकच आहे. त्या खात्याशिवाय इतरांस सरकारच्या अर्थव्यवहाराची विस्तारशः माहिती असणें अशक्य आहे. त्या खात्यानें प्रथम पूर्णपणें तपासल्याशिवाय व आपली संमति दिल्याशिवाय दुसऱ्या खात्यांस नवीन खर्चाची योजना हातांतच घेतां येत नाहीं. तसेंच चालू असलेल्या खर्चासदेखील हें खातें काटकसर करण्यास किंवा तो खर्च अजिबात बंद करण्यास सुचवूं शकतें. ह्या खात्यानें पूर्ण विचारांतीं एखादी काटकसरयोजना सुचविली किंवा नवीन योजना नामंजूर केली तर बाकीचीं खातीं कांहीं करूं शकत नाहींत. अर्थात् हें विधान मर्यादित अर्थानेंच केलेलें आहे. मंत्रिमंडळासच एखादी योजना अंमलांत आणावयाची असल्यास तें अर्थ-खात्यासच पैशाची तरतूद करण्यास सांगतें. मंत्रिमंडळ सोडलें तर इतर सर्व खात्यांत अर्थखातें कमानीच्या मधल्या चिऱ्याप्रमाणें आहे, हें दर्शविण्याचाच वरील विधानाचा हेतु आहे. नवीन करयोजनादेखील हेंच खातें सुचवितें. हें खातें प्रत्यक्ष कांहीं खर्च करीत नसल्यानें ( आपल्या नोकरांच्या पगाराशिवाय ) इतर खात्यांच्या खर्चाच्या बाबींवर परिणामकारकरीत्या नियंत्रण ठेवूं शकतें. मंजूर केलेल्या मर्यादांत काटकसरीनें खर्च होतो कीं नाहीं हें पाहण्याचें या खात्याचें प्रधान कार्य आहे. या खात्यानें तयार केलेल्या आराखड्यांत लोक-हिताच्या दृष्टीनें जरूर अशा नवीन खर्चाची, जादा करवाढ करून किंवा कर्ज काढून किंवा पूर्वीच्या कांहीं शिलकांचा उपयोग करून, तरतूद केल्यावर मंत्रिमंडळ तो कायदेमंडळापुढें त्याच्या संमतीकरितां ठेवतें. कायदेमंडळांत लोकमताचें प्रतिबिंब पुरेपूर पडत असल्यानें, लोकहिताच्या निकषावर मंत्रिमंडळाच्या पुढील वर्षाच्या कार्यक्रमाची व चालू सालच्या त्याच्या व्यवहाराची छाननी होऊन चालू सालच्या व्यवहारांत मंत्रिमंडळानें केलेल्या चुकांची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून त्याबद्दल खबरदारी घेण्याबद्दल सूचना केली जाते व पुढील सालच्या कार्यक्रमावर जरूर त्या दुरुस्त्यांसह विधिमंडळ आपलें शिक्कामोर्तब करतें.

**४. अंदाजपत्रकाचें महत्त्व**—अंदाजपत्रक म्हणजे सरकारच्या वार्षिक अर्थव्यवहाराचा मसुदा असल्यानें व अर्थव्यवहारांत सरकारचें एकंदर धोरण प्रतिबिंबित होत असल्यानें अर्थमंत्र्याच्या अंदाजपत्रकी भाषणास सर्वांत जास्त

महत्त्व असतें. मध्यवर्ति सरकारच्या अर्थमंत्र्याच्या अंदाजपत्रकी भाषणास तर राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय दृष्ट्यादेखील फारच महत्त्व असतें. राष्ट्रांतील उद्योग-धंदे, आणि व्यापारी व्यवहार यांवर नवीन करवाढीचा किंवा करांतील सवलतीचा, तसेंच आयातनिर्यात व्यापाराबद्दलच्या सरकारी धोरणाचा बराच इष्टानिष्ट परिणाम होत असतो, म्हणून देशीविदेशी व्यापारीवर्ग; नवीन करवाढीनें सामान्य नागरिकांवर जादा बोजा पडतो किंवा एखाद्या विशिष्ट धोरणानें त्याच्या दैनंदिन जीवनांत थोडेंसें समाधान निर्माण होण्याची शक्यता असते, म्हणून सामान्य नागरिक; व सरकारच्या युद्धविषयक किंवा शांतताविषयक धोरणाचें प्रतिबिंब सरकारच्या संरक्षणखात्यावरील खर्चाच्या पद्धतींत पडत असल्यानें, परराष्ट्रांतील नागरिक व सरकार; असे सारेच या अंदाजपत्रकी भाषणाबद्दल अतिशय उत्सुक असतात.

या भाषणाबरोबर प्रांतिक कायदेमंडळापुढें प्रांतिक अर्थमंत्रि ‘मुलकी जमाखर्चाचा अंदाज’ व ‘त्याचें स्पष्टीकरण’ अशीं दोन जवळजवळ १०००–११०० पूर्ण साईजच्या पानांची चोपडी सादर करतो. यावरून प्रत्येक खात्याच्या जमाखर्चाची त्या खात्यांतील विभाग-पोटविभागवार किती तपशीलवार नोंद दिली जात असेल याची कल्पना येईल. याशिवाय सरकारनें हातीं घेतलेल्या व्यापारविषयक व भांडवली खर्चविषयक कार्यक्रमाची नोंद दाखविणारें तिसरें एक २००–२५० पानांचें चोपडें त्याच वेळीं प्रसिद्ध केलें जातें. मध्यवर्ति सरकार या तीन चोपड्यांशिवाय संरक्षणखात्याच्या जमाखर्चाचें चौथें चोपडें मध्यवर्ति संसदेपुढें मांडतें. रेल्वेचें अंदाजपत्रक स्वतंत्रपणें मध्यवर्ति संसदेपुढें मांडलें जातें.

**५. विधिमंडळांचें सर्वाधिकारित्व**—हीं अंदाजपत्रकें मध्यवर्ति किंवा प्रांतिक विधिमंडळापुढें मांडण्याच्या प्रचंड व्यापारावरून हीं विधिमंडळें आपापल्या सरकारच्या खर्चावर पूर्ण नियंत्रण ठेवूं शकत असतील, अशी कोणाचीहि कल्पना होणें शक्य आहे. पण थोडेंसें तपशिलांत जातां काय दिसेल ? अध्यक्ष, राज्यपाल व कायम नौकरवर्ग यांवरच एकंदर उत्पन्नाच्या जवळ जवळ ६४ टक्के खर्च होतो. याची दखल घेऊन, सर्वसामान्यदृष्ट्या हा वर्ग नेकीनें व कार्यक्षमतेनें आपलें कर्तव्य बजावतो कीं नाहीं, हें पाहाण्याशिवाय विधिमंडळें जास्त कांहीं करूं शकत नाहींत. यानंतर कर्ज व त्यावरील व्याज याबाबतहि मंजूर

केलेल्या कर्जाचा उपयोग नीट केला कीं नाहीं, तें फेडण्याबाबत काय उपाययोजना केली जात आहे, या सर्वसामान्य चर्चेशिवाय, विधिमंडळ दुसरें काय नियंत्रण ठेवणार ? संरक्षणखात्यावरील खर्च, तांत्रिकता व राष्ट्राची सुरक्षितता या दोन कवचांनीं सुरक्षिला गेला असल्यानें, त्यावरहि मध्यवर्ति संसद् विशेष असें नियंत्रण ठेवूं शकत नाहीं. याचा अर्थ लोकशाही सरकारवरील तऱ्हेचा सारा खर्च हुकूमशहासारखा करतें असा मात्र नव्हे. त्या खर्चाच्या मूलभूत स्वरूपानेंच त्यावर सर्वसामान्य चर्चा करण्याशिवाय त्या खर्चात विधिमंडळास कपात करतां येत नाहीं, एवढाच त्याचा अर्थ आहे. हे सर्व खर्च अटळ म्हणूनच मानले जातात.

याप्रमाणें प्रांतिक व मध्यसरकारचा मिळून जवळजवळ ६४ टक्के राज्यकार-भारावर व तत्सम अनुत्पादक पण कायम खर्चावर व सर्व सरकारांच्या उत्पन्नाच्या अदमासें १८ टक्के संरक्षणखात्यावरील खर्चावर विधिमंडळें पूर्ण नियंत्रण ठेवूं शकत नाहींत.[1] मात्र याबाबतहि योग्य असलेलें सर्वसामान्य धोरण अंगिकारण्यास विधिमंडळें सरकारास भाग पाडूं शकतात. बाकीच्या खर्चावर मात्र विधिमंडळांचें पूर्ण नियंत्रण असतें.

खर्चाच्या बाबतींत अशी स्थिति आहे. पण याउलट प्रकार उत्पन्नाच्या बाबतींत आहे. सरकारी उद्योगधंदे, जंगलें व इतर तत्सम उत्पन्न सोडून बाकी कररूपानें येणारें शेंकडा ८० ते ९० टक्के उत्पन्न हें सारें विधिमंडळाच्या पूर्ण नियंत्रणाखालीं असतें. विधिमंडळांनीं उत्पन्नच मंजूर केलें नाहीं तर सरकारें खर्च कसा करणार ? यामुळें विधिमंडळांना डावलून सरकार राज्यकारभार चालवूं शकत नाहीं. ज्या त्या विधिमंडळांनीं अंदाजपत्रकें मान्य केल्यावर त्यांस प्रांताच्या राज्यपालांची व मध्यवर्ति सरकारच्या अंदाजपत्रकास राष्ट्राध्यक्षांची संमति मिळते. ही संमति औपचारिक असते. प्रांताचा घटनात्मक प्रमुख म्हणून राज्यपाल व राष्ट्राचा घटनात्मक प्रमुख म्हणून राष्ट्राध्यक्ष यांची

१. परिशिष्ट १ व ३ पहा. सन १९५१–५२ ची सर्व सरकारांची खर्चाची रक्कम रु. १०२४ कोट आहे. व त्यांतील अनुत्पादक खर्च रु. ७२८ कोटींचा आहे, व संरक्षणखर्च रु. १८१ कोटींचा आहे.

औपचारिक संमति लागते. अशी संमति मिळाल्यावर राज्यपाल किंवा राष्ट्राध्यक्ष आपापल्या 'खर्चाच्या संमत यादी' वर (Schedule of Authenticated Expenditure) सही करतात. मग सरकार त्या यादींत दर्शविलेल्यापेक्षां जादा खर्च विधिमंडळ त्या खात्यांवर करूं शकत नाहीं. जादा खर्चाची जरूर लागल्यास पुन्हां विधिमंडळाकडे जावें लागतें. अगदीं अपरिहार्य कारणांमुळें विधिमंडळाकडे जाण्यास वेळ नसल्यास सरकार संमतीविनाहि खर्च करूं शकतें. पण नंतर शक्य तितक्या लवकर विधिमंडळाची संमति घ्यावी लागते. यदाकदाचित् अशी संमति न मिळाल्यास पेंचप्रसंग निर्माण होतो. त्यावेळीं तें सरकार राजीनामा देतें व मग नवें सरकार अधिकारावर येतें. असें नवीन अधिकारावर आलेलें सरकार विधिमंडळाचा विश्वास संपादन करून अधिकारावर आलें असल्यानें, तें पूर्वीच्या खर्चास विधिमंडळाची मान्यता मिळवूं शकतें.

यू. एस्. ए. मध्यें सरकार प्रत्यक्ष विधिमंडळास जबाबदार नसल्यानें तेथें असा घटनात्मक पेंचप्रसंग निर्माण झाल्यास तेथील कॉंग्रेसच्या (विधिमंडळ) नव्या निवडणुका घेण्याखेरीज दुसरा मार्ग रहात नाहीं. पण अद्याप असा कटु अनुभव अमेरिकेंत (U. S. A.) आलेला नाहीं. लोकशाही सरकार हें जनतेच्या संमतीनें अधिकारावर आलेलें असल्यानें, तें नेहमीं जनतेचा आपल्यावरील विश्वास कमी तर होणार नाहीं ना, अशा काळजींत जनमताचा वारा कोणत्या दिशेनें वाहात आहे, याची सदैव दखल घेत काम करीत असतें. त्यामुळें अशा तऱ्हेचे पेंचप्रसंग क्वचितच निर्माण होतात. पण समजा, दैवदुर्विलासानें एखाद्या वेळीं अगदीं बेजबाबदार सरकार अधिकारावर आलें व त्यानें हवा तसा प्रांतिक तिजोरींतील पैसा खर्च केला, तर राष्ट्राध्यक्ष मध्यवर्ति मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें अशा सरकारला दूर करूं शकतो, एवढेंच नव्हे तर अशा बेजबाबदार मंत्रिमंडळाची न्यायालयीन चौकशी करून त्यांना योग्य त्या शिक्षा देऊं शकतो. प्रांतिक सरकारांऐवजीं मध्यवर्ति सरकार अशा रीतीनें वागलें, तर संसद् ठराव करून त्या सरकारच्या कारभाराची जरूर ती चौकशी करून योग्य ती शिक्षा देवविते. अमेरिकेंत (U. S. A.) देखील तेथील कॉंग्रेस अशी चौकशी करून योग्य ती शिक्षा तेथील सरकारास देऊं शकते.

हुकूमशाही राजवटींत असा पेचप्रसंग निर्माण होऊंच शकत नाहीं. हुकूमशहा अगदींच जुलूमजबरदस्तीनें वागूं लागला तर तेथें राज्यक्रांतीशिवाय दुसरा मार्गच असूं शकत नाहीं.

६. **हिशोबतपासणीची व्यवस्था**—राज्यपाल किंवा राष्ट्राध्यक्ष यांनीं संमत केलेला खर्च ठरलेल्या कारणाकरितां ठराविक नियमानुसार होतो कीं नाहीं, हें पाहाण्याचें काम हिंदच्या प्रमुख हिशोबतपासणीदाराकडे (ऑडिटर जनरलकडे) असतें. राष्ट्राध्यक्ष या अधिकाऱ्यास महामात्याच्या ( Prime Minister ) सल्ल्यानें नेमतो. एकदां नेमणूक झाल्यावर त्यावर मध्यवर्ति सरकारचें नियंत्रण नसतें, तो प्रत्यक्ष राष्ट्राध्यक्षास जबाबदार असतो. त्याचें काम मध्यवर्ति किंवा प्रांतिक सरकारच्या खर्चाचा हिशोब ठेवणें व त्याबरोबरच त्या खर्चावर देखरेख करणें, असें दुहेरी स्वरूपाचें असतें. प्रांतिक सरकारनें हिशोब पहाण्याकरितां ऑडिटर जनरल आपल्या हाताखालीं प्रत्येक प्रांतास किंवा लहान लहान प्रांतांच्या गटांस, एक एक अकाउंटंट जनरल नेमतो. ज्या त्या सरकारचे अधिकारी आपापल्या अकाउंटन्ट जनरलकडे किंवा मध्यवर्ति सरकारचे अधिकारी ऑडिटर जनरलकडे, आपल्या दैनंदिन जमाखर्चाचे तक्ते पाठवितात. असे पाठविलेले तक्ते बरोबर आहेत का, त्या तक्त्यांत दर्शाविलेला खर्च विधिमंडळानें मान्य केलेला आहे का, मान्य केला असल्यास त्यास त्या खात्याच्या योग्य अधिकाऱ्याची संमति आहे का, तशी संमति असल्यास खर्च केलेल्या रकमा ज्यांस दिल्या त्यांची पावती आहे का व तो खर्च योग्य खातीं दाखविला आहे का, हें ऑडिटर जनरल किंवा अकाउंटन्ट जनरल आपापल्या अधिकाऱ्यांच्या मदतीनें पाहतो. अगदींच किरकोळ तांत्रिक ( Procedural ) चुकांकडे तो दुर्लक्ष करतो. त्यापेक्षां थोड्या महत्त्वाच्या चुका दुरुस्त करून घेतो व महत्त्वाच्या चुकांची नोंद ठेवून विधिमंडळानें नेमलेल्या 'सरकारी हिशेबसमिती' पुढें ( Public Accounts Committee ) त्या मांडतो. ही समिति त्या चुकांची चिकित्सा करून आपला अहवाल विधिमंडळांस सादर करते. विधिमंडळ त्याची दखल घेऊन अशा चुकांची पुनरावृत्ति न होऊं देण्याची खबरदारी घेण्याबद्दल सरकारास सूचना देते. पर्यायानें सरकार आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांस अशा चुका न होऊं देण्याबद्दल समज देतें.

सरकारी खर्चाची सारी जबाबदारी ऑडिटर जनरलवर नसते, हें उघडच आहे. त्याचें काम फक्त हिशोब ठेवण्याचें व देखरेख करण्याचें. सरकारी खर्च विधिमंडळानें आंखून दिलेल्या मर्यादेंत होतो कीं नाहीं, हें पाहण्याची मुख्य जबाबदारी सरकारच्या अर्थखात्याची असते. राज्यपाल किंवा राष्ट्राध्यक्ष यांची अंदाजपत्रकास संमति मिळाल्याबरोबर अर्थखातें प्रत्येक खात्यास तपशीलवार खर्च करण्याच्या मर्यादा आंखून देतें. अंदाजपत्रकांत या मर्यादा दाखविलेल्या असतातच. पण इतक्या बारीकसारीक तपशिलाकडे लक्ष देणें विधिमंडळास शक्य नसतें. तें फक्त खातेवार मर्यादा बरोबर पाळल्या जातात कीं नाहीं एवढेंच ऑडिटर जनरल व आपल्या विधिमंडळ हिशोबी समितीमार्फत पाहतें. त्या मर्यादा तंतोतंत पाळल्या जातात कीं नाहीं व प्रसंगविशेषीं ज्या त्या खात्याच्या विनंतीवरून तपशीलांत केलेल्या फेरबदलाप्रमाणें तो खर्च केला जातो कीं नाहीं, हें ऑडिटर जनरलच्या साहाय्यानें अर्थखातें पाहतें.

प्रत्येक कनिष्ठ अधिकारी किंवा दुसरें खातें मंजूर केलेल्या रकमा, पैसा खर्च करण्याच्या सर्वमान्य तत्त्वानुसार ( Canons of financial propriety ) खर्च करतें कीं नाहीं, हें पाहण्याचेंहि काम अर्थखातें ऑडिटर जनरलच्या साहाय्यानें करतें. हीं सर्वमान्य तत्त्वें अशीं:—

( १ ) प्रत्येक सरकारी अधिकाऱ्यानें सरकारी पैसा खर्च करतांना, स्वतःचा पैसा खर्च करतांना सामान्य माणूस जी दक्षता बाळगतो, ती दक्षता घेतली पाहिजे. ( २ ) एखाद्या विशिष्ट कामाकरितां पैसा कर्जाऊ काढला असल्यास, त्याच कामाकरितां तो खर्च केला पाहिजे. ज्या कामापासून सरकारला परत उत्पन्न मिळणार नाहीं, अशा कामाकरितां पैसा कर्जाऊ काढला असेल तर कर्जाची परतफेड करण्याकरितां तावडतोब तरतूद केली पाहिजे. ( ३ ) एखादी रक्कम मंजूर करण्याचा आपला अधिकार, त्यायोगें आपला स्वतःचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष फायदा होणार नसेल तरच संबंधी अधिकाऱ्यानें तो वापरावा. ( ४ ) एखाद्या विशिष्ट व्यक्तीच्या किंवा समाजांतील एका विशिष्ट गटाच्या फायद्याकरितां सरकारी पैशाचा विनियोग करूं नये. मात्र अशी खर्च केली जाणारी रक्कम अगदींच किरकोळ असेल, किंवा ती व्यक्ति वा गट त्याबद्दल सरकारविरुद्ध दिवाणी दावा लावूं शकेल, किंवा सरकारच्या कांहीं

विशिष्ट धोरणानें किंवा तशी रूढि असल्यानें असा खर्च करण्याची आवश्यकता असेल, तर या तत्त्वांविरुद्धदेखील असा पैसा खर्च करण्यास हरकत नाहीं. ( ५ ) कांहीं विशिष्ट कारणाकरितां कोणाला कांहीं भत्ता मिळत असल्यास, तो त्या व्यक्तीस व्यक्तिगत फायद्याचा ठरणार नाहीं अशा बेतानें द्यावा.

अशा रीतीनें सरकारी खर्च बेहिशोबी व बेजबाबदार पद्धतीनें होऊं नये म्हणून खर्च करणाऱ्या अधिकाऱ्यांवर पायरीपायरीनें नियंत्रण ठेवणारी संघटना निर्माण केलेली असते. प्रत्यक्ष खर्च करणारा ज्या त्या खात्याचा जिल्हाधिकारी किंवा त्याचा मदतनीस, त्यावर नियंत्रण ठेवणारा त्या खात्याचा खातेंप्रमुख, त्यावर अर्थखातें, ऑडिटर जनरलच्या संघटनेच्या साहाय्यानें आपलें लक्ष ठेवतें. ऑडिटर जनरलची संघटना अर्थखात्याच्या सर्व चुका व इतर खात्यांच्या सामान्य स्वरूपांत वारंवार दिसून येणाऱ्या चुका व ढोबळ चुका, याबाबत अहवाल तयार करून विधिमंडळ-हिशोबसमितीपुढें ठेवतें. या समितीचा अहवाल विधिमंडळ स्वतः पाहून सरकारास व त्याचेमार्फत त्याचे हाताखालच्या अधिकाऱ्यांस सूचना देतें. स्वतःच बेजबाबदारपणें वागल्यास शेवटीं विधिमंडळ त्या सरकारची न्यायालयीन चौकशी ( Impeachment ) करून त्याला योग्य ती शिक्षा देतें.

अशा रीतीनें सरकारी अर्थव्यवहाराच्या कारभारांत बोटचेपेपणा व भोपळ-सुतीपणा राहूं नये व तो जास्तींत जास्त कार्यक्षमतेनें चालावा म्हणून तो तपशीलवार केलेल्या नियमांच्या व रूढींच्या चौकटींत बसविला आहे. याबरोबरच हेंहि लक्षांत येईल कीं, आपल्या सर्व आर्थिक कारभाराचें केंद्रीकरण केलेलें आहे. त्यामुळें त्या कारभारांत एकसूत्रीपणा येतो व तो कार्यक्षमहि होतो. अमेरिकन सरकार विधिमंडळास जबाबदार नसल्यानें विधिमंडळ तेथील सरकारच्या मार्गांत अडचणी आणूं शकतें. तशी शक्यता आपल्या कारभारांत कमी. आपल्याकडे अर्थखात्याच्या तज्ज्ञ अधिकाऱ्यांचा अनुभविक सल्ला व लोकाग्रणींचा लोकांच्या गरजांविषयींचा दृष्टिकोन या दोन्हींचा समन्वय साधतां येतो. अर्थात् प्रथमारंभींच म्हटल्याप्रमाणें तो हुषार, व्यवहारकुशल व लोकसंग्रहाची वृत्ति असलेल्या मंत्र्यांच्या हातांत असला पाहिजे, व त्याचे मदतनीस अधिकारी आपापल्या

कामांत वाकबगार व कष्टाळू असले पाहिजेत. योग्य व अधिकारी व्यक्ति व त्याच्या जोडीस पायाशुद्ध व तंत्रशुद्ध नियमांची चौकट, असा समसमां संयोग झाल्यावर, सरकारी अर्थव्यवहार एकंदर जनतेचें कल्याण हा मध्यबिंदु कल्पूनच चालविला जाईल, यांत संशय बाळगण्यास जागा कोठून राहणार !



## प्रकरण २४ वें

# उपसंहार

मागील प्रकरणांतील विवेचनावरून सरकारी आर्थिक कारभार कसा चालतो व ज्यावरून सरकारी अर्थव्यवहारांची पुढील वर्षाची रूपरेखा कळून येते, तें अंदाजपत्रक कसें तयार केलें जातें व शेवटीं तें कसें अमलांत येतें, याचें सर्वसामान्य ज्ञान कोणाहि वाचकास होईल. त्यावरून आतांपर्यंत विवेचन केलेलीं अर्थव्यवहाराचीं तत्त्वें त्या अंदाजपत्रकांत ग्रथित करतांना खर्चाची बाजू जमेपेक्षां न वाढूं देण्याबाबत किंवा ती वाढविली तर त्याचा राष्ट्राच्या आर्थिक परिस्थितीवर काय परिणाम होईल व त्याबाबत कोणतें धोरण अधिक यशस्वी होईल, याबाबतचाहि अंदाज त्यांस स्थूलमानानें बांधतां येईल. याच अंदाजाचें स्पष्ट चित्र आपण आपल्या डोळ्यांपुढें आणूं या.

**१. चांगलें अंदाजपत्रक कशास म्हणावें?**—चांगलें अंदाजपत्रक कशास म्हणावें, हें प्रथम पाहूं. म्हणजे वरील प्रश्नाचें आकलन होण्यास त्यायोगें मदत होईल. अंदाजपत्रक म्हणजे सरकारी अर्थव्यवहाराचा व त्याबरोबर राष्ट्राच्या आर्थिक स्थितीचा मागील सालचा अहवाल, चालू वर्षाचा अंदाज व पुढील सालचा कार्यक्रम ग्रथित केलेलें सरकारी पत्रक होय.[1] सरकारी अर्थव्यवहाराची व त्याचा राष्ट्राच्या आर्थिक प्रकृतीवर होणाऱ्या परिणामाची यथार्थ कल्पना येण्याकरितां या पत्रकांत सरकारी जमाखर्चाची खातेवार पूर्ण तपशिलासह माहिती दिली असली पाहिजे. एवढेंच नव्हे तर त्यावरून एकंदर अर्थव्यवहार एका विशिष्ट धोरणानें आंखला जात आहे, याची कल्पना आली पाहिजे. सरकारनें प्रथम कोणता खर्च अत्यावश्यक, कोणता अनावश्यक, कोणता कालावधीनें केला तर चालेल, ह्या सर्व बाबतींतलें आपलें धोरण निश्चित करून त्याप्रमाणें अंदाजपत्रकी

---

1. " It should be at once a report, an estimate and a proposal. "—W. F. Willoughby.–The Problem of a Budget–P. 861.

वर्षांत एकंदर किती खर्च करावयाचा व त्याकरितां लागणारा पैसा कसा गोळा करावयाचा, हें ठरविलें पाहिजे. हें ठरवितांना अर्थातच सरकारच्या उत्पन्नापेक्षां खर्च शक्यतों अधिक हेणार नाहीं याची खबरदारी घ्यावी लागेल. जर एखादे सालीं तो जास्त झालाच, तर पुढील सालच्या अंदाजपत्रकांत खर्च जमेपेक्षां कमी करण्याचें ठरवून, एका सालची तूट दुसऱ्या सालच्या शिलकेंतून भरून काढण्याची शक्यता निर्माण केली पाहिजे. प्रत्येक वर्षाचें अंदाजपत्रक समतोल पाहिजे, या म्हणण्यांत अर्थ नाहीं. तें तसें असावें असें मानलें तर मग प्रो. जॅकोब विनेरनें म्हटल्याप्रमाणें तें प्रत्येक महिन्यास, आठवड्यास व तासास कां समतोल असूं नये ?[१] एखाद्या सालास दुष्काळासारख्या आपत्तीनें खर्च वाढतो व उत्पन्न कमी होतें. या उलट एखाद्या सालास उत्तम पीकपाणी आल्यानें सर्वांस कामधंदा भरपूर मिळतो व त्यायोगें खप वाढल्यानें प्राप्तिकर, विक्रीकर यांपासून सरकारास जादा उत्पन्न मिळतें.

यावरून एका वर्षांत उत्पन्नापेक्षां जादा खर्च करावयाचा नाहीं किंवा उत्पन्नाएवढाच खर्च करावयाचा, अशी तरतूद ज्यांत केली आहे, तें समतोल अंदाजपत्रक असें चांगल्या अंदाजपत्रकाचें लक्षण, असें न समजतां, दोन किंवा अधिक वर्षांच्या गटांच्या अंदाजपत्रकांचा विचार करितां तें सतत तुटीचें असूं नये, दोन किंवा चार वर्षांच्या जमाखर्चाची तरी निदान तोंडमिळवणी व्हावी अशा धोरणानें तयार केलेलें अंदाजपत्रक तें समतोल, असें समजावयाचें असा आपल्या विवेचनाचा उद्देश आहे, हें कळून येईल. अर्थात् येथें दोन किंवा चार वर्षांचा निश्चित कालावधि घेऊन त्याप्रमाणें अंदाज़पत्रकाची रचना करावी, असें म्हणण्याचा उद्देश नाहीं. एखादें वर्षीं जरी अंदाजपत्रक समतोल नाहीं झालें तरी चालेल, पण दोन चार वर्षांच्या किंवा वेळप्रसंगीं पांचदहा वर्षांच्या कालावधीचा विचार केला असतां तें समतोल असण्याची निश्चित शक्यता अर्थमंत्र्यास वाटली पाहिजे व तशी तो विधिमंडळाची खात्री करूं शकला पाहिजे, ही दुसरी गोष्ट फार महत्त्वाची आहे. सरकारचें उत्पन्न १०० कोटींचें व खर्च १२५ कोटींचा अंदाजपत्रकांत दाखवूनदेखील जर अर्थमंत्रि तें पुढील दोन चार सालांत समतोल

1. " Why not in each month or week or hour ? "–Quoted in Hugh Dalton's " Public Finance " P. 303

होण्याची शक्यता आहे असें म्हणूं लागला, तर विधिमंडळास अशा अर्थमंत्र्याच्या अकलेची कींव करण्याशिवाय दुसरा काय उपाय उरणार ? एखाद्या वर्षाच्या अंदाजपत्रकांत जरी तूट आली तरी ती ५-१० टक्क्यांपेक्षां जादा असतां कामा नये. मात्र सरकारनें नवीन बांधकामें काढलीं किंवा ज्यांपासून सरकारच्या पुढील उत्पन्नांत भर पडणार आहे असे नवीन उद्योगधंदे काढले, असा खर्च भागविण्याकरितां सरकारनें कर्ज काढलें, तर त्यामुळेंहि अंदाजपत्रकांच्या समतोलपणास बाध येणार नाहीं, हें उघड आहे. कारण या कर्जाच्या रकमेचा विनियोग उत्पादनसाधनें वाढविण्यांत केलेला असतो. ज्याप्रमाणें एखादी खाजगी मंडळी नवीन धंदा उभारण्याकरितां शेअरभांडवलानें रक्कम जमा करते व पुढें त्या धंद्याच्या उत्पन्नांतूनच कर्ज व्याजमुद्दलासुद्धां फेडतें, तसेंच सरकार कर्ज काढून अशा तऱ्हेनें नवीन काम करतें. मुद्दा उत्पन्न होतो तो असा कीं, जर आर्थिक मंदीनें सरकारच्या उत्पन्नांत घट आली किंवा समाजोपयोगी सोयी वाढविण्याकरितां सरकारनें जादा खर्च करण्याचें ठरविलें, तर या दोन्ही प्रकारांत उत्पन्नापेक्षां खर्च जास्त होत असल्यानें, सरकारची आर्थिक स्थिति सुस्थिर पायावर राहणें अशक्य होतें, व मग अशा स्थितींत काय करावयाचें ?

**२. आर्थिक मंदी व अंदाजपत्रकाची तोंडमिळवणी**—पहिल्या प्रकारांत आर्थिक मंदीच्या योगानें उत्पादनांत घट येते, त्याबरोबर बेकारी वाढते. बेकारी वाढल्यानें मालाचा खप कमी होतो. खप कमी झाला कीं,उत्पादनकर, विक्रीकर यांसारख्या वस्तूंच्या उत्पादन व उलाढालींपासून मिळणाऱ्या करांचें उत्पन्न कमी होतें. मालाचा खप कमी झाल्याचा दुसरा असा परिणाम होतो कीं, माल उत्पादन करणारे कारखानदार व त्याचा व्यापार करणारे व्यापारी यांच्या एकंदर उत्पन्नांत घट येते. यामुळें प्राप्तिकरापासून येणाऱ्या उत्पन्नांत तूट येते. अशा तऱ्हेनें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष या दोन्ही करांपासून उत्पन्न कमी येतें. ज्या प्रमाणांत उत्पन्न कमी होतें त्या प्रमाणांत खर्च मात्र कमी होत नाहीं. नौकरांचे पगार व इतर कारभारविषयक खर्च ठराविकच असतात. सरकारला लागणाऱ्या जिनसांचे भाव उतरल्यानें या खर्चांत थोडी बचत होईल, नाहीं असें नाहीं. तसेंच मालाचा उठाव कमी झाला कीं, पैशालाहि कमी मागणी येते. यामुळें मंदीच्या काळांत व्याजाचे दर कमी होतात. अशा कमी झालेल्या दरांत जर पूर्वीचे कर्जरोखे बदलून घेतले तर सरकारी कर्जा-

वरील द्यावें लागणारें व्याजहि थोडें कमी होईल. पण एकंदर खर्चाच्या मानानें ही बचत अगदींच क्षुल्लक ठरेल. उत्पन्न कमी व खर्च कायम, अशा स्थितींत अंदाजपत्रक तुटीचें होणार यांत संशयाला जागाच नको.

यावर उपाय म्हणून नौकरांचे पगार कमी कर, मुदत भरली कीं, कर्ज कमी झालेल्या व्याजाच्या दरांत बदलून घे किंवा सक्तीनें कमी व्याजाचे दरांत त्या कर्जाचें रूपांतर करून घे, अशा सूक्तासूक्त उपायांचा अवलंब सरकार करतें. पण बुडत्याचा पाय खोलांत या न्यायानें या उपायांनीं सरकारची आर्थिक स्थिति सुधारण्याच्या ऐवजीं ती अधिकाधिक बिकट होते. सरकारी खर्च कमी झाल्यानें जनतेच्या हातांत खेळणारा पैसा आणखी कमी होतो. जनतेची संचयशक्तीहि कमी होते. जनतेजवळचा संचय कमी झाला कीं, नवीन उद्योगधंदे उभारण्यास किंवा आहेत त्यांत भर घालण्यास नवीन भांडवलाचा तुटवडा पडतो. याचा अर्थ आधींच वाढलेल्या बेकारींत आणखी भर पडते. त्याबरोबर जनतेंतील असंतोष वाढत जातो. या असंतोषानें अधिकारावरील सरकार बदलून दुसरें येईल, आणि तेंदेखील अशाच उपायांचा अवलंब करूं लागेल, तर जनता क्रांतीस तयार होते. एकंदरींत अशा उपायांनीं अनर्थपरंपरा वाढतच जाते.

या पुस्तकांत प्रथमपासून आपण जनतेचें जास्तींत जास्त कल्याण करण्याची जबाबदारी प्रत्यक्षपणें सरकारवर आहे, असें प्रतिपादिलें आहे. तेव्हां असल्या लोकशाही सरकारास वरीलप्रमाणें उपाय योजून बेकारींत भर घालण्याचा अधिकारच असूं शकत नाहीं. आपण "बेकारीनिवारण" या सतराव्या प्रकरणांत व "आर्थिक नियोजन" या अठराव्या प्रकरणांत सुचविल्याप्रमाणें सरकारनें अशा मंदीच्या स्थितींत नवीन कामधंदे काढून बेकारीचें निवारण केलें पाहिजे व जनतेच्या एकंदर ऐहिक सुखांत भर घातली पाहिजे असें म्हटलें आहे. यासाठीं पैसा जमविण्याकरितां सरकारनें आपले कर्जरोखे मध्यवर्ति बँकेमार्फत स्वतः विकत घेऊन किंवा आपल्या कर्जरोख्यांच्या तारणावर बँकेस चलनवाढ करण्यास सांगून जनतेच्या हातांतील एकंदर चलन वाढविलें पाहिजे, असेंहि त्या ठिकाणीं आपण म्हटलें आहे. याच उपायांचा अवलंब आर्थिक मंदीच्या काळांत सरकारनें करून आपल्या अंदाजपत्रकाची तोंडमिळवणी केली पाहिजे.

**३. जीवनमान वाढविणें हा अंदाजपत्रकाचा हेतु असला पाहिजे**—वर निर्देशिलेल्या दुसऱ्या प्रकारानें म्हणजे जनतेच्या ऐहिक सुखांत भर घालण्याकरितां शिक्षण, आरोग्य अशा बाबींवर जी खर्चाची वाढ होते, त्यानेंहि अंदाजपत्रकाचा समतोलपणा ढळतो. पण याकरितां हा खर्चच कमी करावा, असा साधासुधा उपाय सुचवून चालणार नाहीं. आपलें गृहीतकृत्य असें आहे कीं, समाजाचें जास्तींत जास्त सुख हा मध्यबिंदु कल्पून, सरकारच्या अर्थव्यवहाराची आंखणी झाली पाहिजे. अशा स्थितींत असा खर्च करूं नये असें आपण म्हणूं शकत नाहीं. हा खर्च भागविण्याकरितां सरकारनें पैशाची जरूर त्या उपायांनीं तरतूद केली पाहिजे, असेंच वरील गृहीतकृत्य मान्य केल्यावर कोणीहि म्हणणार.

याबाबतहि या पुस्तकांत आपण ठिकठिकाणीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, सरकारनें जास्तींत जास्त कर लादून वरच्या वर्गाच्या हातांतील पैसा आपल्याकडे खेंचला पाहिजे व जरूर तर चलनवाढहि केली पाहिजे. सरकारचें ध्येय व प्रत्यक्ष प्रयत्न जनताकल्याण करण्याच्या दृष्टीनें असले म्हणजे जादा करवाढीस विरोध असण्याचें कारण नाहीं, व जादा चलनवाढीचे दुष्परिणामहि होण्याचा संभव नाहीं. जादा पण नियंत्रित चलनवाढ हें लोकशाहीचें जुळें भावंड आहे असें १३ व्या प्रकरणांत सप्रमाण प्रतिपादन केलेलें आहे.

**४. राज्ययंत्र कार्यक्षम हवें**—पण या साऱ्या गोष्टी प्रत्यक्षांत आणावयाच्या म्हणजे साधी बाब नव्हे. याकरितां समाजाची शैक्षणिक व नैतिक पातळी उंचावली पाहिजे. शैक्षणिक पातळी वाढवावयाची तर सर्व जनता नुसती साक्षर करूनच भागणार नाहीं, तर आम जनतेस, समाज, राज्यघटना व ती समाजहिताकरितां राबविण्याचे मार्ग व सरकारचा अर्थव्यवहार या गोष्टींचें सामान्य ज्ञान हें सर्व अति आवश्यक आहे. आपण अमक्या तऱ्हेनें आपली वागणूक ठेवली तर आपणांस अमका फायदा होईल, याची स्पष्ट कल्पना अशा शिक्षणाशिवाय येणार नाहीं. नुसते "सत्यं वद, धर्मं चर" या नैतिक बोधामृतानें भागणार नाहीं. "ज्ञानबा–तुकाराम" असा साऱ्या रस्त्यानें जयघोष करीत दरमहा पंढरीला जाणारा वारकरी स्वतःच्या क्षुद्र स्वार्थाकरितां आपल्या भावाचा किंवा शेजाऱ्याचा केसानें गळा कापण्यास कमी करीत नाहीं. याकरितां

वाईट मार्गानें तो जाऊं लागला तर त्यास ताबडतोब कार्यतत्पर राजवटीकडून दंड किंवा शिक्षा होईल असा धाक, आपलें हित त्याबरोबर शेजाऱ्याचेंहि हित ही वृत्ति ठेविली तर आपला फायदा होणें शक्य आहे अशी समाजरचना आहे याची स्पष्ट जाणीव व सरकारचें वरील प्रकारचें आर्थिक धोरण प्रत्यक्षांत यशस्वी रीतीनें आचरणांत आणील अशी आर्थिक नियंत्रणाची यंत्रणा कार्यरत आहे असा विश्वास, प्रत्येकांत निर्माण करील अशी सरकारची वागणूक असली पाहिजे. प्रत्येक नागरिकास स्वतःच्या कर्तव्याची जाणीव असेल व त्याच्या मनांत सरकारी कर्तव्याविषयीं स्पष्ट कल्पना असेल, तर तो नेहमीं स्वतःची वागणूक एका विशिष्ट पातळींत ठेवण्याचा प्रयत्न करील व राज्ययंत्राकडूनहि त्या वागणुकीची अपेक्षा ठेवील. राज्ययंत्रांत थोडी ढिलाई किंवा अयोग्य वर्तणूक दिसून आल्यास तो आपला आवाज राज्ययंत्राच्या कानावर जाईल व त्यांत ताबडतोब सुधारणा होईल अशी दक्षता घेईल. तसेंच नागरिकांत स्वकर्तव्याविषयीं बेफिकीरपणा व समाजद्रोही वर्तन दिसून आल्यास राज्ययंत्रहि त्वरित हालचाल करील, असा परस्परांचा परस्परांस वचक असला तर लोकशाही ही एक आदर्श राजवट ठरेल यांत संदेह नाहीं. अशा तऱ्हेची लोकशाही राजवट अस्तित्वांत आणावयाची तर प्रत्येक नागरिकास वर सांगितल्याप्रमाणें सर्वांगीण शिक्षण मिळालें पाहिजे.

अर्थात् ह्या शिक्षणाबरोबर समाजाच्या नैतिक शिक्षणाकडेहि दुर्लक्ष करून चालणार नाहीं. नैतिक शिक्षण तर समाजाचा मूळ पाया आहे. "धारणात् धर्मः" समाजाची धारणा ज्यायोगें होईल तो धर्म, अशी धर्माची व्याख्या आहे. धर्माच्या नीतितत्त्वांचें शिक्षण मिळालें तरच समाज सुस्थिर पायावर उभा राहूं शकेल. लोकांनीं न्याय्य श्रम करून द्रव्यार्जन करावें, शेजाऱ्यांस मदत करावी, दुःखितांचें सांत्वन करून आततायी लोकांचें दमन करावें व परमत-सहिष्णुता दाखवावी, अशा सर्वसामान्य नीतितत्त्वांचें आचरण समाजांतील बहुसंख्य लोक करीत असल्यानेंच राज्ययंत्र मूठभर समाजकंटकांचा आपल्या पोलीस व न्यायाधीश यांच्यामार्फत बंदोबस्त करूं शकतें. परंतु हीं नीतितत्त्वें आचरणांत आणावयाचीं नाहींत असा बहुसंख्य लोकांचा कल झाला, तर राज्ययंत्र लुळें-पांगळें होऊन समाजांत "बळी तो कान पिळी" ह्या जंगलन्यायाचें अधिराज्य होईल.

समाजांत नेहमींच सत् व असत् प्रवृत्तींचा झगडा चालू असतो. बऱ्याच वेळेस असत् प्रवृत्ति विजयी होत आहेत, असें दिसून येतें. पण याकरितां श्रीकृष्ण, ख्रिस्त, गांधी वगैरे महात्मे निराश न होतां सत्प्रवृत्तीचें निशाण हातीं घेऊन असत्प्रवृत्तीशीं टकरा देतच असतात; आणि म्हणून तर असत्प्रवृत्ति एका विशिष्ट मर्यादेच्यावर डोकें काढूं शकत नाहींत.

सत्प्रवृत्तींच्या वाढीस योग्य अर्थव्यवहाराची अत्यंत जरुरी आहे. "अर्थ एव प्रधानः" पैसा हाच समाजांतील सर्व गोष्टींचें मूलकारण आहे; "अर्थमूलौ धर्मकामौ" धर्म व इच्छा पैशावर अवलंबून आहेत, असें कौटिल्य आपल्या पुस्तकांत या कारणाकरितांच म्हणतो. या पुस्तकांत सरकारी अर्थव्यवहार कोणत्या स्थिर तत्त्वांवर आधारला म्हणजे समाजधारणेस योग्य ठरेल, याचें सर्वसामान्य विवेचन केलेलें आहे. त्या तत्त्वांची राजकारणी पुरुषांनीं व समाजधुरीणांनीं कांस धरून तीं प्रत्यक्षांत उतरविण्याचा प्रयत्न केला, तर समाजांतील सत्प्रवृत्ति वाढीस लागून स्वर्ग हा कीं तो असा संभ्रम पृथ्वीतलावरील प्रत्येक सुजाण माणसाच्या मनांत उत्पन्न होऊन, मानवाचें जीवन सुसह्य होईल असा भरंवसा वाटतो.

— समाप्त —

# परिशिष्ट १ लें

## मध्य व राज्यसरकारांचा जमाखर्च

| खातें | १९५०–५१ पक्के आंकडे | | १९५१–५२ दुरुस्त आंकडे | | १९५२–५३ अंदाजपत्रकी आंकडे | |
|---|---|---|---|---|---|---|
| | जमा | खर्च | जमा | खर्च | जमा | खर्च |
| | | | आंकडे | कोट | रुपयांत | |
| १. चालू खातें (रेव्हेन्यू अकाउंट) | | | | | | |
| मध्यसरकार - | ४१०.६६ | ३५१.४४ | ४९७.६७ | ४०५.०६ | ४०४.९८ | ४०१.२५ |
| 'अ' विभाग राज्यें - | २९४.३२ | २९३.१४ | ३१६.८९ | ३१६.३९ | ३१४.८२ | ३२३.३२ |
| 'ब' विभागीय राज्यें - | ९२.८३ | ९१.३० | १०५.४४ | १०३.२० | १०४.६२ | १०७.३७ |
| वट बेरीज - | ७९७.८१ | ७३५.८८ | ९२०. | ८२४.६५ | ८२४.४२ | ८३१.९४ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २. भांडवलीखातें मध्यसरकार | १२०.८० | १६७.५९ | १४५.९९ | २४२.३० | ८४.८६ | १६४.१९ |
| 'अ' विभागीय राज्यें | ६७.२५ | ६९.२० | ८३.१३ | ११६.८३ | ९९.२३ | १३९.२२ |
| 'ब' विभागीय राज्यें | २१.०२ | २३.०७ | २.०७ | २३.५१ | २०.०३ | २७.२३ |
| वट बेरीज | २०९.०७ | २५९.८६ | २३१.१९ | ३८२.६४ | २०४.१२ | ३३०.६४ |
| १+२ ची बेरीज | १००६.८८ | ९९५.७४ | ११५१.१९ | १२०७.२९ | १०२८.५४ | ११६२.४८ |
| मध्यसरकारनें राज्यसरकारांना मदतीदाखल व इतर दिलेल्या दुबेरजी रकमा सोडून | ९०२.०९ | ८९५.३९ | १०२८.९९ | १०९४.२६ | ९०२.४७ | १०४२.५४ |
| **रेलवेचा जमाखर्च** | | | | | | |
| | २६३.०१ | २१०.४८ | २८८.०६ | २२५.९४ | २८२.१६ | २१७.९३ |
| **सर्व सरकारांचा उत्पादक खर्च ( रेलवेसह )** | | | | | | |
| | ( रेलवे ) | ३०३ ( ६१ ) | | ३८२ ( ७७ ) | | ४४५ ( ७९ ) |

## परिशिष्ट

### कांहीं देशांची जमा, खर्च, राष्ट्रीय उत्पन्न

( आंकडे कोटि

| देशाचें नांव | वर्ष | एकूण उत्पन्न | प्राप्ति करापासून उत्पन्न | ४ चें ३ शीं प्रमाण | एकूण खर्च | संरक्षण खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ हिंदुस्थान - | १९३८–३९ | ८४ | ४६ | १९ | ८५ | ४६ |
| | १९५१–५२ | ४९८ | १२१ | २४ | ४०५ | १८१ |
| २ पाकिस्तान - | १९५१–५२ | १४१ | १७ | १२ | १४० | ७२ |
| ३ ग्रेटब्रिटन - | १९३८–३९ | १२४० | ५६० | ४५ | १२५३ | ३६२ |
| ( UK ) - | १९५१–५२ | ५९२० | २८१३ | ४८ | ५४०० | १४८० |
| ४ अमेरिका - | १९३८–३९ | २७२१ | ११६८ | ४३ | ४७८२ | ६४३ |
| ( USA ) - | १९५१–५२ | ३३४२४ | २७८५२ | ८३ | ३७८०३ | २१२८९ |
| ५ रशिया - | १९३८– | १२८ | ( रुबल्स ) | | १२४ | २३ |
| (USSR) - | १९५२– | ५०९ | ,, | | ४७७ | ११४ |

टीप—अमेरिकन लोकांचें दरमाणशीं उत्पन्न रु. ९२५२ चें आहे; व आपलें रु. २४४चें आहे. यावरून आपणांस आणखी किती मजल मारावयाची आहे, याची कल्पना

२ रें

## कर्ज, लोकसंख्या इत्यादि बाबींचे आंकडे

रुपयांत )

| ७ चें ६ शीं प्रमाण | राष्ट्रीय उत्पन्न | ३ चें ९ शीं प्रमाण | राष्ट्रीय कर्ज | लोकसंख्या | दरमाणशीं उत्पन्न | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| ५४ | उपलब्ध नाहीं | ० | ११७९ | ४१·९० कोटी | — | |
| ४५ | ८७१० (१९४८-४९) | ६ | २६३२ | ३६·१८ ,, | २४४ (रुपये) | |
| ५१ | उपलब्ध नाहीं | ० | ९५ (हाहि आंकडा अद्याप निश्चित ठरलेला नाहीं) | ७·५७ | — | |
| २९ | ६२८० | २० | १०८८० | ४·५२ | २४१८ (रुपये) | रु.१ = २ शि. १ शि. ६ पेन |
| २७ | १५३७५ | ४१ | ३४४८० | ५·०७ | ६८९५ (रुपये) | |
| १३ | ३५९३२ | ८ | २१५६८ | १३·०० | १६५९ (रुपये) | १०० रु. = १८·७५ डॉलर्स |
| ५६ | १४७२०० | २३ | १३८७८५ | १५·१७ | ९२५२ (रुपये) | |
| १९ | बाकीचे | आंकडे नाहींत | उपलब्ध | १७·०० | — | रु.१ = १रुबल. (अदमासें) |
| २४ | | | | १९·३० | | |

येईल. प्राप्तिकराचें आपलें प्रमाण ग्रेटाब्रिटन व अमेरिका या दोन्हींपेक्षां फारच कमी आहे. पण राष्ट्रीय उत्पन्नांत वाढ झाल्याशिवाय या प्रमाणांत वाढ होण्याची फारशी शक्यता नाहीं.

# परिशिष्ट ३ रें

## मध्य व राज्यसरकारांच्या उत्पन्नाच्या व खर्चाच्या ठळक बाबी

### मध्यसरकार

( कोटि रुपयांत )

### उत्पन्नाच्या प्रमुख बाबी

| | १९३८–३९ ( पक्के आंकडे ) | १९५१–५२ (दुरुस्त आंकडे) | १९५२–५३ अंदाजपत्रकी आंकडे |
|---|---|---|---|
| जकात ( कस्टम्स ) | ४०·५१ | २३२ | १६५ |
| उत्पादनकर ( सेंट्रल एक्साईज ) | ८·६६ | ८४·३० | ८६ |
| कार्पोरेशन कर | २-०४ | ३७·५५ | ३०·५३ |
| प्राप्तिकर | १५-२४ | १३७·४५ | १२४·४७ |
| एकूण उत्पन्न | ८४-४७ | ४९७·६७ | ४०४-९८ |

### खर्चाच्या प्रमुख बाबी

| | | | |
|---|---|---|---|
| राज्यकारभार | १५-१४ | ७३·६१ | ७१·७४ |
| कर्जावरील व्याज वगैरे | १४·१२ | ३७-३० | ३६·१६ |
| संरक्षण | ४६·१८ | १८१·२४ | १९७·९५ |
| एकूण खर्च | ८५·११ | ४०५-०६ | ४०१·२५ |
| कर्ज | १२०५·७८ | २६११·१६ | २६·७०·१६ |

# राज्यसरकारें
## ( ‘अ’ विभाग )
### उत्पन्नाच्या प्रमुख बाबी

| | | | |
|---|---|---|---|
| जमीनधारा | २५·४१ | ३३·९१ | ४१·७४ |
| प्रमाण— | ( ४३ टक्के ) | ( १४·४९ टक्के ) | ( १७·७१ टक्के ) |
| विक्रीकर | ... | ४७·७४ | ४५·६८ |
| | | ( २०–४१ ) | ( १९·४७ ) |
| अबकारी | १३·०८ | २६·२८ | २६०७ |
| | ( २२·१५ ) | ( ११·२३ ) | ( ११·०६ ) |
| स्टँप-ड्यूटी | ९·५९ | २०·१९ | २०·१९ |
| | ( १६·२५ ) | ( ८·६३ ) | ( ८·५६ ) |
| एकूण करांपासून उत्पन्न | ५९·०२ | २३३·९५ | २३३·७५ |

### खर्चाच्या प्रमुख बाबी

| | | | |
|---|---|---|---|
| राज्यकारभार | ८·७९ | २६-९६ | २६·८१ |
| | ( १०·९२ ) | ( ८·५२ ) | ( ८·२९ ) |
| कर्जावरील व्याज वगैरे | १·७८ | ४·१४ | ३·७४ |
| | ( २·२ ) | ( १·३१ ) | ( १·१६ ) |
| पोलीस वगैरे | २६·६३ | ९१·३२ | ९२·३३ |
| | ( ३३ ) | ( २८·८६ ) | ( २८·५६ ) |
| समाजसंवर्धक | २०·८९ | ९९·०८ | १००·९४ |
| | ( २६ ) | ( ३१·३२ ) | ( ३१·२२ ) |
| एकूण खर्च | ८०·५२ | ३१६·३९ | ३२३·३२ |
| कर्ज | १३२·९० | ३३०·१२ | उपलब्ध नाहीं |

## 'ब' विभाग

### उत्पन्नाच्या प्रमुख बाबी

| | | |
|---|---|---|
| जकात | ४·९१<br>(७·५२) | ३·४३<br>(५·२) |
| जमीनधारा | १५·६७<br>(२३·९९) | १७·५२<br>(२६·५६) |
| विक्रीकर | ५·६५<br>(८·६५) | ५·९१<br>(८·९६) |
| अबकारी | २१·२१<br>३२·४७) | २१<br>(३१·८३) |
| स्टँपड्यूटी | ३·२०<br>(४·७५) | ३·१७<br>(४·८१) |
| एकूण करांपासून उत्पन्न | ६५·३३ | ६५·९७ |

### खर्चाच्या प्रमुख बाबी

| | | |
|---|---|---|
| राज्यकारभार | ९·६०<br>(९·३०) | १०·९५<br>(१०·२०) |
| कर्जावरील व्याज वगैरे | ४·३०<br>(४·१७) | ४·३०<br>(४·) |
| पोलीस वगैरे | २६·०३<br>(२५·२२) | २४·०२<br>(२२·३७) |
| समाजसंवर्धक | ३३·२४<br>(३२·२१) | ३७·०७<br>(३४·५३) |
| एकूण खर्च | १०३·२० | १०७·३७ |

**टीप**—कर्जाचा आंकडा उपलब्ध नाहीं.

# परिशिष्ट ४ थें

## हिंदचा आयात–निर्यात व्यापार

(आंकडे कोट रुपयांत)

| | १९४९–५० | १९५०–५१ | १९५१–५२ |
|---|---|---|---|
| आयात | ६३९·७५ | ६०८·८४ | ९६५·२५ |
| निर्यात | ५०६·०२ | ६०१·१८ | ७३२·६३ |
| एकूण | ११४५·७७ | १२१०·०२ | १६९७·८८ |

## आयात व्यापारांतील प्रमुख जिन्नस

| | | |
|---|---|---|
| अन्नधान्यें | ८०·७६ | २३०·३० |
| कापूस | १००·७६ | १३६·४६ |
| ताग | २७·५७ | ९२·५४ |
| यंत्रसामुग्री | ८४·८० | १०४·०६ |

## निर्यात व्यापारांतील प्रमुख जिन्नस

| | | |
|---|---|---|
| तागाचे जिन्नस | ११४·४७ | २७०·३६ |
| चहा | ८०·४२ | ९३·२९ |
| कापड | १३८·४४ | ५८·५९ |

## पाकिस्तानशीं व्यापार

| | | |
|---|---|---|
| आयात | ४३·०५ | ११२·९६ |
| निर्यात | ३०·४३ | ४५·२४ |

## इतर प्रमुख विभागांशीं व्यापार

| विभागाचें नांव | | १९५०–५१ | १९५१–५२ |
|---|---|---|---|
| १ अमेरिका (यू. एम्. ए. धरून | आयात | १३८· | ३११·६६ |
| | निर्यात | १५०·०६ | १९७·८७ |
| २ युरोप (ग्रेटब्रिटन धरून) | आयात | २००·०६ | २६८·७३ |
| | निर्यात | २०१·१८ | २५७·३१ |
| ३ मध्यपूर्व व आफ्रिका (इजिप्त, इराण, अफ-गाणिस्तान वगैरे | आयात | १२३·६१ | १४०·३१ |
| | निर्यात | ६८·९६ | ७८·४९ |
| ४ आग्नेय आशिया (इंडोनेशिया, ब्रह्मदेश सयाम वगैरे | आयात | ५४·४० | ५४·४० |
| | निर्यात | ९६·८३ | ९६·८३ |
| ५ चीन, जपान | आयात | १०·७१ | ४०·५० |
| | निर्यात | १३·३१ | २१·८५ |

**टीप**—आपला रशियाशीं जवळ जवळ कांहींच व्यापार नाहीं. चीन व जपानशींहि फारच कमी व्यापार आहे. आपला सर्व व्यापार मुख्यत्वें अमेरिका (U. S. A.) ग्रेटब्रिटन (U. K.) व इजिप्तशीं आहे.

# परिशिष्ट ५ वें

## घटनाकायद्याचें कलम २४६ अन्वयें मध्यसरकारच्या ताब्यांतील करविषयक बाबी

( कंसांतील आंकडे घटनाकायद्याच्या सातव्या परिशिष्टांतील पहिल्या यादींतील आहेत.)

१ (८२) शेती उत्पन्न सोडून इतर उत्पन्नावरील प्राप्तिकर.

२ (८३) निर्यातकरासह जकाती ( कस्टम-ड्यूटी ).

३ (८४) खालील बाबी सोडून इतर बाबींवरील उत्पादन-कर.

(अ) मद्यार्कयुक्त पेयें,

(ब) अफू, गांजा व कैफ निर्माण करणारीं औषधें ( Narcotic drugs ).

४ (८५) कार्पोरेशन टॅक्स ( धंदेवाईक मंडळ्यांवरील कर ).

५ (८६) शेतजमिनीशिवाय इतर बाबींवरील भांडवली कर.

६ (८७) शेतजमीन सोडून इतर बाबींवरील मालमत्ताकर.

७ (८८) शेतजमीन सोडून इतर मिळकतीवरील वारसाकर.

८ (७९) रेल्वेमार्गे, समुद्रमार्गे किंवा हवाईमार्गे नेण्यांत येणाऱ्या मालवाहतुकीवर किंवा पॅसेंजरवाहतुकीवरील कर; व रेल्वेच्या दरावरील कर.

९ (९०) शेअर-बाजार आणि सौदेबाजार यांतील व्यवहारावर स्टँपड्यूटी सोडून इतर कर.

१० (९१) हुंड्या, चेक्स, वचनचिठ्या, जहाजावरील मालवाहतुकीचीं बिलें, क्रेडिट-चिठया ( letters of credit ) विमा-पत्रें, शेअरतबदीलपत्रें, डिबेंचर्स, पावत्या, प्रॉक्सीज् यांवरील कर.

११ (९२) वृत्तपत्राच्या खरेदी व विक्री यांवरील व त्यांत प्रसिद्ध केलेल्या जाहिरातींवरील कर.

## राज्यसरकारांच्या ताब्यांतील बाबी

( दुसरी यादी )

१ (४५) जमीनधारा.

२ (४६) शेती उत्पन्नावरील कर.

३ (४७) शेतजमिनीवरील वारसाकर.

४ (४८) शेतजमिनीवरील मालमत्ताकर.

५ (४९) जमिनी व घरें यांवरील कर.

६ (५०) संसदेनें घातलेल्या मर्यादांस अनुसरून खाणी चालविण्याच्या हक्कांवरील कर.

७ (५१) खालील बाबींवरील उत्पादनकर.

(अ) मद्यार्कयुक्त पेयें,

(ब) अफू, गांजा आणि इतर कैफ निर्माण करणारीं औषधें ( Narcotic drugs ); मात्र यांमध्यें औषधी व वेषभूषेस लागणाऱ्या जिनसांचा समावेश होत नाहीं.

८ (५२) राज्यांत येणाऱ्या वस्तूंच्यावरील वापरा कर.

९ (५३) विद्युत्शक्तीवरील कर.

१० (५४) वृत्तपत्रें सोडून इतर वस्तूंवरील खरेदी किंवा विक्रीकर.

११ (५५) वृत्तपत्रांतील जाहिराती सोडून इतर जाहिरातींवरील कर.

१२ (५६) खुष्कीच्या मार्गानें किंवा अंतर्गत जलमार्गानें होणाऱ्या माल किंवा उतारू-वाहातुकीवरील कर.

१३ (५७) रस्त्यावर चालविण्यांत येणाऱ्या वाहनांवरील कर.

१४ (५८) जनावरें व बोटी यांवरील कर.

१५ (५९) टोल.

१६ (६०) नौकरी, व्यापार, व इतर धंद्यांवरील कर.

१७ (६१) कॅपिटेशन कर.

१८ (६२) करमणूककर.

१९ (६३) मध्यसरकारच्या अधिकारांतील ( यादी नं. १ बाब ९१ ) बाबी सोडून इतर बाबींवरील स्टँपड्यूटी.

# सूचि

# मराठी प्रतिशब्द

Ability–कुवत
Absentee-Land-lords–बशे जमीनदार
Administrative–कारभारविषयक
Agricultural Income-tax–शेती उत्पन्नावरील कर
Annuity bond–वर्षासनपद्धतीचें कर्ज.
Bargaining Power–सौदाशक्ति.
Barter–अदलाबदलीचा व्यवहार.
Betterment levy–सुखवृद्धि कर.
Bill–विधेयक.
Bill of exchange–हुंडी.
Blue print–आदर्श रिपोर्ट.
Board of trade control–धंदे-नियंत्रण.
Budget–अंदाजपत्रक.
Canons of financial propriety–खर्च करण्याचीं सर्वमान्य तत्त्वें.
Capital fund–भांडवलफंड.
Capital levy–भांडवलपट्टी.
Cold storage–थंडकुपी.
Collection charges–वसुली खर्च.
Commercial basis–व्यापारी तत्त्व.
Common wealth–राष्ट्रकुल
Consumer–उपभोक्ता.
Consumer goods–उपभोग्य वस्तु.
Corporation tax–धंदेवाईक मंडळ्यांवरील कर.
Death duties–वारसाकर.
Desire to work & save–काम करण्याची व संचय करण्याची प्रवृत्ति.
Directorate of planning Inspection–नियोजन तपासणी-मंडळ.
Earned-income–स्वार्जित उत्पन्न.
Economic Activity–आर्थिक व्यवहार.
Economy–काटकसर.
Education tax–शिक्षणकर.
Elasticity–लवचिकपणा.
Empire preference–राष्ट्रगट सवलत.
Equity–समतोलपणा.
Estate–जिंदगी.
Estate-Duty–जिंदगीकर.
Excise–उत्पादनकर.
Federal–संघराज्यस्वरूपी.
Finance commission–अर्थ-समिति.
Firm–धंदेवाईक मंडळी.

Floating Debt–प्रवाही कर्ज.
Fuel–जळण.
Funded Debt–निधिसम कर्ज.
Grant–नक्त रक्कम.
Impeachment–न्यायालयीन चौकशी.
Incidence of taxation–करांचा बोजा.
Income-tax–प्राप्तिकर.
Indian Union–हिंदी संघराज्य.
Industrial finance-corporation–उद्योगधंदा-भांडवली-बँक.
Inflation–चलनवाढ.
Inheritance tax–वारसाकर.
Justice–न्याय.
Laissez faire–व्यक्तिनिष्ठ नियोजन.
Land tax–जमीनधारा.
Limited–मर्यादित जबाबदारी
Local Board–स्थानिक मंडळ.
Local Cess–स्थानिक कर.
Managed Currency–नियंत्रित चलन.
Managing council–चालकमंडळ
Marginal Utility–थोरवी.
Model farm–आदर्श शेत.
Money-market–नाणेंबाजार (रौप्यबाजार).
Multi-point बहुस्पर्शी.
Multi purpose–विविध कार्यकारी.
Parvalue–दर्शनी किंमत.
Perpetual Debt–कायमचें कर्ज.
Planning commission–नियोजन-समिति.
Planning finance corporation–अर्थ-नियोजन-मंडळ.
Planning Ministry–नियोजन-खातें.
Power–प्रेरकशक्ति.
Price-index–किंमत सूचकांक.
Prize-bond–बक्षिसाचा कर्जरोखा.
Procedural–तांत्रिक.
Production goods industries-मौलिक धंदे.
Productive Debt–उत्पादक कर्ज.
Progressive–पुरोगामी, वाढती श्रेणी.
Public Accounts committee–सरकारी हिशेब-समिति.
Public-corporation–स्वतंत्र मंडळी.
Quality–दर्जा.
Real Income–वास्तविक उत्पन्न.
Regressive–प्रतिगामी.
Retail-trade–किरकोळ वांटप.
Revenue-expenditure– दैनंदिन खर्च.
Road corporation–रस्ते-वाढ-मंडळ.

Rural-credit organizations–देहाती बँक.
Sales Tax–विक्रीकर.
Schedule of Authenticated Expenditure–खर्चाची संमत यादी.
Seasonal-Unemployment–मोसमी बेकारी.
Securities–कर्जरोखे.
Share–भाग.
Simple–साधी.
Single point–एकेरी.
Sinking Fund–कर्जविमोचननिधि
Standard–दर्जा.
Tax on windfall wealth–आकस्मिक लाभावरील कर.
Tax structure–करपद्धति.
Techanical Personnel–तंत्रज्ञ-गण.
Trade cycle–व्यापारी-चक्र.
Trade-Union–कामगारसंघ.
Treasury Bill–तिजोरी-बिल.
Treasury chest–चलनपेटी.
Treasury Deposit Reecipt–तिजोरी ठेव-पावती.
Unearned-income–पूर्वार्जित (परार्जित) उत्पन्न.
Unemployment insurence fund–बेकारी-विमानिधि.
Unitary–एकतंत्री.
Un-necessary friction–गैर-वाजवी असंतोष.
Unproductive Debt–अनुत्पादक कर्ज.
War-fund–युद्धनिधि.
Wasteful–बेहिशेबी.
Welfare-State–जनकल्याणकारी सरकार.



# अभिप्राय

[ प्रा. श्रीनिवास गोविंद पुराणिक, एम्. ए.
हं. प्रा. ठा. कॉलेज, नाशिक. ]

स्वतंत्र भारतांतील लोकशाहीच्या युगांतले जबाबदार नागरिक म्हणून आज आपण वावरत आहोंत. स्वातंत्र्य, समता आणि लोककल्याण ही त्रयी दृष्टीपुढें ठेवून भारताची सामाजिक, राजकीय आणि आर्थिक घडण एका विशिष्ट नियोजित पद्धतीनें आपण करीत आहोंत. लोकशाही आणि नियोजनपद्धति ह्या परस्परविरोधी आहेत असें सकृत्दर्शनीं आपल्यास वाटतें. त्यांतच अनेक परस्परविरोधी अशा वादांची भर पडतांच सार्वजनिक संस्थांचे आर्थिक व्यवहार सुगम आणि सुलभरीत्या घडविणें अतिशयच कठीण होतें. तथापि लोकशाहीचाच कठीण आणि कंटकमय मार्ग आपल्या राज्यकर्त्यांनीं स्वीकारला आहे. आज उपलब्ध असलेली सर्व साधनसामुग्री आणि मनुष्यबल एकत्रित करून देशांतील बेकारी आणि दारिद्र्य नष्ट करणें व साऱ्या जनतेचें सामान्य राहणीचें मान वाढविणें हें ध्येय आपण स्वीकारलें आहे. पण हें अल्पावधींत साध्य करण्यास त्यागाची आणि सहकार्याची पूर्ण तत्परता सामान्य जनतेमध्यें असणें आवश्यक आहे.

लोकहित म्हणजेच आपलें हित हें म्हणणें फार सोपें आहे. पण त्याकरितां साऱ्या राज्ययंत्रास झटावयाचें झाल्यास कोट्यवधि रुपयांचा खर्च आपल्यास करावा लागेल. एवढी रकम हातीं येण्यास अनेक प्रकारचे कर आणि इतर मार्ग आपणांस शोधावे लागतील. या सर्वांचे परिणाम राष्ट्राच्या उत्पादनावर, संपत्तीच्या वांटपावर आणि इतर व्यवहारांवर काय होतील हें समजून घेणें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य आहे. या दृष्टीनें पाहतां श्रीयुत श्री. द. कुलकर्णी यांच्या " लोकशाहीचा अर्थव्यवहार " ह्या पुस्तकाचें प्रकाशन अगदीं स्वागतार्ह आणि समयोचित आहे असें मला वाटतें. हें लिहीत असतांना त्यांनीं एक मर्यादित दृष्टिकोन ठेवला आहे. " हें पुस्तक तज्ज्ञाकरतां नसून प्रायः सामान्य सुजाण माणसास सरकारी अर्थव्यवहार आणि अर्थनीति यांचें सुलभरीत्या ज्ञान व्हावें " हा त्यांचा मुख्य हेतु आहे.

कालानुसार सरकारी आर्थिक व्यवहार कसे बदलत गेले व त्यांचें क्षेत्र समाजवादी अगर साम्यवादी विचारसरणीच्या पडसादामुळें कसें विस्तृत होत

गेलें ह्याचें परिशीलन त्यांनीं प्रथम केलें आहे. त्यानंतर सरकारी तिजोरीच्या दृष्टीनें आवक उत्पन्नाच्या बाबी कोणत्या, त्यासाठीं निरनिराळ्या प्रकारचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कर कसे बसविले जातात, या करांचा अंतिम बोजा आणि इतर परिणाम काय होतात यांचें तात्त्विक विवेचन प्रचलित घडामोडींतील उदाहरणें देऊन समतोल बुद्धीनें करण्यांत आलें आहे. करपद्धतीशिवाय कर्ज काढूनहि सरकारी आवक वाढवितां येते. म्हणून हीं कर्जें उभारण्यांत अडचणी काय येतात, त्यांच्या मर्यादा काय आणि राष्ट्रीय कर्जाच्या निधीस काय स्थान द्यावें या प्रश्नांचाहि ऊहापोह विस्तृतपणें करण्यांत आला आहे. करवाढ आणि कर्जउभारणी या दोहोंला विशिष्ट मर्यादा असल्यानें चलनवाढ करून सरकार आपलीं कार्यें करूं शकतें पण याचे अनेक दुष्परिणाम काय आहेत हेहि चर्चिण्यांत आले आहेत.

लोककल्याण हेंच अंतिम ध्येय ठेवल्यानंतर तुटीचीं अंदाजपत्रकें असलीं तरी नियोजित कार्य सरकारनें ठराविक वेळांत तडीस नेलेंच पाहिजे, अशी नवी विचारसरणी सर्वत्र मान्य होऊं लागली आहे. पण यांतून अनेक अडचणी, दूरगामी कूटप्रश्न कसे उद्भवतात याचें विवेचन श्रीयुत कुलकर्ण्यांनीं चांगलें केलें आहे. तात्त्विक चर्चेपेक्षा सामान्य जनतेस काय हवें या दृष्टीनें ही चर्चा करण्यांत आली आहे. शेवटीं भारतीय अंदाजपत्रकांचा परामर्ष थोडक्यांत घेऊन स्वतंत्र भारतांतील नव्या राजवटींतील राज्ययंत्र कोणीकडे झुकतें आहे याचें दिग्दर्शन करण्यांत आलें आहे. सारांश, सर्व दृष्टींनीं पाहतां श्रीयुत कुलकर्ण्यांची ही कृति अत्यंत उपयोगी ठरेल असें वाटतें. अर्थव्यवहारावर इंग्रजींत अनेक ग्रंथ आहेत. कोणत्या ग्रंथांच्या आधारावर हें पुस्तक रचण्यांत आलें आहे याचाहि उल्लेख प्रस्तावनेंत करण्यांत आला आहे. पण मातृभाषेंत लिहिलेले अशा प्रकारचे ग्रंथ फारच थोडे आहेत. प्रादेशिक विश्वविद्यालयें स्थापन झाल्यावर आपल्या मायबोलींतूनच विषयाचें प्रतिपादन केल्यास तें अधिक सुगम आणि सुलभ होतें हें तत्त्व आतां सर्वांना मान्य आहे. पण त्याकरितां ग्रंथनिर्मिति हवी. श्रीयुत कुलकर्ण्यांनीं या आपल्या कृतीनें यांत मोठी भर घातली याबद्दल त्यांचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों. ह्या पुस्तकाचा उपयोग सामान्य जनतेस, विद्यार्थिवर्गास व तसेंच या विषयाच्या प्राध्यापकांना पुष्कळ होईल असें मला निःसंशय वाटतें.

